# विलायतचा प्रवास.

भाग पहिला.



पुणें, "आर्यभूषण" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

१८८९.

# प्रस्तावना.

महाराष्ट्र भाषेंत ग्रंथांची वाण फार आहे. त्यांतून स्वतःच्या अनुभवाच्या आधारानें इतर लोकांच्या फायद्यासाठीं लिहिलेलीं पुस्तकें स्थलदेशवर्णनात्मक प्रवासाच्या हकिकती वगैरेचीं बहुशः आढळतच नाहींत. मुंबई इलाख्यांतील ग्रंथसंग्रहाची नोंद ठेवणारे सरकारी अधिकारी दरवर्षीं आपल्या रिपोर्टांत याबद्दल खेद प्रदर्शित करीत असतात; पण त्याकडे लोकांचें विशेषसें लक्ष गेलेलें नाहीं. अशा शोचनीय स्थितींत आमच्या एका स्नेह्यांस स्फूर्ति होऊन त्यांना ज्युबिलीउत्सवाच्या निमित्तानें विलायतची महायात्रा करण्याचा जो सुयोग आला त्याबद्दलची हकीकत त्यांनीं केसरी वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केली. ती प्रसिद्ध होत असतांनाच कित्येकांकडून अशा सूचना आल्या कीं निरनिराळ्या प्रांतांतील आचारविचाराविषयीं, देशस्थितीविषयीं, प्रेक्षणीय स्थलांच्या स्वरूपाविषयीं इतकी पूर्ण व मार्मिकतेनें लिहिलेली माहिती आपल्या महाराष्ट्र भाषेंत एके ठिकाणीं करून स्वतंत्र पुस्तकांत संकलित केलेली असावी. या सूचनेवरून ही प्रवासाची हकीकत पुस्तकरूपानें छापण्यास ग्रंथकर्त्यांची परवानगी मागितली. त्यांनीं ती मोठ्या आनंदानें देऊन शिवाय सर्व हकीकत पुनः एकदां समग्र वाचून दिली, याबद्दल आह्मी त्यांचे ऋणी आहों. पुस्तकांतील माहितीचा विशेष उपयोग व्हावा यासाठीं ठिक-

ठिकाणीं विषयनिर्देश केला आहे. या पुस्तकांत विलायतच्या प्रवासाच्या हकीकतीचा पूर्वभाग आला आहे. पुढील हकीकत हल्लीं केसरी पत्रांत प्रसिद्ध होत आहे.

आर्यभूषण छापखान्याचे व्यवस्थापक.



# अनुक्रमणिका.

## भाग पहिला.

८

# विलायतचा प्रवास.

## भाग १ ला.

## उपोद्घात.

आमच्या लोकांना बहुधा प्रवास करण्याचा शोक नाहीं; व त्यांतून ज्या कोणास प्रवास करण्याचे प्रसंग येतात त्यांस आपण पाहिलेल्या गोष्टी किंवा आपणास आलेले अनुभव यांचा लेख लिहिण्याची व तो प्रसिद्ध करून त्यामुळें आपली सुधारणा व जनांचें मनोरंजन करण्याची इच्छा नसते. ह्या विषयासंबंधानें अनेक वेळ चर्चा झालेली आहे व रेजिस्ट्रार आफ् नेटिव्ह पब्लिकेशन्स यांच्या वार्षिक हकीकतींत याविषयीं उल्लेख नेहमीं असतो व तत्संबंधानें येथील इंग्रजी वर्तमानपत्रांतही आमच्या लोकांवर दोषारोप करण्यांत येतात. माझ्या मतानें हा सर्व दोषारोप यथार्थ आहे. यासंबंधी इतकीं वर्षें चर्चा सुरू आहे तरी आमच्या लोकांत तादृश सुधारणा अजूनपर्यंत दिसून येत नाहीं, ही मोठी शोचनीय गोष्ट आहे. या बाबतींत मीही पुष्कळअंशीं दोषाई आहें हें मला पहिल्या प्रथम कबूल केलें पाहिजे, ह्मणजे वर जी मीं आमच्या लोकांची निंदा केली त्यावरून आत्मस्तुति करण्याचा आक्षेप जो मजवर येण्यासारखा आहे, त्यापासून मी आपल्यास मुक्त

करून घेतल्यासारखें होईल. कांहीं वर्षांपूर्वी मला उत्तरहिंदुस्थानांत प्रवास करण्याचा प्रसंग आला होता, त्यावेळेस सिमला, दिल्ली, आग्रा, लखनौ, प्रयाग, बनारस व कलकत्ता इत्यादि जीं स्थळें मीं पाहिलीं, त्यांसंबंधी माहितीचीं टिपणें मजजवळ असून अजून त्यांचा मीं कांहींच उपयोग केला नाहीं, ही मला स्वतःलाच मोठी लाजिरवाणी गोष्ट आहे, हें मी समजतों. परंतु याला इलाज काय ? आम्हीं पडलों मोठे उत्साहबहादूर ! तेव्हां इतक्या वर्षांत त्या माहितीचा कांहींच निर्गम लागूं नये यांत नवल तें कोणतें ? हीच स्थिति माझ्या विलायतच्या प्रवासाची व्हावयाची. परंतु कालान्तरानें म्हणा किंवा विलायती लोकांच्या समजुतीप्रमाणें विलायतचें वारें लागलें म्हणून म्हणा, आतां त्यासंबंधी माहिती वेडीवांकडी जशी लिहितां येईल तशी एकदां लेखार्पित करितों. ही माहिती वाचकांस कितपत उपयोगी किंवा मनोरंजक होईल याचा मला अ[illegible]भास नाहीं. परंतु इतकें खचित कीं यांत जे विषय येतील ते जनतादृग्गोचर झाल्यामुळें त्यांच्या सौष्ठवासौष्ठवाबद्दल जर कांहीं चर्चा झाली तर त्यापासून माझा फायदाच आहे. इतकें म्हणून हा उपोद्घात पुरा करून प्रकृत विषयाकडे वळतों.

## पाठशाळेंतील मनोराज्य.

कांहीं वर्षांपूर्वी पाठशाळेंत अध्ययन करीत असतां मी व माझ्या बरोबरची आणखी कांहीं मंडळी मिळून गच्चीवर बसूं ज्यावेळीं आमच्या शिळोप्याच्या गप्पा चालत तेव्हां विलायतेस जाण्याचे बेत होत असत; व असे सर्वांचे उद्गार निघत

असत कीं आपल्यास विलायत पाहण्याची संधि येईल काय ! सर्व उपलब्ध वर्णनावरून यूरोपदेश व विशेषतः इंग्लंड किती सुधारलेलें असावें ! व अशा ठिकाणीं जाऊन पाहून येण्याची संधि मिळाली तर फारच चांगलें होईल असें सर्वांस वाटे. परंतु तो काल निघून गेल्यावर व सायंकाळीं ज्याप्रमाणें पक्षी आपआपल्या स्थानीं जातात त्याप्रमाणें सर्व मंडळी भिन्न भिन्न प्रान्तांत भिन्न भिन्न व्यवसायांत व्यापृत झाल्यावर कितीकांच्या मनांत ती पूर्वींची स्फूर्ति कायम राहिली असेल हें सांगणें फार कठीण आहे. सर्व शिक्षित तरुण जनांच्या आयुष्यांत पाठशालानिवासाचा काल मोठ्या मौजेचा असतो. तरुण वय, जगाची बेपर्वा, संसाराची निष्काळजी, उत्साहवैपुल्य, अशा अनुकूल स्थितींत सर्व प्रकारचे मनोरथ अप्रतिहत वेगानें चालतील व सर्व विचार निरर्गलतेनें भराऱ्या मारतील यांत काय आश्चर्य ! परंतु जेव्हां का बाळ्याच्या दृष्टीपुढें संसारसागर आपलें अवाढव्य विराट्रूप प्रकट करितो व द्रव्यार्जन व कुटुंबपोषण हे अंकुश टोचूं लागतात तेव्हां वर सांगितलेली आकाशगति कुंठित होते व परिवाराच्या बाहेर जाण्यास नजरेस अवकाशच मिळत नाहीं. अशी सर्व साधारण स्थिति आहे, व मीही ह्याच मालिकेंत गोंविलेला आहें. परंतु ह्मण आहे कीं ' साखरेचा खाणार त्याला देव देणार. ' तेव्हां ज्युबिलीचा समय व त्यासंबंधानें आमच्या हिंदुस्थानच्या राजेरजवाड्यांची आंग्लभूमीप्रत यात्रा या मोठ्या प्रकरणांतच माझ्यासारख्या गरीबाला जाण्याचा प्रसंग आला ही मला अत्यानंदजनक गोष्ट झाली.

विलायतेस जाण्यासंबंधानें व्यक्ति व समाज यांसंबंधाचे

जे प्रतिबंध आहेत ते जरी एकीकडे ठेविले, तरी जो मनुष्य जाण्यास तयार होतो त्यास दुसऱ्या कांहीं गोष्टी अनुकूल लागतात. प्रथम वयःप्रौढता ही एक अवश्य गोष्ट आहे, व तिजमध्येंच तदनुषंगानें येणारा जगाचा अनुभव, मनुष्यस्वभावांची परीक्षा व देशस्थितीचें ज्ञान यांचा अन्तर्भाव होतो. माझ्या मतें जी आपली कांहीं मंडळी विलायतेस जाऊन आत्मनिंदक व परस्तुतिपाठक बनतात, त्याचें कारण वयाचें अप्रौढत्व व देशस्थितीचें अज्ञान हें होय. दुसरें असें कीं विलायत पहायाला जायचें पण स्वदेशाचें अवलोकन मुळींच नाहीं, अशी स्थिति असणें ह्मणजेही जरा वाईटच. तेव्हां या दोनही गोष्टींसंबंधाचें आनुकूल्य मला आहे असें समजून मीं विलायतेस जाण्याचा बेत पक्का केला.

## "टॅस्मेनिया." आगबोटीवर.

जाण्याचा बेत पक्का ठरल्यावर जेवढा अवकाश मिळाला तेवढ्या अवकाशांत सर्व गोष्टींची तयारी करून मी जाण्यास सिद्ध झालों. आगबोटीवर पोहोंचविण्याकरितां चार स्नेही मंडळी जमली होती, त्यांच्या आल्हादसूचक मुद्रेवरून असें मनाला समाधान वाटलें कीं मी जें साहसाचें कृत्य करीत आहें, त्याला माझ्या मित्रमंडळीचें पूर्ण अनुमोदन आहे; व ह्यामुळें माझा उत्साह वळावला व धैर्यग्रंथि दृढतर झाला. मीं 'साहसाचें कृत्य' असें म्हटलें यांत मला अतिशयोक्ति वाटत नाहीं. आपल्या लोकांना जलमार्गानें फार लांब प्रवास करण्याचे प्रसंग थोडे, व त्यांतून परकीय लोकांशीं, ह्मणजे जे लोक हिंदुस्थानांत असतांना आपल्या लोकांशीं मोकळ्या मनानें व्यवहार

करीत नाहींत त्यांच्याशीं निकट संबंध; त्यांच्या रीतरिवाजांचें कांहीं अंशीं तरी अनुकरण, हवापाण्याचा विलक्षण फेरबदल, इत्यादि कारणांनीं असा प्रवास करणें ह्मणजे एक प्रकारचें साहसच आहे यांत संशय नाहीं. तेव्हां अशा प्रसंगीं माझ्या मित्रांच्या वर्तनानें मला धीर आला यांत नवल नाहीं. आगबोटीवर गेल्यानंतर कपतानानें एका मनुष्यास माझी खोली मला दाखविण्यास सांगितलें. त्याप्रमाणें खालीं जाऊन सर्व सामान जेथल्या तेथें ठेवून वरच्या मजल्यावर परत येऊन आगबोट निघण्यास अवकाश होता त्या वेळांत मित्रमंडळीचा निरोप घेतला. मंडळी पोहोंचवून परत जावयास लागली व आगबोटींतून उतरून गेल्यावरही हात वर करून मला नमस्कार करीत होती, तेव्हां मनाची एका प्रकारची विलक्षण स्थिति झाली. असें वाटलें कीं आतां पांचसहा महिनें पर्यंत ही मंडळी फिरून माझ्या नजरेस पडणार नाहींना? व त्यांचा माझा परस्पर संबंध कांहीं दिवस तरी अंतरित होणारना ? अशा प्रकारचे विचार आले. परंतु मनाला खेद किंवा दुःख बिलकुल झालें नाहीं.

मंडळी निघून गेल्यावर व आगबोट चालूं लागल्यावर कांहीं वेळ इकडे तिकडे फिरण्यांत घालविला व जेथें फार मंडळी नाहींत अशी एकांत जागा पाहून स्वस्थ कांहीं वेळ बसलों. माझें तिकिट पहिल्या वर्गाचें होतें तरी त्या वर्गांत उतारूंची फार गर्दी झाल्यामुळें मला व पहिल्या वर्गांतील दुसऱ्या सुमार दहा एक जणांस दुसऱ्या वर्गांतील खोल्या दिल्या होत्या. पहिल्या वर्गापेक्षां दुसऱ्या वर्गांत आराम कमी असलाच पाहिजे ; ह्मणून मनाला खेद वाटला ; परंतु दुः-

स्रांत सुख एवढेंच वाटलें कीं माझ्या खोलींत दुसरा कोणी भागीदार नव्हता. माझी खोली दोन उतारूंच्या सोईची होती; तेव्हां त्यांत दुसरा कोणी घातला असता तर माझ्यानें नको ह्मणवलें नसतें. कदाचित् मी एतद्देशीय, तेव्हां माझी सांगड कोणी युरोपियनाशीं घातल्यास त्याला माझा संसर्ग खपणार नाहीं ह्मणून ह्मणा, किंवा आमच्या महाराजांनींच तशी व्यवस्था केली ह्मणून ह्मणा,—मला ह्या गोष्टीमुळें फार सुख झालें. खोली जरी दुसऱ्या वर्गांत होती तरी तिकिट पहिल्या वर्गाचें असल्यामुळें हिंडण्याफिरण्याच्या सर्व सोई इतर लोकांप्रमाणें मलाही हक्कानें होत्या; तथापि सर्व साहेब लोक—पुरुष व स्त्रिया—यांच्यामध्यें बसण्याउठण्याचा मला फार संकोच वाटला. ह्या देशांत सर्व साहेब लोक आमचे वरिष्ठ तेव्हां सर्वांला मान देण्याची आह्मांला पडली संवय, आणि आतां प्रसंग पडला सर्व त्यांच्याशींच. नोकरचाकर देखील तेच. सुदैवानें एवढी गोष्ट चांगली होती कीं नोकर लोकांच्या पोषाखावरून त्यांस ओळखतां येत असे. नाहींतर असा प्रसंग यावयाचा कीं, नोकर कांहीं कामाकरितां आपल्याजवळ आला ह्मणून आपण त्याला खडी ताजीम देऊन त्याचा मान करावा, असें झालें ह्मणजे त्या फजितीला पारावार नाहीं. एकदम हशा पिकून आमच्या गरीब एतद्देशीय लोकांच्या मूर्खपणावर टीका व्हावयाची. ह्या गोष्टीचा पूर्ण विचार करून व असा प्रसंग एकदोन दिवसांचा नाहीं हें मनांत आणून मीं असा निश्चय केला कीं कोणी ओळखीचा साहेब भेटल्याशिवाय केवळ साहेबपणावरच कोणालाही उगीच मान द्यावयाचा नाहीं; आणि माझ्या वर्गांतील मंडळी ज्या बाजूला बसली होती त्यांच्यामध्येंच एके ठिकाणीं मी जा-

ऊन बसलों. इतक्यांत सूर्य अस्तंगत झाला व दूर कांहीं अंतरावर मुंबईच्या दीपगृहांतील तेजस्वी प्रदीप–जणुं माझ्या मित्रमंडळीच्या आग्रहास्तव मार्गदर्शकत्व स्वीकारून मला साल्हाद करण्याकरितांच कीं काय–दृग्गोचर होऊं लागला. त्याकडे पहात बसलों आहें इतक्यांत घंटेचा गजर कानीं पडला.

## भोजनविधि.

घंटा कशाची हें विचारण्यास परिचित मनुष्य कोणी जवळ नव्हता ह्मणून तसाच स्वस्थ बसलों. अर्ध्या तासानें दुसरा गजर झाला तेव्हां एक साहेब केवळ सौजन्यानें प्रेरित होऊन माझा परिचय नसतांही मजजवळ येऊन मला ह्मणाला "सायंकालचा समय मोठा रमणीय आहे." मीं हो ह्मटल्यावर तो ह्मणाला कीं जेवणाची दुसरी घांट झाली आतां आपल्यास खालीं गेलें पाहिजे. मीं त्यास विचारलें कीं पहिली घांट कशाकरितां झाली? त्यानें सांगितलें कीं कपडे वगैरे घालून तयार रहाण्याकरितां.—ह्यासंबंधानें इतकें सांगणें अवश्य आहे कीं, साहेब लोकांमध्यें संध्याकाळचें भोजन मुख्य समजतात व सकाळीं व दुपारीं फराळच समजावयाचा. तेव्हां संध्याकाळच्या वेळेस हात व तोंड धुऊन केंस साफ करून, गळपट्टी व अंगरखा बदलण्याची चाल आहे. अंगरखा काळ्या रंगाचा असावा असा नियम आहे. आगबोटीवर जरी एरव्हींप्रमाणें सर्व नियम ते लोक पाळीत नाहींत तरी ह्या भोजनाचे वेळेस नीट स्वच्छ कपडे घालण्याची चाल आहे व स्त्रियाही त्याचप्रमाणें कपडे बदलतात व दागिने वगैरे घालून नटून तयार होतात. आमची जेवणाखाण्याची सर्व व्यवस्था जरी निराळी

होती तरी त्यांची व्यवस्था व रीत कशा तऱ्हेची असते हें दु-रून पहाण्यास कांहीं प्रत्यवाय नव्हता. दिवाणखान्यांत टेब-लाच्या दोनही बाजूस बऱ्याच जवळ जवळ अशा खुर्च्या लावल्या होत्या. ह्या खुर्च्या फिरकीवर फिरत्या अशा होत्या. प्रत्येक खुर्चीवर बसणाराच्या नांवाचें तिकीट ठेविलें होतें तें पाहून मंडळी सर्व स्थानासीन झाली. नांवाचीं तिकिटें पहि-ल्याच दिवशीं ठेवतात. एकदां जागा समजली ह्मणजे प्रत्यहीं त्याच जागेवर बसण्याचा नियम आहे.

दुसरी घंटा वाजल्यापासून सुमारें दहा मिनिटांच्या आंत सर्व मंडळी आपआपल्या स्थानीं बसून तयार झाली. मेजां-वर एक तांबड्या बुट्टयांचा कपडा व त्यावर एक सफेत कपडा होता. प्रत्येक माणसासमोर एक एक हात पुसण्याच्या रुमा-लाची घडी ठेविली होती. ह्या रुमालाची घडी रोज निरनि-राळ्या प्रकारची चमत्कारिक करीत असत. कधीं फुग्यासारखी, कधीं आपल्याकडे मुलें कागदाची नांव करितात त्याप्रमाणें, कधीं बारीक चुण्या करून रुमालाची एक बाजू एका लहान पितळेच्या आंगठींत अडकवीत व दुसरी बाजू पिंजारून ठेवीत ह्मणजे तो पक्ष्याच्या उभारलेल्या पिसांप्रमाणें दिसे. टेबला-वरतीं ठिकठिकाणीं फुलझाडांच्या व इतर प्रकारच्या लहान झाडांच्या कुंड्या ठेविल्या होत्या व कोठें कोठें मोठे मोठे शुभ्र काचकलश असून त्यांत रंगीबेरंगी मासे सोडलेले होते. ह्यां-शिवाय मेवामिठाई व फळफळावळ जागोजाग मांडली होती. बदाम, मनुका, अक्रोड वगैरे मेवा व विलायती प्रकारची सपी-ठ रव्याची शर्करायुक्त मिठाई कांचेच्या बशांतून तयार ठेविली

होती. बदाम व अक्रोड फोडण्याकरितां एक प्रकारचे अडकि-त्ये ठेविले होते. फळफळावळ मांडण्यांत देखील एक प्रकारची चतुराई दृष्टीस पडली. पपनस ठेविले होते त्यांच्या बाहेरील कवच फुटलेल्या कमलाच्या आकृतीप्रमाणें कापून कांढलेले होते. दिव्यांचा चकचकाट व सर्व सामानाचा झकझकाट उ-पविष्टजनांच्या आल्हादास कारणीभूत झाला होता असें त्यां-च्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. सर्व दिवाणखान्याभर वारा घालण्याकरितां पंखा सुरू होता. एकंदरीनें असें दिसून आलें कीं भोजनविधि जरी नेहमींप्रमाणें होता तरी त्यासाठीं सर्व सुखोपभोगाची तयारी जशी आपल्यामध्यें सणासुदीच्या दि-वशीं करितात त्याप्रमाणें केली होती. त्यांतही एवढें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं ही सर्व हकीकत आगबोटीवरची, ह्मणजे जेथें सर्व वर सांगितलेली सुखोपभोगाचीं उपकरणें मिळणें व उपभोग्य स्थितींत टिकणें मोठें प्रयासाचें काम,—असें असून जेव्हां त्यांविषयीं इतकी तत्परता दिसली तेव्हां माझ्या मनांत असा विचार आला कीं जेथें सर्व गोष्टींचें आनुकूल्य असेल तेथें तर थाट याहीपेक्षां बहारीचा असेल.

मुख्य मेजाच्या अग्रभागाचे स्थानीं आगबोटीचे कपतान अधिष्ठित झाले होते व बाजूबाजूला जीं मेजें होतीं तदग्रभा-गीं कपतानाच्या हाताखालील आधिकारी बसले होते. तीन तीन, चार चार गृहस्थांच्या दरम्यान एक एक नोकर उभा होता. ह्यांच्या अंगांत एक कमरेपर्यंत पोहोंचे इतका काळा अंगरखा, पांढरी विजार व हातांत एक मोठा रुमाल होता. अंगरख्याच्या खिशांत पांढरीं कोरीं तिकीटें व एक पेनसलीचा

तुकडा व धूच काढण्याचा स्क्रू हीं सर्व आयुधें त्यांच्याजवळ असावयाचींच. सर्व मंडळी तयार झाल्यावर झटदिशीं एक घंटेचा ठोका पडला. त्याबरोबर बाजूला उभे असलेले सर्व नोकर लोक विषाणखान्याच्या एका बाजूस जमा झाले व वाढण्याचे पदार्थ घेऊन आपआपल्या यजमानांस वाढूं लागले. असा क्रम प्रत्येक वाढपाचे वेळीं होत होता. ह्याप्रमाणें भोजनविधि आटपण्यास दीड कलाक लागला. जेवणाचे साधारण तीन भाग होते. भात, भाज्या, व मांसमत्स्यादि हे प्रथम, त्यानंतर मिष्ट पदार्थ, व त्यानंतर फळफळावळ, व शेवटीं काफी. भोजनाच्या वेळेस पेय जिनसांपैकीं पाणी व बर्फ फुकट मिळतें. परंतु दुसरें कांहीं घेणें झालें तर नोकर वर सांगितलेलें कोरें तिकीट व पेन्सिल पुढें करितो त्यावर यजमानानें आपल्या खोलीचा नंबर व आपल्यास काय पिण्यास पाहिजे तें लिहावें ह्मणजे नोकर घेऊन येतो. दर आठवड्यास जमा झालेलीं तिकीटें व त्यांच्या आकाराचा आंकडा वसुलासाठीं परत सर्वांस दाखवितात. दीड कलाकपर्यंत एकसारखी गर्दी उडून गेलेली असते. चाकरांची धांदल, गृहस्थ व स्त्रिया यांचे अप्रतिहत व असंबद्ध उच्च स्वराचे मिथःसंलाप यामुळें जिकडे तिकडे कल्होळ असतो. भाषणाचे विषय हवेचें मान, व पदार्थांचे गुणावगुण इत्यादि. ओळखीचीं माणसें एकमेकांशीं बोलत व बाकीचीं निमूटपणें बसत.

## भोजनोत्तरचा प्रकार.

भोजनोत्तर सर्व मंडळी सुकाणूजवळच्या मोकळ्या जागेंत (ज्यास "क्वार्टर डेक" ह्मणतात तेथें), परत आली. कांहीं स्त-

पावली करावयास लागली. कांहीं खुर्च्या घेऊन वाताभिमुख बसली. जे धूम्रपानाचे शोकी होते ते त्यासाठीं नेमलेल्या खोलींत जाऊन तेथें सुखासीन होऊन धूम्राचे फूत्कार टाकीत बसले. कांहीं वेळ गेल्यानंतर कांहीं मंडळींनीं गंजिफा वगैरे खेळ खेळण्यास आरंभ केला.

हा सर्व प्रकार पाहिल्यानंतर मींही आपला भोजनादि विधि उरकून घेतला व एक खुर्ची घेऊन समुद्राकडे पहात बसलों. चंद्रिकेचें तेज समुद्राच्या नीलजलावर पडून एक प्रकारचा फार चमत्कृतिजनक देखावा नजरेस पडला. कामिनीगण्ड-पाण्डु शशांक ग्रहगणपरिवारासमवेत आकाशमार्गीं शनैः शनैः क्रमण करीत आहे व त्यांचें प्रतिबिंब जलाभ्यन्तरीं पडल्या-कारणानें चन्द्रास आपल्या अद्वितीयत्वाची शंका वाटून मा-त्सर्यानेंच कीं काय, तो जसजसा वर येऊं लागला तसतसा अधिकाधिक तेजस्वी दिसूं लागला. मंदवेग असा वायु वाहत होता व नौका इतक्या समतेनें चालत होती कीं समुद्राच्या कांठीं तंबूंत बसल्यासारखा भास होत होता. अशा स्थितींत बसलों असतां निद्रावश होऊन कांहीं काल तेथेंच कलला. नंतर जागा झालों तेव्हां आपण कोठें आहों व काल किती अतिक्रान्त झाला याचा विचार करून उठलों व मोठ्या दुः-खानें आपल्या शय्यास्थानाची वाट धरिली. दुःखाचें कारण असें कीं अशा आरामाच्या जागेंतून निघून संकुचित अशा गु-हांत जाऊन राग काढण्याचें मोठें जिवावर आलें. त्या ठि-काणीं निजण्यास परवानगी नव्हती असें नाहीं, परंतु सर्व रा-त्रभर इतक्या खुल्या हवेंत निजणें सोसेल न सोसेल हा भ-

यास्तव उठून जाणें भाग पडलें. खोलींत जाऊन दिवसाचे कपडे काढून रात्रीचे कपडे घालून निजलों.

## शयनगृह.

बिछाना सुमारें एक हात रुंदीचा असून त्यावर पलंगपोस व पांघरण्यास एक चादर व एक लोकरी पांढरी सकलाद होती. एकावर एक असे दोन बिछाने होते. खालच्या बिछान्यावर मीं आपलें कांहीं सामान ठेविलें होतें. मीं बरोबर घेतलेल्या बिछान्याच्या सामानाची बिलकुल गरज लागली नाहीं. खोलींत एक दुमडतां येण्यासारखें पीठ व तीन फळ्यांचें एक काष्ठफलक व त्यावरच काष्ठमय भिंतीस जोडलेलें कलश व पानपात्रें ठेवण्याचें दुसरें एक फलक होतें. त्याच बाजूस एक मुखधावनपात्र व त्यांतून पडलेलें पाणी सांठविण्याकरितां त्याच्या खालीं एक लोहपात्र व त्याच्याच खालीं एक खण काढला होता. त्यांत तोंड धुण्याचें पाणी ठेविलें होतें. मुखधावनपात्राचे बाजूस एक साबणाची वडी ठेविलेली होती. ह्या पात्राच्या मध्यभागीं एक भोंक होतें व त्याच्या जोगतेंच एक शृंखलावलंबी झांकण होतें. साहेबलोकांची रीति अशी आहे कीं तोंड धुवायचें झालें ह्मणजे धावनपात्रांतील छिद्र बंद करून त्यांत पाणी ओततात व त्यांत तोंड घालून धुतात. नंतर तें छिद्र मोकळें करितात व दूपित पाणी काढून टाकून दुसरें घेतात. ह्या जागेच्यावरच भिंतीबरोबर एक आरसा असतो व त्याच्या खालीं एक वाटोळा लांकडाचा तुकडा जोडलेला असतो. त्या तुकड्याच्या मध्यंतरीं एक पांढरें बटन असतें. ह्याचा उपयोग मला

ठाऊक नव्हता. मी सहज ह्या पांढऱ्या जागेवर बोट ठेवलें इतक्यांत एक नोकर दाराशीं येऊन दारावर अंगुलीनें आघात करूं लागला. मी आंत येण्यास परवानगी दिल्यावर तो येऊन काय पाहिजे ह्मणून विचारूं लागला. मी कांहीं नको ह्मटल्यावर त्यानें घंटा कां वाजविली ह्मणून विचारलें. त्यावरून मला समजलें कीं पांढरें बटन जें मी चेपलें तें घंटा-वादनयंत्र. असो. ह्याप्रमाणें सर्व खोलीची व्यवस्था पाहून मी निजलों. उष्मा बराच होत होता व हवा येण्यास फारसा मार्ग नव्हता; ह्मणून स्वस्थ झोंप लागली नाहीं.

## प्रातर्विधि.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं लवकरच उठलों. आगबोटीव-रील सर्व नोकरचाकर मंडळी फार लवकर उठतात, व आप-आपलीं नियमित कामें करण्यांत व्यापृत असतात. खलाशी लोक सर्व जागा धुऊन साफ करितात. उतारूंच्या खिजमतीस असलेल्या लोकांस "स्टुअर्ड" अशी संज्ञा आहे. हे लोक आपआपल्या यजमानांच्या खोल्यांत जाऊन चहापाण्याची चौकशी करितात. ज्यांची दिवाणखान्यांत जाण्याची खुषी असेल ते त्या ठिकाणीं जाऊन चहा घेतात. परंतु ज्यांची जाण्याची खुषी नसेल त्यांस आपल्या खोलींत चहा किंवा दूध जें हवें असेल तें मिळूं शकतें. उतारूंपैकीं स्त्रीवर्गाची व लहान मुलांची व्यवस्था ठेवण्यास परिचारिकांची योजना केलेली असते. वर सांगितलेल्या नियमानुरूप मला माझ्या नोकरानें जागें केलें. तेव्हां उठून मुखसंमार्जनादि विधि आटपण्यास आरंभ केला. लघुशंका करण्याची व्यवस्था व बहिर्दिशेस जाण्याची व्यवस्था आपल्या लोकांस आवडण्यासारखी नसते. प्रथमविधि उभ्या-

नेंच करण्याचा असून त्यासाठीं प्रत्येक मनुष्यास त्या काला-पुरती देखील आडोशाची सोय नसते. दुसऱ्या विधीसाठीं आ-डोशाचीं स्थलें असतात. ह्या ठिकाणीं एक ओट्याप्रमाणें उन्नत भाग असून त्याच्या मध्यभागीं वर्तुलाकार कुंडी असते व त्याच्याच दक्षिणभागीं एका जलाकर्षक यंत्राची योजना असते. साहेबलोकांच्या रीतीप्रमाणें हा विधि ज्याप्रमाणें आपण खुर्चीवर बसतों त्याप्रमाणेंच बसून करण्याचा असतो. विधि आटप-ल्यावर जलाकर्षक यंत्राच्या योगानें विपुल जलसंचार कर-ण्याची ताकीद प्रत्येक स्थलीं छापून चिकटविलेली असते. आमच्या सोईसाठीं एक स्वतंत्र स्थल नेमून दिलें होतें; म्हणून आह्मांस आमचे सर्व व्यापार यथापूर्व करण्यास सवड होती. ह्याप्रमाणें प्रातर्विधि आटपून खोलींत परत आलों तों नोकरानें सर्व जिनसा जेथल्या तेथें लावून साफसूफ करून ठेविलें होतें. मग स्मश्रू करवून स्नान करण्याच्या विचारांत होतों. परंतु स्ना-नगृहें सर्व अडलेलीं असून पुष्कळ मंडळी खाकेंत अंग पुसण्या-चा रुमाल व दुसरे आवश्यक कपडे घेऊन प्रवेशोत्सुक अशी प्र-तीक्षमाण दृष्टीस पडली.

तेव्हां तो नाद सोडून देऊन खोलींत परत येऊन वस्त्रान्तर करून वरच्या मजल्यावर गेलों, तों मोठा अपूर्व देखावा नजरेस पडला. पूर्वदिशेस मरीचिमाली क्षितिजावर येऊन आपलीं किरणें चहूंकडे प्रेरित करीत आहे. नीलवीचिसमूह मृदुपवनानें विभिन्न होऊन मन्दान्दोलन करीत आहेत व सू-र्याचें तेज त्यांत प्रतिफलित झाल्या कारणानें साल्हादमुद्रा द-र्शवीत आहेत. सर्व बाजूंस सृष्टि जलमय दिसत होती व त्या विस्तीर्ण उदधिपीठावर आमची आगबोट केवळ बिन्दुमात्र वाटत

होती. वायु मंदगति व समुद्र शांत असल्या कारणानें नौकेस बि-लकुल धक्का लागत नव्हता. अशा समयीं रात्रीच्या उष्म्यानें झा-लेल्या अस्वास्थ्याचा सर्व परिहार झाला व मनाला उत्साह वाटला.

## वरच्या मजल्यावरील पुरुष मंडळी.

खलाशी लोक जमीन वगैरे सर्व भाग धुऊन साफ करण्यांत गुंतलेले होते. पुष्कळ लोक इकडे तिकडे हवा खाण्यासाठीं फिरत होते. परंतु त्यांनीं रात्रीचे कपडे बदलले नव्हते. एक अंगांत कोट व मांडीला विजार एवढीच काय ती वस्त्रसामुग्री. पायांत मोजे, बूट, कांहीं नाहीं. डोक्याला टोपी कांहींच्या होती व कांहींच्या नव्हती. हें पाहून मला मोठा चमत्कार वाटला. ह्या लोकांस जर दिवसांतून एक कलाक तरी अनवाणी फिरण्याची अवश्यकता वाटते तर आमचा देश बोलूनचालून ऊष्णकटिबंधांत, तेव्हां आह्मी मोकळ्या पायांनीं फिरल्यास आह्मांला रानटी ह्मणण्याचा ह्यांस काय अधिकार आहे हें समजत नाहीं. जर हस्तपादादि आपले अ-वयव अपरीच्छन्न स्थितींत दुसऱ्यास दाखविणें हें अनाचार-शिष्टतेचें सूचक मानतात तर कालविशेषीं तरी त्याच दोषास आ-पण कसे पात्र होतात! इतकें सांगणें अवश्यक आहे कीं स्त्री-वर्गाची मंडळी त्या कालीं वर आलेली नव्हती. आगबोटीचा असा नियम आहे कीं सकाळीं ८ वाजत तोंपर्यंत गृहस्थमंड-ळीस लघुवस्त्रांनीं फिरण्यास मोकळीक आहे. आठांची घंटा झाल्याबरोबर अशा स्थितींत फिरण्याची परवानगी नसते. ह्मणून कदाचित् पुरुषासमोर शिष्टाचाराचें उल्लंघन त्यांच्यांत खपत असेल असें अनुमान होतें.

## आगबोटीवरची व्यवस्था.

असो; कांहीं वेळ इकडे तिकडे हिंडून मग आगबोटीचे सर्व भाग पहाण्याच्या हेतूनें इतस्ततः भ्रमण्यास आरंभ केला. वरच्याच मजल्यावर कप्तानाची खोली होती. दुसऱ्या वर्गाच्या मंडळीस जी फिरण्याची जागा होती ती फार गैरसोईची होती. तिच्या एका बाजूस स्वयंपाकगृह व दुसऱ्या बाजूस खाटिकाचें दुकान; त्याचप्रमाणें कुत्रे वगैरे ठेवण्यास सोय त्याच बाजूला होती. पुढच्या टोंकास खलाशी वगैरे नोकरांची रहाण्याची जागा होती. ही अगदींच वरच्या मजल्याची व्यवस्था. त्याच्या खालच्या मजल्यावर पहिल्या वर्गांतील उतारूंच्या राहण्याच्या खोल्या, भोजनगृह, स्नानगृहें, आगबोटींतील कामगारांच्या खोल्या, पोष्टहापीस वगैरे. ह्याच्या खालच्या मजल्यावर दुसऱ्या वर्गांतील उतारूंच्या खोल्या होत्या; व याच्याही खालीं सामान, माल वगैरे ठेवण्याची जागा होती. आगबोटीच्या सुमार मध्यभागीं सर्व चालक यंत्रांचा कारखाना होता. ह्या ठिकाणीं स्वच्छ हवा पोहोंचण्याकरितां वायुवाहक कापडाचे बंब वरपासून खालपर्यंत लोंबत ठेविले होते. सर्व आगबोटीच्या बुडाशीं एक लांब लोहस्तंभ असतो. ह्याचा संबंध आगबोटीच्या पृष्ठभागास जो चालककील ( स्क्रू ) असतो,–ज्याच्यामुळें सर्व आगबोट चालते –त्याच्याशीं असतो. ह्या लोहस्तंभाला गति वाफेचीं यंत्रें चालू असतात त्यांपासून प्राप्त होते. आगबोटीवरच लोहार, सुतार, घिसाडी इत्यादि सर्व प्रकारचे कारागीर असतात. ह्यामुळें केव्हांही प्रसंग पडल्यास मोडतोड दुरुस्त करून घेतां येते. वरून खालच्या मजल्यावर प्रकाश पडण्याकरितां

कांहीं कांहीं ठिकाणीं वरील काष्टफलकाच्या भूमिकेंत जाड कांचे-चे तुकडे बसविलेले असतात. सर्वत्र टापटीप व व्यवस्था उत्तम प्रकारची दिसून येते; व पहिल्या वर्गाच्या उतारूंच्या सोईकरितां श्रम घेण्यांत नोकरलोक बिलकुल कसर करीत नाहींत.

## प्रातरुपहार.

हें पाहण्यांत कांहीं काल निघून गेल्यावर साडे आठांची घंटा जाहली. ही घंटा कपडे करून प्रातरुपहाराची तयारी करण्याची सूचक होती. तेव्हां बहुतेक गृहस्थ व स्त्रिया तयार होऊन दुसऱ्या घंटेची वाट पहात बसल्या, दुसरी घंटा नऊ वाजतां जाहली. तीबरोबर सर्व मंडळी खालीं जाऊन मेजाशीं बसली. ह्या प्रसंगीं पूर्वनिर्दिष्ट घंटावादन वगैरेचा प्रकार दिसून आला नाहीं. पक्वान्नांच्या यादी मेजावर टेविलेल्या होत्या. त्या पाहून ज्यास जें पाहिजे तें तो मागून घेई. ह्यावेळेस साहेबलोक चहा किंवा नुस्तें पाणीच पितात. ह्या विधीस अवधीही फार लागत नाहीं. साडेनवांच्या सुमारास मंडळी फिरून वर आली. मग कोणी पुस्तकें घेऊन मनोरंजन करीत बसले. कोणी धूम्रपानगृहांत जाऊन तेथें गंजिफांचे डाव मांडिले. कांहीं स्त्रिया लोंकर विणीत बसल्या. कांहीं परिचित पुरुषांशीं संभाषणांत गुंग झाल्या होत्या. एकंदरींत बायकांचें महत्व विशेष दृष्टीस पडलें. कोणी साहेब हातांत खुर्ची व खुर्चीवर घालण्याची लहानशी गादी घेऊन एका ललनेच्या पाठीमांगं जात आहे; व तिनें निर्दिष्ट केलेल्या स्थळीं खुर्ची मांडून ती सुखोपविष्ट झाली असें पाहून कृतकृत्यतादर्शक मुद्रेनें इकडे तिकडे पहात आहे. इतक्यांत कांहीं वेळानें स्थानांतर करण्याची

हुकूी येऊन मडमसाहेब उठतात व दुसऱ्या स्थानीं विराजमान होतात. स्त्रीपुरुषांच्या संभाषणांत आमच्या समजुतीप्रमाणें जी मर्यादशीलता स्त्रियांना अवश्यक आहे ती दिसून येत नव्हती. जनसमूहांत मोठ्यानें हंसणें, बोलणें इत्यादि प्रकार जे आमच्या दृष्टीनें सभ्यतेशीं विसंवादी आहेत, त्यांत त्यांच्या दृष्टीनें कांहीं दूषणीय नाहीं असें वाटलें. बहुतेक स्त्रियांची नेहेमींची तऱ्हा ह्मणजे मोठ्या तोऱ्यानें व डौलानें बोलणें, किंचित् अस्वस्थता झाल्यास तिचें अवडंबर माजविणें, ही दृष्टीस पडली. दोनतीन स्त्रिया माझ्या दृष्टीला फारच चांगल्या वाटल्या. त्या नेहेमीं आपला पति व आपलीं मुलेंबाळें ह्यांच्याशींच सहवास ठेवीत. त्या लोकांत विवाहित स्त्रियांना पतीशिवाय अन्यपुरुषाशीं मोकळेपणानें न बोलण्याचा निर्बंध नाहीं, व कुमारिकांस तर त्याहूनही नाहीं. एक मडम होती तिच्याबरोबर एक पोपट होता; तो नेहेमीं तिच्याजवळ असे. जेवतांखातांना, बसतांउठतांना नेहेमीं त्याची संगति अव्याहत होती. त्याचें ती चुंबन करी, त्याला मोकळा सोडून चालवी, इत्यादि अनेक प्रकारांनीं त्याचें ती कौतुक सर्वांसमक्ष करी. हा प्रकार पाहून मलाच नाहीं, तर दुसऱ्या कित्येक साहेबलोकांसही हसूं येत होतें; व कोणी आपापल्यांत तिची थट्टाही करीत. अशा प्रकारची कांहीं मौज पाहून मी स्नानास गेलों.

## स्नानाची सोय.

आगबोटीवर गांवठी हजाम होता, त्याकडून स्मश्रू करवून स्नानगृहांत प्रवेश केला. तेथें एक संगमरवरी पाषाणाचें कुंड होतें. त्याच्या बुडाशीं एका बाजूस एक छिद्र होतें व तें बंद करण्याकरितां एक झांकण होतें. कुंडा-

च्या एका बाजूस दोन तोट्या होत्या. एकांतून उष्ण व एकांतून शीत उदक येत होतें. पण हें सर्व क्षारोदक होतें. कुंडाच्या दुसऱ्या अंगास एक फळी होती तिजवर एका पात्रांत मधुरोदक ठेविलें होतें. ह्या दोन प्रकारच्या जलांची योजना समजेना ह्मणून त्या वेळेस कसा तरी उपयोग करून मागाहून एका गृहस्थास विचारलें तेव्हां त्यानें त्यांची योजना अशी सांगितली कीं अंगाच्या शिरोभागाकरितां मधुरोदक व इतर भागांकरितां क्षारोदक. ह्या व्यवस्थेचें मी विशेष अनुकरण केलें नाहीं. मी प्रथम क्षारजलानें अंग धुऊन नंतर सर्वांगावर मधुर जलाची योजना करीत असें आणि तीच मला सुखावह वाटली. ह्याप्रमाणें स्नान आटपून उपहारादि विधि उरकला व फिरून वर आलों. कांहीं काल भगवद्गीता वगैरे वाचण्यांत घालवून थोडी निद्रा घेतली. नंतर एक वाजतां फिरून घंटा झाली. ती त्यांची माध्यंदिनोपहाराची वेळ. हा विधीही साधारण प्रातरुपहाराप्रमाणेंच चालतो. नंतर फिरून मंडळी वर येऊन पूर्वोक्त कालक्रमणाचे उपाय योजितात. चार वाजतां आणखी एकदां चहा होतो. सायंकालचा समय झाला तेव्हां फिरणाऱ्या मंडळीची गर्दी उडून गेली. बहुतेक मंडळी ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत अतिशय वेगानें परिक्रमण करूं लागली. उद्देश व्यायाम होऊन क्षुद्दीपन व्हावें. नंतर पूर्वोक्त व्यवस्थेप्रमाणें रात्रीचा भोजनविधि. ह्याप्रमाणें पूर्ण एका दिवसाची हकीकत झाली. सर्व विचार करितां असा मनाचा ग्रह झाला कीं आगबोटीवर दिवस काढणें ह्मणजे केवळ सकाळपासून संध्याकाळपर्यंत खाणें, पिणें आणि निजणें ह्या व्यापाराशिवाय दुसरें कांहीं

नाहीं. अशा तऱ्हेनें मला सुएझपर्यंत ह्मणजे एकसारखे दहा अकरा दिवस आगबोटींत काढावयाचे होते; तेव्हां ते कसे जातील ह्याची मला काळजी पडली. त्या मंडळींपैकींही कांहीं कंटाळलेली दिसत होती. परंतु कांहीं असे खप्पी होते कीं ही चैन एकसारखी वीसपंचवीस दिवस भोगतां यावी म्हणून त्यांनीं थेटचीं तिकिटें काढिलीं होतीं. एका गृहस्थानें तर मला असें सांगितलें कीं त्याला हिंदुस्थानांत कामाचा फार कंटाळा आला होता तेव्हां विश्रान्ति घेण्यास्तव त्यानें थेट लंडनचें तिकीट काढलें होतें.

## मुंबईपासून एडन पर्यंत.

मुंबईहून निघाल्यापासून सातवे दिवशीं पहाटेस आह्मी एडन मुक्कामीं पोहोंचलों. पहिल्या चार दिवसांत आह्मांस जमिनीचें बिलकुल दर्शन झालें नाहीं. एकसारखें सर्व जलमय दिसत होतें व त्यामुळें दृक्पातास विषयवैचित्र्य नसल्यामुळें निर्वेद उत्पन्न झाला. अशा स्थितींत एकतानतेचा भंग करून मनोरंजन करण्यास यत्किंचितूही पुरे होतें. कांहीं समयीं दुसऱ्या नौका दृष्टीस पडल्या तर सर्व आगबोटभर त्यांशिवाय दुसरा कांहीं संभाषणविषयच नव्हता. त्यांपैकीं कांहीं आमच्याचसारख्या उतारूंच्या आगबोटी होत्या व एक आरबी लोकांचें जहाज होतें. ह्या जहाजासंबंधानें लोकांनीं बराच तर्क चालविला. आरबस्थानाच्या किनाऱ्यावर गुलामांचा व्यापार तुरळक सुरू आहे, तेव्हां हें जहाज तत्संबंधीं असावें असा कोणी तर्क करून तद्विषयक चर्चा करीत. कांहीं लोक, ज्यांची कल्पना अहितेकदृक् नव्हती, ते जहाज कोणा—

तरी खजुराच्या व्यापाऱ्याचें असावें असें ह्मणून स्वस्थ बसत. कांहीं प्रसंगीं माशांचे थवे पाण्यांतून वर उडतांना दृष्टीस पडत त्यांचेंही सकुतूहल अवलोकन करण्याकरितां स्त्रीपुरुषांची गर्दी जमे. पांचवे दिवशीं आरबस्थानाच्या किनाऱ्यावरील पहाड आमच्या नजरेस पडले; तेव्हां एक प्रकारचा मनाला आल्हाद झाला.

मी पहिल्याप्रथम आगबोटीवर चढलों, तेव्हां ज्या मंडळी-बरोबर मी गेलों होतों त्यांशिवाय माझ्या परिचयाचीं दुसरीं माणसें नव्हतीं. मी कोणाशीं परिचय करण्याचा यत्न केला नाहीं. तथापि दिवसानुदिवस कांहीं मंडळींशीं संभाषणादि प्रकार सुरू झाले. आज एक, उद्यां दोन, असें करितां करि-तां आगबोटीवरून उतरून जाईतोंपर्यंत दहापंधरा गृहस्थांशीं माझा परिचय झाला. भाषण सुरू करितांना पहिला प्रश्न माझी ही विलायतची पाहिली सफर का दुसरी, हा. त्यानंतर माझी जात कोण, व त्यासंबंधानें माझ्या जाण्यास कांहीं प्र-त्यवाय होता किंवा काय, व असल्यास त्याचें निवारण कसें करण्याचें योजिलें होतें वगैरे. ज्यांचा हिंदुधर्माच्या सद्यःस्थि-तीविषयीं फारसा अनुकूल अभिप्राय नव्हता ते ह्मणत कीं, त्यांत काय आहे, परत गेल्यावर कांहीं ब्राह्मणांस भोजन व दक्षिणा यांचें दान केल्यानें परत जातींत जाण्यास कांहीं प्रत्य-वाय येणार नाहीं. कोणी ह्मणत कीं, अशा प्रसंगीं तुह्मी मन घट्ट करून जुन्या मताच्या मंडळींशीं चांगली टक्कर मारा, व भित्रेपणानें त्यांच्या वाष्कळ सांगण्यास वश होऊं नका. अ-शा सर्व गृहस्थांबरोबर मी वादविवाद करून असें प्रतिपादन करीं कीं, हिंदुधर्माविषयीं त्यांची जी प्रतिकूल समजूत झाली

आहे हें फल आमच्यांतील सुधारक ह्मणविणारांनीं कोत्या समजुतीनें केलेल्या कर्णदूषणांचें आहे. जर हिंदुधर्माचें खरें तत्व जाणणाऱ्या लोकांशीं त्यांचा कांहीं तरी संबंध झाला असता तर त्यांच्या तोंडांतून त्या धर्माचीं निर्भर्त्सनाव्यंजक वाक्यें आलीं नसतीं. कोणी मंडळी ह्मणत कीं, ह्या सर्व गोष्टी समजुतीच्या आहेत, तेव्हां शिकलेल्या माणसानें केवळ लोकसमजुतीसाठीं आपणांस पुढें पाऊल टाकण्याची संधि आलेली दवडूं नये. मी ह्मणें कीं, ही संधि पुढें पाऊल टाकण्याची खास, परंतु पुढें पाऊल टाकण्याच्या रीतीविषयीं मात्र मतभेद आहे. लोकांच्या समजुतीप्रमाणें आवश्यक विधी न करितां तसेंच राहाणें ह्मणजे जनसमूहाचें मन दुखवून सुधारणेची पीच्छेहाट करण्यासारखें आहे. अशाच दांडगाईच्या कृत्यांनीं आमच्या सुधारक ह्मणविणाऱ्या लोकांनीं बरीच हानि केली आहे. तर अजून तरी जागृत होऊन मार्गाची वक्रता सुधारण्यास अवकाश नाहीं असें नाहीं. असो; ह्याप्रमाणें बरीच भवति नभवति चालत होती व असें दिसून आलें कीं, माझ्याशीं बोलणाऱ्या बऱ्याच मंडळींचा ग्रह माझ्याशीं बोलल्यानंतर कांहीं अंशीं तरी बदलला होता.

ज्या मंडळीशीं माझा परिचय झाला ह्मणून सांगितलें त्या सर्वांमध्यें प्रसिद्ध डाक्तर हंटरसाहेबांनीं ज्या गोष्टी मला सांगितल्या त्या माझ्या मनाला फारच हितकर व आस्थेच्या अशा वाटल्या. माझा व डाक्तर साहेबांचा पूर्वपरिचय नव्हता. एके दिवशीं सुमारें सायंकालच्या समयीं मी आपल्या खुर्चीवर इजिप्त देशाची माहिती वाचीत बसलों असतां डाक्तरसाहेबांनीं जवळ येऊन मी काय अवलोकन करीत आहें वगैरे

चौकशी केली. आगबोटीचा प्रवास व राहण्याची तऱ्हा मला कशी काय पसंत आहे ह्मणून त्यांनीं विचारिलें, तेव्हां मी माझें मत असें सांगितलें:—" मला येथें सर्व गोष्टी प्रतिबंधक वाटतात. आह्मांला नेहेमीं ढिले कपडे घालून फिरण्याची संवय ; तेव्हां मोजे, दिजार, बूट वगैरे सरंजाम फार दुःखदायक वाटतो. दुपारीं कपडे निराळे, संध्याकाळीं निराळे, रात्रीं निराळे, अशा प्रकारची व्यवस्था आमच्यासारख्या आरामाभिलाषी लोकांस सुखकर वाटत नाहीं " वगैरे. त्यांनीं असें वाटणें साहजिकच आहे असें ह्मटलें. त्यांनीं मुंबई इलाख्यासंबंधानें पुष्कळ व्यक्तींविषयीं, समजाविषयीं, धर्मपंथांविषयीं, राजकीय मंडळ्यांविषयीं, प्रार्थनासमाज, ब्रह्मसमाज, यांच्या स्थितीविषयीं व कार्यव्याप्तीविषयीं पुष्कळ चौकशी करून नंतर खुद्द मला उपदेशपर तीन महत्वाच्या गोष्टी सांगितल्या; ( १ ) मद्यपानाचा निषेध; ( २ ) आपल्या देशाचा व चालीरीतींचा अभिमान व आपल्या देशी वेषाचें परदेशीं रक्षण; व ( ३ ) आप्तजनांशीं विरोध न करितां पूर्ववत् वर्तन ठेवणें, व त्यांच्या समजुतीप्रमाणें आवश्यक विधि करून जातींत परत जाणें. शेवटच्या मुद्यासंबंधानें त्यांनीं असें ह्मणून दाखविलें कीं, ह्या गोष्टीची थट्टा करणें हें अदूरदर्शित्वाचें सूचक आहे. त्यांनीं सांगितलेल्या सर्व गोष्टी माझ्या मनांत नेहमीं घोळत व त्यामुळें माझा तत्संबंधानें पूर्वकृतसंकल्प फार दृढ झाला. असो; ह्याप्रमाणें पुरुषमंडळींशीं झालेल्या परिचयाची हकीकत झाली. स्त्रियांशीं कधीं भाषण देखील करण्याचा प्रसंग पडला नाहीं. त्यांच्या स्त्रीजातीस राजा ह्मणजे मोठी अपूर्व गोष्ट वाटे. आगबोटीवर कोणी संस्थानिक आहे अशी बातमी

सर्वांस कळल्यावर त्यासंबंधानें बरीच चर्चा होत असे. आपल्यांतील राजे ह्मणजे त्यांच्याजवळ जवाहीर फार अशी समजून व जवाहीर ह्मणजे स्त्रीजातीला त्यांच्यांत देखील फार प्रिय, तेव्हां ह्यामुळें राजांविषयीं आस्थापूर्वक त्यांची वर्तणूक असणें स्वाभाविकच होतें. ह्यासंबंधानें कांहीं मंडळींचे विलक्षण विचार माझ्या ऐकण्यांत आले. एक बाई दुसऱ्या बाईस सांगत होती कीं, "आपल्या आगबोटीवर एक राजा आहे." दुसरीनें कौतुकसूचक स्वरानें "खरेंच का?" ह्मणून विचारलें. पहिलीनें "हो" ह्मणून आणखी असें विशेष सांगितलें कीं, "तो के. सी. एस्. आय. आहे" तेव्हां दुसरीनें प्रत्युत्तर दिलें कीं, "त्यांत काय आहे! राणीला नजरनजराणा दिला ह्मणजे कोणाला कशाही पदव्या मिळतात!!"

एडनास पोहोंचण्याच्या अगोदर वाटेंत एक रविवार पडला. ख्रिस्ती धर्माच्या मताप्रमाणें तो दिवस फारच पवित्र मानलेला आहे हें आपणां सर्वांस ठाऊकच आहे. त्या दिवशीं जरी मंडळी मार्गस्थ होती तरी प्रार्थना करण्याचा थाट कप्तानाच्या हुकुमावरून मांडला होता. एक बाजाची पेटी आणून सर्व खुर्च्या एके ठिकाणीं जमवून बायका, मुलें व पुरुष प्रार्थनेचीं पुस्तकें हातीं घेऊन तयार झालीं, व नेहेमींप्रमाणें गुडघे टेकणें, उठणें, बसणें इत्यादिसहित प्रार्थना शेवटास गेली. मला ही रीति फार प्रशंसनीय वाटली. हा सर्व विधि श्रद्धापूर्वक झाला असो किंवा नसो. अशा प्रकारच्या विधीचें बंधन कायम ठेवणें माझ्या मतें फार श्रेयस्कर आहे. त्यामुळें कुटुंबव्यवस्था एक प्रकारच्या चांगल्या धोरणानें चालूं शकेल

असें माझें मत आहे. आतां ह्या स्थलींही कांहीं मंडळी उघडपणें अश्रद्धालुत्व दर्शवीत होती. कांहीं गृहस्थ ह्या समाजाकडे पाठ करून पुस्तकें वाचीत बसले व कांहीं धूम्रपानगृहांत जाऊन वातायनस्थ होऊन प्रार्थना करणाऱ्या मंडळीकडे पाहून हंसत होते. परंतु अशा मंडळींची संख्या फार थोडी होती. ह्या दिवशींच सर्व आगबोटीवरच्या नोकरांची हजेरी झाली व आग विझवण्याच्या साहित्याची तयारी बरोबर आहे किंवा नाहीं ह्याच्या परिक्षणार्थ आग लागली आहे अशी कल्पना करून तत्संबंधीं सर्व व्यापार खलाशांकडून करविले. खलाशी लोकांस तरबेज राखण्याकरितां ही व्यवस्था नियमित कालीं करण्याचा दस्तूर आहे.

आह्मीं ज्या दिवसांत गेलों तो वसंतऋतूचा समय होता व जरी आमचें तत्कालीन गृह ऐन समुद्रांत होतें व चहूंबाजूंनीं वायूस अप्रतिहत वेगानें संचार करण्यास अवकाश होता, तरी उष्मा बराच होऊं लागला. मुंबई सोडल्यानंतर थंडी पडूं लागेल ह्या भयानें तन्निवारणार्थ ऊर्णावस्त्रांचीच योजना मी केली होती. परंतु कार्पासवस्त्रांची जेव्हां गरज वाटूं लागली तेव्हां तद्भावामुळें फारच गैरसोय झाली. रात्रीं तर कपडे घालून निजण्याची सोयच नाहींशी झाली. जसजसे आह्मीं उत्तरेकडे जावयास लागलों तसतसें कालमान फिरत चाललें. रोज घड्याळ १५–२० मिनिटें मागें हटवावें लागे.

## एडनबंदर.

सातव्या दिवशीं पहाटेस जागा झालों तों आगबोटीच्या

आजूबाजूस कलकलाट ऐकूं आला; तेव्हां असें अनुमान झालें कीं एडन मुक्कामीं आगबोट पोहोंचली असावी. परंतु उषःकाल होईपर्यंत मी उठलों नाहीं. तसाच पडून राहिलों. उजाडल्यावर प्रातर्विधि आटपून नेहमींप्रमाणें वर गेलों तों आगबोटीवर एकच गर्दी उडून गेली होती. एकीकडे यारीवर व्यापारी लोकांचा माल उतरण्याची धामधूम चालली होती. मुसलमान खलाशी लोक विशेषतः या कामांत गुंतलेले होते व श्रमविनोदार्थ हेल काढून गाणीं ह्मणत होते. दुसरीकडे राहिलेल्या सफरीसाठीं सर्व सामुग्री जमा करण्यांत कांहीं लोक व्यापृत होते. ह्या मुक्कामीं कोळसे, मासे वगैरेचा पुरवठा करण्याची चाल आहे. आगबोटीच्या पृष्ठभागीं दोन्ही बाजूंस तीनतीन चारचार हात लांबीच्या अरुंद होड्यांत बसून तोंडानें एक प्रकारचा विलक्षण शब्द करीत सिद्दी लोकांचीं पोरें जमलीं होतीं. ह्यांच्या हातांत सुमारें दीड हात लांबीचीं वल्हीं होतीं. त्यांच्यायोगानें जलावर आघात करून उतारूंचें लक्ष आपल्याकडे आणण्याचा ते यत्न करीत, व लोकांची नजर त्यांच्याकडे गेली ह्मणजे "हॉव्ह आ डाईव्ह हो हो" असा शब्द करीत. ह्याचें तात्पर्य असें कीं "आमच्या बुडी मारण्याची गम्मत पहा." ज्यास ही करमणूक हवीशी वाटे ते लोक समुद्रांत चवली किंवा पावली टाकीत. त्याबरोबर आसपासच्या होड्यांतील मुलें एकदम बुडी मारून ती काढण्याचा यत्न करीत व ज्याचा यत्न सफल होई तो तत्सूचक मुद्रेनें ती चवली किंवा पावली जिभेवर ठेवून दाखवी. कांहीं मुलें आगबोटीवर चढून येत व मंडळीस कांहीं नाणें टाकण्यास विनंति करीत; व आगबोटीच्या उच्चतम भागापासून

खालीं उडी टाकून नाणें काढण्याचा वायदा करीत. परंतु ह्या कामाकरितां एरव्हींच्या दुप्पट तिप्पट रक्कम मागत. तसा देणारा कोणी भेटला तर तितक्या उंचीवरून उडी मारून नाणें काढून घेत. कधीं कधीं असेंही होई कीं, ह्या मुलानें वरून उडी मारून नाणें घेण्याच्या अगोदरच खालीं असलेला कोणी पटादिशीं बुडी मारून त्याचा भाग चळकावून वसे. मिळविलेलें द्रव्य सर्व मुलें गालफडांत घालून ठेवीत. ह्या सर्व मुलांस पाणी ह्मणजे बिशाद वाटत नव्हतें. त्यांचा कृष्णवर्ण, त्यांचीं नकटीं नाकें, उघडीं डोकीं व त्यांवर वायूनें हळूहळू हलत असलेले बुटके व कुरळे केश, कटिप्रदेशखेरीज करून सर्व शरीर वस्त्रहीन, व वदनाच्या कृष्णतेमुळें विशेष विलक्षण व भयंकर दिसणारी शुभ्र दंतपंक्ति—ह्या सर्व गोष्टींमुळें प्रेक्षकांस मोठी मौज वाटण्यासारखा तो देखावा होता. कोणी असे शोकी होते कीं ते पैसे खर्च न करितां गम्मत करण्याचा यत्न करीत. जस्त किंवा कथलाचे तुकडे जमा करून चवली ह्मणून फेंकीत व त्यामुळें तीं मुलें एकदोनदां फसत. परंतु एकदां त्यांनीं माणसें ओळखलीं ह्मणजे मग त्यांकडे दुर्लक्ष करीत व फसविल्याबद्दलची निंदा करून क्रोधदर्शक मुद्रेनें आपल्या भाषेत अस्पष्ट रीतीनें शिव्या दिल्यासारखें करीत. दुसरीकडे कांहीं मंडळी तत्स्थानीय चमत्कारिक वस्तूंची खरेदी करण्यांत गर्क होती. एकदोन सिद्दी व्यापारी, दोनचार यहुदी व एकदोन आरब नानातऱ्हेच्या जिनसा घेऊन आगबोटीवर आले होते. त्यांपैकीं कांहीं जिनसा चिनी, कांहीं जपानी व कांहीं हिंदुस्थानी होत्या; तरी त्या सर्व एडनच्या असा ग्रह उत्पन्न करण्याचा यत्न त्यांनीं चालविला होता, व तो व्यक्तिविशेषीं सफलही

होत असे. कोणी कांहीं तऱ्हेचे रुमाल व चादरी, रेशमी व सुती आणल्या होत्या. कोणी शहामृगाचीं अंडीं व पिसें आणिलीं होतीं. हीं पिसें फार मऊ व सुरेख दिसत होतीं व ह्यांवर युरोपियन स्त्रियांच्या फार उड्या पडत होत्या. ह्या पिसांचा उपयोग पंखे करण्याकडे फार करितात. कोणी नानातऱ्हेचे शंख व शुक्तिका आणिल्या होत्या. कोणी मोठ्या माशांच्या पाठीचे कणे आणिले होते. ह्यांची रुंदी चारसहा बोटें असून दोहों बाजूंस कांटे कांटे होते. कोणी सांबराचीं व हरिणाचीं शिंगें आणिलीं होतीं, कोणी स्थलविशेषांचीं व व्यक्तिविशेषांचीं चित्रें आणिलीं होतीं. ह्या ठिकाणीं इंग्रजी नाण्याचा व्यवहार दृष्टीस पडला. रुपये जरी चालत होते तरी त्यांची इंग्रजी नाण्यांच्या मानानें कमी किंमत येत होती.

ह्याप्रमाणें आगबोटीवरची हकीकत झाली. दुरून एडन बंदर व गांव नजरेस पडत होतें. कांहीं लोक पहाटेसच उठून आगबोटीवरून उतरून गांवांत गेले होते. आगबोट सूर्योदयानंतर लवकरच निघणार होती व पहाटेस उठून उतरल्यास गांव नजरेस पडणार नाहीं म्हणून आम्हीं उतरलों नव्हतों. गांवाचा जेवढा भाग आगबोटीवरून दृग्गोचर होत होता त्यावरून त्या प्रदेशाच्या रमणीयतेबद्दल आमचा फारसा अनुकूल ग्रह झाला नाहीं. वृक्षहीन अशी क्षुद्रपर्वतावली व तिच्या पायथ्याशीं कांहीं तंबू व घरें दिसत होतीं. त्या टेकड्यांवर किल्ले बांधलेले दृष्टीस पडत होते, व कांहीं बांधण्याचें काम सुरू होतें. लोकांच्या सांगण्यावरून ह्या ठिकाणीं दर्शनीय कांहीं नाहीं. रानटी लोक, पाण्याचा तोटा, रुक्ष हवा ह्या आनुषंगिक गोष्टींवरून प्राकृत दृष्टीस ह्या स्थलीं रममाण होण्यास अवकाश मुळींच

दिसत नव्हता. येथें समुद्रांतील क्षार जलाचे मधुरीकरणाचा प्रयोग व अशा रीतीनें तयार झालेल्या मधुर जलाच्या संचयार्थ बांधलेले जलाशय पहाण्यासारखे आहेत असें ह्मणतात. त्याचप्रमाणें तेथील पर्वतशिलांची आभ्यंतर रचनाही कांहीं विशेष प्रकारची आहे असें मला एका चांगल्या गृहस्थानें सांगितलें.

## तांबडा समुद्र.

एडनहून सुमारें सकाळचे ९ वाजतां आगबोट निघाली सुमारें दोन प्रहरांनीं पेरिमचा किल्ला टाकून आह्मीं तांबड्या समुद्रांत शिरलों. एका बाजूनें बऱ्याच लांबीवर किनारा दृष्टीस पडत होता. पाण्याच्या रंगांत फरक दृष्टीस पडला नाहीं. आरबी समुद्रा इतकें खोल पाणी नसावें असें मात्र वाटलें. असें अनुभवास आलें होतें कीं, जेथें पाणी फार खोल तेथें रंग निळा व जेथें उथळ तेथें रंग हिरवा. तांबड्या समुद्रांत कांहीं कांहीं ठिकाणीं भुरकट रंग दिसे. हवा उष्ण भासूं लागली व त्यामुळें अस्वस्थता वाटूं लागली. सर्व लोक मला पूर्वी असें सांगत होते कीं, तांबड्या समुद्रांत उष्मा नेहमीं फार होतो. ह्याचें कारण असें सांगतात कीं, ह्या समुद्राच्या एका बाजूस आफ्रिकेंतील वालुकामय प्रदेश आहे, व दुसऱ्या बाजूस आरबस्थानांतील पहाड आहेत, ह्यामुळें हवा नेहमीं उष्ण रहाते व तिला शैत्याचा संस्कार होत नाहीं.

जसजसे आह्मीं सुएझच्या जवळ जवळ जाऊं लागलों तसतशी उष्णता कमी भासूं लागली व हवेंत थंडपणा वाटूं लागला. एडनहून निघाल्यावर दुसरे दिवशीं दोन रशियन जहाजें

दृष्टीस पडलीं. तीं पाहून सर्व लोकांचे तद्विषयक तर्क सुरू झाले. एक गृहस्थ म्हणाला कीं, समुद्राच्या बाजूस असलेलीं कांहीं निर्जन द्वीपें हस्तगत करून घेण्याच्या इरायानें हीं जहाजें फिरत असावीं, व तसें झालें ह्मणजे मग इंग्रज लोकांस ही गोष्ट सहन न होऊन परस्परांविषयीं धुमसत असलेला विपरीत भाव अधिक होण्याचा संभव आहे. बहुतेकांचा तर्क ह्याच दिशेकडे धांवत होता. परंतु दुसऱ्या एका चांगल्या गृहस्थानें मला खात्रीपूर्वक सांगितलें कीं हीं जहाजें चिनी समुद्राकडे रशियाचा कांहीं मुलुख आहे तिकडे चाललीं आहेत. ह्याच दिवशीं सायंकालीं बंगालप्रांतांतील एका सिव्हिलियनाचरोबर हिंदुस्थानाच्या राजकीय स्थितीबद्दल मोठा वादविवाद झाला. लार्ड रिपन साहेबांची कारकीर्द व तत्संबंधानें झालेल्या सर्व गोष्टींविषयीं उल्लेख करून त्यांनीं असें म्हटलें कीं त्यांचा अभिप्राय येथील लोकांस हक्क देण्याच्या विरुद्ध बिलकुल नाहीं. परंतु इंग्रजी धर्तीवर सर्व हक्कांचा उपयोग करून घेण्याची ताक़द आमच्या लोकांन आली नाहीं, वगैरे वगैरे. ह्या सर्व गोष्टींसंबंधानें सर्व वर्तमानपत्रांतून ऊहापोह झालाच होता, त्याप्रमाणें मी त्यांच्या विरुद्ध पक्ष स्वीकारून त्याचें यथामति समर्थन केलें. ही व ह्याचप्रमाणें वर सांगितलेल्या दुसऱ्या गोष्टी माझ्याशीं त्या लोकांचें कसें वर्तन होतें ह्याच्या सूचनार्थ येथें निवेदन केल्या आहेत.

## सुएझ.

एडनहून निघाल्यापासून पांचव्या दिवशीं ह्मणजे मुंबईहून निघाल्यापासून अकरावे दिवशीं दुपारचे पावणेतीन वाजतां

आह्मीं सुएझ मुक्कामीं पोहोंचलों. अकरा दिवस एकसारखें आगबोटीवर राहिल्यानें फारच कंटाळा आला होता. यामुळें नौकावरोहणाचा खेद न वाटतां उलट फारच आल्हाद वाटला. दुरून जो प्रदेश नजरेस पडला तो फार रखरखीत व उजाड दिसत होता. किनाऱ्यावर एकदोन बंगले दिसत होते; परंतु त्यांच्या आजूबाजूस झाडझाडोरा बिलकुल नसल्याकारणानें फार रूक्ष दिसत होतें. अशी जरी स्थिति होती तरी लोहकाष्टमय जलमंदिर सोडून मेघानभिवृष्टसिकत अशा वनस्थलीमध्येंही विहार करण्याची इच्छा प्रबल झाली. सुएझपासून पुढें कुक कंपनीमार्फत आह्मीं तिकिटें घेतलीं होतीं. म्हणून सुएझ मुक्कामीं पोहोंचल्याबरोबर त्या कंपनीचा गुमास्ता आमच्या मंडळीचा शोध करींत आला. ह्या मनुष्याचा आम्हांस फार उपयोग झाला. हा जातीचा आरब असून त्याची आकृति उंच व धिप्पाड होती. वर्ण काळा, डोळे बारीक, पायांत बूट, मांडीला एक अघळपघळ विजार बुटापर्यंत पोहोंचलेली, परंतु त्या ठिकाणीं तिचें मुख आकुंचित होतें. अंगांत एक इंग्रजी तऱ्हेचा गुडघ्यापर्यंत पोहोंचण्यासारखा आंगरखा, डोकीस एक तांबडी गोंडेदार टोपी, व तिच्याभोंवती एक सफेत वेष्टण. ह्या गृहस्थास तुटक तुटक इंग्रजी बोलतां येत होतें. परंतु त्याची शिताफी अशी होती कीं तो केव्हांही अडखळत नसे. दुसऱ्या सर्व लोकांशीं आमचा व्यवहार याच्याच मार्फत होत असे व हा नसला ह्मणजे मोठी अडचण पडे. याच्या स्वाधीन सर्व सामान करून आह्मीं अल्प सहवासानें झालेल्या स्नेही मंडळीचा निरोप घेऊन उतरलों, व दुसऱ्या एका लहान आगबोटींत बसून किनाऱ्याला गेलों. सर्व किनाऱ्यास कोठेंही बांधीव

धक्का नजरेस पडला नाहीं. परंतु असें दिसलें कीं जमीन फार सख्त असल्यामुळें व तिचे घटकावयव एक प्रकारचे मुरुमाच्या रंगाचे दगड असल्यामुळें ती नुसती खोदून सर्व आवश्यक कामाकरितां धक्के बनविले होते. सुएझचें बंदर फार शांत दिसलें व व्यापाराची घडामोड बरीच दृष्टोत्पत्तीस आली. ज्या धक्क्याशीं आह्मीं उतरलों त्याला लागूनच आगगाडीचे डबे उभे होते.

## सुएझहून केरो.

ह्या ठिकाणीं आगगाडीचें स्टेशन वगैरे कांहीं नाहीं. केवळ उतारूंच्या व टपालाच्या सोईकरितांच रस्त्याचा फांटा धक्क्यापर्यंत आणिला आहे. ह्या डांकेच्या गाडींत पहिला व दुसरा असे दोनच वर्गाचे डबे होते. परंतु याशिवाय "शयनरथ" (स्लीपिंग कार) या संज्ञेचे आणखी दोन डबे होते. ह्यांमध्यें जागा मिळण्यास पहिल्या वर्गाच्या हाशिलापेक्षां कांहीं जास्त हांशील द्यावें लागतें. ह्यांमध्यें निजण्याची सोय फार चांगल्या प्रकारची केलेली असते. दिवसा ज्या जागांचा उपयोग बसण्यासाठीं करावयाचा त्यांचाच रात्रिसमयीं बिछाना बनवितात. ज्या भागास टेंकून बसावयाचें तो भाग उन्नत करून त्याचा दुसरा बिछाना बनवितात. ह्मणजे एका खोलींत दिवसा जी एक कोचासारखी बसण्याची जागा असते तिचेच एकावर एक असे दोन बिछाने बनवितात. बिछान्यावर पलंगपोस स्वच्छ असतो. उशाला मऊ तक्या व पांघरण्यास दोन सखलाद्री. आम्हांस थेट आलेक्झान्ड्रियास जावयाचें नव्हतें; म्हणून आह्मीं ह्या शयनरथाचा उपयोग केला नाहीं. फार लांबच्या प्रवासाला ह्याचा फार चांगला उ-

पयोग होतो. पहिल्या वर्गाच्या डब्यांत शौचमुखमार्जनादि विधि करण्याची सोय नव्हती. ती शयनरथांत मात्र होती. सर्व मंडळी जागच्या जागीं बसल्यावर गाडी निघाली, ती एक मैलावर सुएझ गांवचें स्टेशन होतें तेथें बराच वेळ उभी राहिली. आगगाडीचा रस्ता दोन्ही बाजूनीं अमर्यादित दिसला, त्यामुळें जेथें गाडी उभी राहिली त्याच्या आजूबाजूच्या घरांतील लोक आह्मांस पहाण्यास जमा झाले. आमचे चित्रविचित्र पोषाक—कोणाचा पांढरा रुमाल, कोणाचा गुलाबी, कोणाचा तांबडा—पाहून साहेब लोकांचे एकसारखे वेष पहाण्यास अभ्यस्त असलेली ती मंडळी फार विस्मयाकुल झाली. तिकडील पुरुष व स्त्रिया फार धिप्पाड व मजबूत दिसल्या. वर्ण कांहींचा काळा व कांहींचा तांबूस होता. सर्व प्रदेशभर धूलिवैपुल्य असल्यानें सर्व वस्तूंचा व सर्व जनांचा रंग धूसर झाला होता. लहान पोरें गाडीच्या बाजूस जमून " साब बक्षीश " असा एकसारखा ओरडा करीत. 'बक्षीश' हा शब्द मिसर देशांत फारच साधारण झालेला आहे. कांहीं झालें तरी बक्षिसाशिवाय बोलण्याची सोय नाहीं. गाडी स्टेशनावर उभी राहण्याच्या कालाविषयीं फारसा कडक नियम दृष्टीस पडला नाहीं. कांहीं कांहीं ठिकाणीं बराच मुक्काम होत होता. जमिनीचा रंग भुरकट होता. दुरून कांहीं भागीं पांढऱ्या वाळूचे ढीगच्याढीग नजरेस पडत होते. एकंदरीनें झाडपाल्याची कमताई दृष्टीस पडली. त्यामुळें सर्व बाजूंस फार रखरखीत दिसत होतें. लोकांचीं घरें मुरमी दगडांचीं असून त्यांचा शिरोभाग आपल्या इकडील धाब्याच्या घराप्रमाणें सपाट होता व गाढवें व खेचरांची बरीच विपुलता होती. मोठे मोठे वृक्ष

बिलकुल नव्हते. नेफीश स्टेशनाजवळ मात्र बागाईत बरेंच होतें. येथें नाईल नदीच्या कालव्याचा फांटा गेला आहे त्यामुळें बागाइतास सवड असावी असें दिसलें. तेथून झागूअझिगू ह्या स्टेशनावर मंडळी उतरून यथावकाश भोजन उरकून फिरून गाडींत बसली. तेथून पुढें बेन्हा स्टेशनावर आह्मीं उतरलों. तेथें एक मोठें प्रतीक्षागृह ( वेटिंग रूम ) होतें; त्यांत रात्र घालवून पहाटेस उठून केरोशहराची वाट धरली.

## केरोशहर.

केरो मुक्कामीं आह्मीं प्रातःकालीं पोहोंचलों. स्टेशनावरून शहरचा जो भाग नजरेस पडला त्यावरून शहराचें वैभव व त्याची शोभा यांविषयीं आमचा बराच अनुकूल अभिप्राय झाला. परंतु त्या स्थानीं गाड्याघोडीं बिलकूल दिसलीं नाहींत ह्यामुळें मोठें आश्चर्य वाटलें. कदाचित् तो केवळ अरुणोदयाचाच समय होता व सूर्यकिरणांनीं नगरवासी जनांस उद्बुद्ध करण्याचा व्यापार सुरू केला नव्हता, व प्रायः शीतार्ततेमुळें व्यवसायि जनांनीं आपलीं सुखसदनें टाकून प्रवासि जनांच्या सुखसाधनांची फारशी अपेक्षा न केल्यामुळें, आह्मांस प्राचीन कालीं लोकविश्रुत अशा देशाच्या राजधानीचे ठिकाणीं वाहनाचा अभाव अनुभवास आला असावा. कांहीं कालपर्यंत वाट पाहिल्यावर एक घोड्याची गाडी मिळाली. तींत जेवढ्या मंडळीचा समावेश होण्यासारखा होता त्यांनीं तिचा उपयोग करून बाकीच्या मंडळींनीं पादक्रमण करण्याचा निश्चय केला. बरोबरचें सामानसुमान ठेवण्यासाठीं एक खेचराचा गाडा ठरविला व त्याच्यामागून आह्मीं चाललों. ज्या पथिकाश्र-

मांत (होटेल) आमचा उतरण्याचा संकेत होता तो बराच निकटवर्ती असल्यानें व प्रातःकाळाचा समय रमणीय व अनिल मंदगति व शिशिर असल्यानें श्रमाचा भास तर झालाच नाहीं, परंतु झालेल्या प्रवासक्रमाचा पूर्ण अपनोद झाला. आश्रमांतील व्यवस्था आमच्या सोईची होती. प्रातर्विधि लवकर उरकून पुराणप्रसिद्ध मनोरे पाहण्याला जाण्याची आह्मीं तयारी केली. ज्या वीथिकांमधून आह्मीं गेलों त्यांची रचना, मनोहरत्व, सौंदर्य व निर्मलता वर्णनीय होतीं ; गृहांची आकृति चतुष्कोन असून भव्य दिसत होती; व त्यांचे शिरोभाग सपाट होते. कांहीं कांहींच्या वातायनबहिर्भागीं अलिंदभूमिका काढिल्या होत्या. घरें परस्परांशीं चिकटलेलीं नसून प्रायः उद्यानपरिवेष्टित होतीं. बाजारचीं दुकानेंही नीटनेटकीं असून सुधारलेल्या शहरांतल्या दुकानांसारखीं त्यांची ठेवण होती. जनसमूह फार विरळ भासला व कित्येक रथ्या सूर्योदय होऊन बराच वेळ झाला असतांही निर्जन होत्या. शहराच्या बाहेरील मैदानांत एक बाजार पाहिला. तो पाहून आपल्या इकडील खेडेगांवांत कोठें कोठें आठवड्यांतून एक दिवस बाजार भरतो त्याची आठवण झाली. त्या स्थलीं सर्व खाद्य व पेय सामुग्री कापडचोपड, घोड्यांसाठीं गवत, तांबडे व पांढरे ऊंस वगैरे जिनसा नजरेस पडल्या. आरब जातीचे स्त्रीपुरुष बरेच दिसत होते. त्यांचा बांधा सदृढ व आकृति धिप्पाड व शरीर कृष्णवर्ण असून एक वस्त्रानें अवगुंठित असतें. स्त्रियांस स्तनांसाठीं कंचुक विशेष दृष्टीस पडला नाहीं. यांपैकीं ज्या कांहीं उच्च वर्णाच्या स्त्रिया होत्या त्यांचीं वदनें नेत्रांच्या अधोभागीं सूक्ष्मवस्त्रावृत होतीं. हें वस्त्र एका कानापासून दुसऱ्या काना-

पर्यंत पोहोंचण्या इतकें रुंद व उरावर पडे इतकें लांब असतें. नासिकेवर एक हस्तिदंती किंवा श्वेतकाष्टमय असा एक कंगोरेदार नाकाच्या लांबीचा वाटोळा तुकडा असतो. हा मधून पोकळ असतो व त्यामधून केशसीमन्तांवरून आलेलें असें एक सूत्र वदनावगुण्ठक वस्त्राशीं संयुक्त असतें. कांहीं स्त्रिया खेचरावर बसून चाललेल्या दृष्टीस पडल्या. त्यांच्या पायांत मोजे व बूट होते. ह्या प्रदेशीं खेचरांचा उपयोग फार करितात. युरोपियन स्त्रिया व गृहस्थही ह्या वाहनाचा स्वारीसाठीं उपयोग करितात. कांहीं खेचरांचीं नांवेंही मोठीं गमतीचीं व चमत्कारिक ठेवतात. कोणी ग्ल्याड्स्टन, कोणी नार्थब्रुक, कोणी जान ब्राईट, कोणी डिझ्राएली इत्यादि. असें असल्या कारणानें "आपली ग्ल्याडस्टनवर स्वारी करण्याची इच्छा आहे का डिझ्राएलीयर ?" अशा प्रकारच्या हास्योत्पादक प्रश्नानें अपरिचित जनांस मोठें नवल वाटतें. कांहीं वेळ मार्गक्रमण केल्यावर नाईल नदीच्या पुलावरून आह्मीं चाललों. ह्या ठिकाणीं नदीचें पात्र सुमार अर्धपाऊण मैल रुंदीचें होतें. पाणी धूसर वर्णाचें असून शांत दिसत होतें. नदीच्या तीरीं कांहीं मंदिरें होतीं. त्याचें मूळ सौंदर्य व त्याला नदीच्या पात्राच्या शोभेचें कोंदण ! मग काय विचारतां ? फारच बहारीचा देखावा दृष्टीस पडला ! नदी केवळ ह्याप्रमाणें नेत्रानन्ददायिनीच नव्हती तर, आपल्या उदरावर नानादेशगामी व नानादेशागत नौकासमूहास आश्रय देत होती, व तीरस्थ प्रदेशांच्या उदरभरणाची चिंताच जणुं काय वाहिल्यानें तिनें धूसरवर्णत्व स्वीकारिलें होतें. पुढें गेलों तों इस्माएल खेदिवाचा जंगी वाडा नजरेस पडला. ही इमारत मोठी भव्य असून

सभोंवती मोठीं मोठीं पटांगणें होतीं. याच्या पुढील रस्ता थेट मनोऱ्याच्या पायथ्यापर्यंत दुनर्फा वृक्षावलीनें मर्यादित आहे. दोन्ही बाजूंस शस्यक्षेत्रें दृष्टीस पडतात; व त्यांत कांहीं स्थलीं नाईल नदीचे पाट काढिलेले आहेत. कांहीं ठिकाणीं पाणी शेताला लावण्याकरितां अगदीं साध्या जलाकर्षक यंत्राची योजना केली होती.

वाटेनें जे कांहीं पशुपक्षी दृग्गोचर झाले त्यांपैकीं गाई व म्हशी आपल्या देशांतील गाईम्हशींसारख्याच दिसल्या; मात्र गाईंचीं शिंगें फारच आखूड होतीं. कावळेही आपल्या इकडच्या सारखेच होते; परंतु जरा जास्त मजबूत व पीनवपु वाटले. बहुतकरून विधात्यानें तेथील मनुष्यांच्या धिप्पाड आकृतींशीं संवाद राखण्याकरितां काकपक्ष्यांसही पीवरत्व दिलें असावें असा तर्क झाला. ह्या पक्ष्यांचे कण्ठ रक्तकपिश वर्णाचे होते.

## मनोरे.

मनोऱ्यांच्या दिशेस जाणारा रस्ता दोहों बाजूंनीं प्रच्छाय वृक्षराजींनीं आच्छन्न होता. कांहीं कांहीं स्थलीं मार्ग दुरुस्त नसून खाचखळगे होते. ह्या वृक्षवाटिकेंतील पथाचें अतिक्रमण केल्यावर आणखी एक पूल लागतो व तो वलांडल्यावर दुरून मनोऱ्यांची भव्य आकृति दृग्विषयीभूत होते. एक विस्तीर्ण श्वेतवालुकामय उच्च भूमिप्रदेश व त्यावर अधिष्ठित असे हे मनोरे होते. मनोऱ्यांचे दोन समुदाय आहेत. त्यांपैकीं ज्या समुदायांत सर्वांत उंच असा मनोरा होता, तेवढा मात्र पाहण्याचा आमचा इरादा होता. दुरून जरी मनोरे दृष्टीस पडले

तरी बऱ्याच दूर अंतरावर आह्मीं असल्या कारणानें जवळ पोहोंचण्यास पुष्कळ काल लागला. गांवापासून मनोऱ्यापर्यंत घोड्याच्या गाडीनें सुमार सव्वा कलाकाचा रस्ता आहे. मनोऱ्यांच्या अलीकडे "मैना" नांवाचा एक अभ्यागताश्रम आहे. ह्याच्या सर्व बाजूंस ध्वज लावले होते; व ते आपल्या अनिलोत्पादित विकम्पनानें अभ्यागत जनांस समाव्हानच करितात कीं काय असें भासत होतें. ह्यापुढें व मनोऱ्यांच्या पायथ्याशींच एक लहानशी इमारत आहे. ती खेदिवानें विश्रांतिनिमित्त बांधलेली आहे. वर सांगितलेल्या "मैना" आश्रमापर्यंत रस्ता साफ आहे; परंतु पुढें पायथ्याशीं खडचडीत आहे.

वर सांगितलें आहे कीं, ज्या मार्गानें आम्हीं गेलों त्या बाजूनें मनोऱ्याचे दोन समुदाय नजरेस पडले. परंतु ह्या दोन समुदायांशिवाय आणखी तीन समुदाय कांहीं दूर अंतरावर पलीकडे आहेत. सर्वांत प्राचीन व मोठे मनोरे ज्या समुदायांत होते त्यांतील प्राचीनतम व उत्तम असा जो मनोरा होता, तेवढाच आह्मीं पाहिला. मनोऱ्यांच्या निर्मातृत्वाबद्दल प्राचीन इतिहासकारांत कांहीं मतभेद आहे; तथापि बहुमतानें साधारणपणें असें ठरलें आहे कीं, हा सर्वांत मोठा मनोरा बांधण्याची सुरवात केआप्साराजानें केली. ह्या राजाच्या कारकीर्दीचा काल ख्रिस्ती शकापूर्वी ३०९१ वर्षांपासून ३०६७ वर्षांपर्यंत गणिला आहे. वर निर्दिष्ट केलेल्या समुदायांतील दुसरे दोन मनोरे ह्या राजाच्या भावानें व मुलानें केले आहेत. हिरॉडोटस इतिहासकाराच्या लेखावरून असें दिसतें कीं, ह्या

मनोऱ्याच्या पृष्ठभागावर लेख लिहिलेले होते व त्यांवरून तत्संबंधीं सर्व माहिती उपलब्ध होत होती. त्या लेखांमध्यें एक चमत्कारिक माहिती अशी आहे कीं, काम चाललें असतां मजुरांना अमुक मुळे, अमुक कांदे, अमुक लसूण वांटली गेली व ह्या सर्व जिनसांची किंमत सुमारें ३,५०,००० पौन्डांवर झाली होती. ह्या मनोऱ्यांचें काम वीस वर्षांवर चाललें होतें असें हिरॉडोटस ह्मणतो. तेव्हां इतक्या कालांत कांदा लसुणीलाच जर वर निर्दिष्ट केलेली रक्कम लागली, तर कार्यसामुग्री व मजुरदारांची पोटगी वगैरेचा खर्च कांहीं तरी अवाढव्य रकमेपर्यंत गेला असावा. डायोडोरस सिक्युलसच्या लेखावरून असें समजतें कीं सुमारें ३,६०,०००, मजूरदार वेठीनें धरून कामास लाविले होते.

## रचना प्रयोजनाविषयीं सिद्धांत.

ह्या विलक्षण इमारतींच्या रचनाप्रयोजनाविषयीं तीन प्रकारचे सिद्धान्त प्रतिपादित झाले आहेत. कांहींच्या ह्मणण्याप्रमाणें ज्योतिषशास्त्रतत्वशोधनाशीं ह्यांचा कांहीं तरी संबंध असावा. ह्या इमारतींचीं चारही टोकें दिङ्निर्णययन्त्राच्या चतुष्कोटिशीं संवादी आहेत, हें निर्णीत केलें आहे. ह्यावरून त्याचा कांहीं शास्त्रीय उपयोग असावा असा एक पक्ष आहे. कांहींचें ह्मणणें असें आहे कीं, त्रिकोणमितीच्या आधारानें सर्व वस्तूंचे मापक असे हे मनोरे आहेत. परंतु आजपर्यंत शोधकांनीं अश्रान्त परिश्रम करून जे कांहीं निर्णय ठरविले आहेत, त्या सर्वांत जो निर्णय विशेष सयुक्तिक मानला गेला आहे तो असा:—प्राचीन इजिप्शियन लोकांत आत्मा अवि-

नाशी आहे असें मत असून आत्म्याचें ऐहिक निवासस्थान जें शरीर त्याचें आत्मप्रयाणानंतर चांगल्या तऱ्हेनें संरक्षण करणें अत्यावश्यक आहे असें मानीत असत. ह्मणून नाईल नदीच्या जलविप्लवापासून वांचविण्याकरितां मृतशरीरांस मरुप्रदेशान्तर्गत शिलामय शुष्क अशा भूगर्भी पुरून ठेवीत असत. श्रीमान् लोक स्वतःकरितां आपल्या मरणापूर्वी शिलांमध्यें लहान लहान खोल्या खोदवून ठेवीत असत; व राजेलोक आपल्या समाधिस्थानाच्या चिरस्थायित्वाबद्दल विशेष काळजी घेत असत. राजकुलाचें समाधिस्थान इतर लोकांपेक्षां स्थलवैशेष्यामुळें व विशालतेमुळें भिन्न असणें फार जरूरीचें त्यांस वाटत होतें व त्यांचें वैभव व चिरस्थायित्व अबाधित रहावीं अशी त्यांची उत्कट इच्छा असे. हीं समाधिनिमित्त मन्दिरें असल्या कारणानें त्यांचा आकार चौकोनी ठरला; व मजबुतीसाठीं व मरुभूमीकडील अतिवेगवान् वायूपासून बाधा न व्हावी एतदर्थ बुडाशीं रुंद व वर निमुळता असा झाला.

आरबी इतिहासकार माशुदी यानें असें लिहिलें आहे कीं, जलप्रलयाच्या पूर्वी ३०० वर्षांचे सुमारास सुरीद राजानें हे मनोरे बांधले. त्याच्या लिहिण्याप्रमाणें त्यांच्या उत्पत्तीची हकीकत अशी आहेः—सुरीद राजास स्वप्न पडलें तें भावी जलप्रलयाचें सूचक होतें. जलप्रलयानंतर फिरून सृष्टि निर्माण होईलच असें त्यास कळल्यावरून त्यानें मनोरे रचण्याचा हुकूम दिला व ते तयार झाल्यावर त्यांच्या पृष्ठभागावर जलप्रलयाविषयीं भविष्यकथन लिहून ठेवविलें. सर्व खजिना, जवाहिर, पूर्वजांचीं प्रेतें व आपल्या पुरोहितवर्गाच्या ज्ञानभांडाराचे सर्व ग्रंथ मनोऱ्यांच्या आभ्यन्तर कक्षांमध्यें प्रलयानन्तर उत्पन्न होणाऱ्या प्र-

जाजनाच्या उपयोगासाठीं सांठवून ठेविले; व एका मनोऱ्यावर येणेंप्रमाणें लेख लिहून ठेविला:—" मी सुरीद राजा यानें हे मनोरे ६१ वर्षांत बांधले. माझ्यामागून येणारा जो कोणी आपल्यास राजा म्हणवील व माझ्याशीं बरोबरी करूं इच्छील त्यानें ६०० वर्षांत झाल्यास त्यांचा विध्वंस करावा. करण्यापेक्षां मोडणें सोपें आहे. त्यांस रेशमी कपड्यांनीं मी आच्छादित केलें आहे. त्याची छाती असेल तर नुसत्या चटयांनीं तरी त्यांस आच्छादित करण्याचा त्यानें यत्न करावा ". ह्याचप्रमाणें मनोऱ्यांच्या विशालतेचा व चिरस्थायित्वाचा द्योतक असा दुसरा एक लहानसा लेख आहे. बगदादचा प्रसिद्ध चिकित्सक अबदुल्लतीफ यानें असें लिहिलें आहे कीं, सर्व वस्तूंस कालाचें भय आहे; परंतु प्रत्यक्ष कालास मनोऱ्यांचें भय वाटतें.

## मनोऱ्यांचा आकार व रचना.

मनोऱ्यांच्या आकाराबद्दल वर थोडासा उल्लेख केला आहे; परंतु त्यांविषयीं व तद्रचनेविषयीं जास्ती खुलासा देणें अवश्य आहे. आपल्या इकडे बाहेर गांवीं सडकांच्या बाजूंला खडीचे ढीग घातलेले असतात ते सर्वांच्या पहाण्यांत असतीलच. तशाच प्रकारचा एक चतुष्कोन भूपृष्ठभागावर अधिष्ठित असा शिलाखण्डमय राशि कल्पिला व जसजसा वर उंच जाईल तसतसा त्याचा व्यास कमी करीत गेलें व बिन्दुरूप अग्रांत पर्यवसान केलें म्हणजे मनोऱ्यांच्या आकाराची चांगली कल्पना होईल. त्यांच्या रचनेविषयीं लेप्सिअस व अबेकन यांनीं शोध करून असें ठरविलें आहे:—ज्यांनीं ज्यांनीं मनोरे

बांधिले त्यांनीं आपल्या कारकीर्दीच्या आरंभींच त्यांचा उपक्रम केला असावा. आपली कारकीर्द कदाचित् थोड्याच काळांत आटपली तर आपलें समाधिमंदिर असमाप्त राहूं नये अशा हेतूनें प्रथमतः लहानच इमारत बांधली असावी. जसजशी कारकीर्द लांबत गेली तसतसे मूळ इमारतीच्या चहूं बाजूंनीं दुसरें शिलापटल थापलें असावें. ह्या सिद्धांतानें निरनिराळ्या मनोऱ्यांच्या विशालतेंत जें अंतर दिसतें त्याचा चांगला मेळ बसतो. ह्मणजे ज्या राजाची कारकीर्द लांब त्याचे मनोरे मोठे व ज्याची लहान त्याचे मनोरे लहान. जर रचनेचें काम एकसारखें एका मानानेंच चाललें असतें तर ह्या इमारतींचीं पटलें रचयित्यांच्या राज्यकालाचा निर्णय करण्यास साधनीभूत झालीं असतीं. आतां यांच्या घटनेविषयीं काय कल्पना बसविलेली आहे ती पाहूं. प्रथमकार्य ह्मटलें ह्मणजे एक शिलामय असा भूप्रदेश पाहून तो साफ करावयाचा व एखादी उच्च शिला असल्यास ती मध्यभागीं घ्यावयाची. ह्या शिलेच्या अभ्यन्तरीं जितक्या उद्दिष्ट असतील तितक्या लहान लहान खोल्या अगोदर पोंखरून काढावयाच्या व त्यांची उंची बाहेरून उभारलेल्या इमारतींतून मागून वाटेल तेवढी खोदून काढावयाची. मग शिलेच्या बाहेरून चारी बाजूंनीं उंच भिंती रचावयाच्या व त्यांच्या योगानें मर्यादित जेवढी जागा असेल तेवढी दगडांनीं भरून काढून आपल्या इकडील चार पाख्यांच्या घराच्या कौलाराप्रमाणें आकार येईल अशी चार भिंती मिळून झालेल्या चौथऱ्यावर रचना करावयाची. नंतर चारी भिंतींच्या बाजूंनीं वर जी चौपाखी रचना सांगितली तिच्याशीं मिळून येईपर्यंत दगडानें सर्व अंतर भरून काढावयाचें

ह्मणजे एक मनोरा झाला. आतां हाच मोठा करावयाचा ह्मणजे ह्याच्या चारही बाजूंनीं चार भिंती करून वरच्याप्रमाणेंच भरून काढावयाचें ह्मणजे एक पटल झालें. असेंच दुसरें, तिसरें. ह्याप्रमाणें जशी सवड असेल त्याप्रमाणें पटलें वाढवायाचीं.

ख्रिस्ती शकाच्या पूर्वीं सुमारें ५२५पासून ३३३ वर्षांच्या दरम्यान इराणी लोकांनीं ह्या मनोऱ्यांचा प्रथम भेद केला होता. त्यानंतर आरब लोकांनीं कांहीं कोशप्राप्तीच्या हेतूनें आभ्यन्तरकक्षांत प्रवेश करण्याचा यत्न केला व कार्यसाधनांत जसजसे त्यांस अधिकाधिक प्रयास पडूं लागले तसतसें अपेक्षितनिधीच्या महत्वाबद्दल त्यांचें कुतूहल वाढत गेलें. खालीफ मामून, ज्याचा काल इसवी सन ८१३-८३३ पर्यंत गणला आहे, त्यानें सर्वांत मोठ्या मनोऱ्याचा भेद केला. परंतु त्यापासून द्रव्यप्राप्ति न झाल्यामुळें सर्वांची निराशा मात्र फार झाली, असें एकंदर इतिहास लेखावरून ठरविलें आहे. कांहीं वृत्तांतांत असें आढळतें कीं मनोऱ्यांत प्रवेश केल्यावर जेवढा ह्मणून तत्संबंधीं खर्च झाला होता, तेवढ्या रकमेच्याच सुवर्णमुद्रा तेथें सांपडल्या. परंतु ह्यावर असा आक्षेप घेण्यास जागा रहाते कीं खालिफानेंच आपली निराशा झाली ह्याबद्दल बोभाट न होऊं देण्याकरितां कदाचित् अशी तजवीज केली असेल. महम्मद आलीस एका भविष्यवाद्यानें मनोऱ्यांचा विध्वंस करण्याचा उपदेश केला व दारुगोळ्याच्या सहाय्यानें त्याचा इष्ट हेतु सिद्धीसही सुलभ रीतीनें गेला असता. परंतु असें सांगतात कीं, त्याच्या युरोपीय मित्रवर्गानें जेव्हां त्यास असें समजाविलें कीं तसल्या भयंकर प्रयोगानें केरो शहरासही धक्का पोहोंचेल, तेव्हां त्यानें या गोष्टीचा नाद सोडिला.

येथपर्यंत मनोऱ्यांसंबंधीं प्राचीन ऐतिहासिक उपयुक्त माहिती थोडक्यांत दिली. आतां सांप्रत त्यांची स्थिति कोणत्या प्रकारची आहे व सद्यः प्रवासिजनदर्शनीय अशा कोणत्या गोष्टी आहेत ह्याचा थोडा उल्लेख करून हा बराच लांबलेला मनोऱ्यांचा विषय समाप्त करूं.

## मनोऱ्यांची हल्लींची स्थिति.

प्रथम मनोऱ्यांजवळ जाऊन आम्हीं त्यांची बाह्यरचना कोणत्या प्रकारची सांप्रतकाळीं आहे हें पाहिलें. तेव्हां आम्हांस असें आढळलें कीं विस्तीर्ण शिलाखण्ड एकावर एक रचलेले आहेत. या शिला कशाच्या योगानें जडविल्या होत्या हें दृष्टीस पडलें नाहीं व शिलाखण्डही एकसारखे व्यवस्थित लागलेले दृष्टीस पडले नाहींत. ह्यांवरून अशी कल्पना झाली कीं कदाचित् प्रस्तुत दृश्यमान शिलांवरून चारीही पृष्टतलांवरून एक प्रकारचा संयोजक व आच्छादक लेप लावला असावा व तो कालावधीनें नाहींसा झाला असावा; किंवा एकाशीं एक मिळून जाणारे असेच दगड मूळ बाह्यपृष्ठावर लावले असावे, व कालान्तरीं व्यक्तिविशेष किंवा जनसमूहविशेष किंवा अधिकारिविशेष यांची प्रवृत्ति त्या रचनेचा उच्छेद करण्याकडे असल्यामुळें ज्याला वाटलें त्यानें पृष्ठभागावरचे दगड काढून नेले असावे; व त्यामुळेंच त्या भागाची विषम दशा झाली असावी.

## शिखरारोहण.

त्यानंतरचें दुसरें काम शिखरारोहण. हल्लीं जी बाह्यपृष्ठाची विषम स्थिति आहे, त्यामुळें मनोऱ्यांच्या शिखरापर्यंत चढणें

शक्य आहे; कारण कीं प्रस्तुत अन्यवस्थित स्थितींत त्या शिलाखंडांची केवळ एक सोपानपरंपराच झाली आहे, ह्मणून अल्प कष्टानें वरपर्यंत जाणें सुसाध्य आहे. आह्मीं मनोऱ्याजवळ गेल्याबरोबर आमच्या सभोंवतीं दहावीस वेडुइन जातीचे आरबलोक जमा झाले. हे सर्व लोक शिखरावर चढून जाऊं इच्छिणाऱ्या जनांस मदत करण्यास तयार असतात. परंतु जो तो आपलेंच घोडें पुढें ढकलीत असल्याकारणानें त्यामध्यें निवड करण्याचें काम फार त्रासदायक होतें. त्यांतून ते इतके जिद्दखोर असतात कीं आपण झिडकारिलें तरी दूर न होतां पुनः पुनः आपल्या अग्रवर्ती होतात. त्यांपासून सुटका ह्मटली ह्मणजे त्यांमध्यें त्यांचा मुख्य शेख असतो त्याकडे जाऊन त्याच्या मार्फत आपण माणसें मिळवावीं ह्मणजे त्रास कमी होतो; पण अगदींच चुकतो असें नाहीं. कारण कीं त्यांच्या त्यांच्यांत एकमेकामध्यें कलह होतात, व बरोबर दिलेली मंडळी एकसारखी निराळें कांहीं बक्षीस मिळावें ह्मणून टकटक लावीत असतात. परंतु वर जाऊन खालीं येईपर्यंत त्यांस कांहींएक न देण्याची खबरदारी ठेवावी लागते. कारण कीं जर एकदां थोडें कांहीं देण्याची सुरुवात केली तर मग जो त्रास होतो त्यास पारावारच नाहीं.

वर चढण्यासाठीं प्रत्येक माणशीं दोन दोन आरब पुरतात. परंतु तीन असले ह्मणजे विशेष सोईचें असतें. कारण कीं, पायऱ्या कित्येक ठिकाणीं कमरेपेक्षां अधिक उंचीच्या आहेत; त्यामुळें दोन माणसांनीं दोन हातांस धरून उचलबांगडी करावी लागते व त्यामुळें हातांला बराच हिसका बसतो, ह्मणून

तिसरा माणूस असला ह्मणजे तो खालून उचलून धरतो. माझ्याबरोबर तीन माणसें होतीं. हे मला भराभर ओढून घेऊन चालले व थोडा दम टाकण्यासही विश्रांति देईनात. असा त्यांचा वर्तनक्रम पाहून मी मध्यास येऊन थांबलों व पुढें जाण्याचें नाकारिलें. तळापासून सुमार एक तृतीयांश अंतरावर एका शिळेवर विश्रांतीस्तव मुक्काम केला. माझ्या बरोबरची दुसरी मंडळी भराभर वर चढून गेली. मनोऱ्यांच्या नैर्ऋत्य दिशेच्या टोंकापासून चढण्यास सुरुवात होते. आरोहणमार्ग ठरीव आहेत ; ते ह्या आरब लोकांस चांगले ठाऊक असतात. तेव्हां अपरिचित माणसानें ह्यांच्या साहाय्याशिवाय वर चढण्याचा यत्न करूं नये. वर निर्दिष्ट केलेल्या स्थलीं कांहीं वेळ विश्रांति घेऊन फिरून मार्गक्रमणास आरंभ केला, व सुमार तळापासून अर्ध्या अंतरावर येऊन पोहोंचलों तों हिम्मत बरीच खचली, व पुढें शेवटपर्यंत मजल पोहोंचविण्याची हुरूप राहिली नाहीं, ह्मणून पुढें जाण्याचा बेत रहित केला. चांगल्या सशक्त माणसास शिखरापर्यंत एकसारखें जाण्यास सुमार १५ मिनिटें लागतात. परंतु माझ्यासारख्या दुर्बल माणसास हें कार्य सुसाध्य वाटलें नाहीं. ह्या इमारतीच्या तळाच्या प्रत्येक बाजूची लांबी हल्लीं ७५० फूट आहे. हीच पूर्वीं ७६८ फूट होती. पायाच्या मध्यभागापासून शिखरापर्यंत उंची ४५१ फूट हल्लीं आहे व पूर्वीं ४८२ फूट होती. शिखराचा अग्रभाग नाहींसा होऊन सुमारें १२ चौरस यार्डांचा सपाट भाग हल्लीं झाला आहे. प्रत्येक पृष्ठभागाची तळापासून शिखरापर्यंत लांबी सांप्रत ५६८ फूट आहे व पूर्वीं ६१० फूट होती. एकंदर तेरा एकर जमीन विद्यमान इमारतीनें व्यापून टाकिली आहे.

माझ्या बरोबरचे आरब लोक मला पुढें जाण्यास आग्रह करीत होते ; परंतु माझी छाती होईना ह्मणून मी त्याच स्थलीं एका शिलाखंडावर बसलों. ती संधी पाहून त्यांपैकीं एकानें कांहीं लहान लहान हिरवे तांबडे दगड व दगडाच्या मूर्ति व कांहीं गंजलेलीं तांब्याचीं नाणीं अशीं खिशांतून काढून माझ्यापुढें केलीं. मनोऱ्याच्या आभ्यंतर कक्षांमध्यें ज्या चमत्कारिक व पवित्र वस्तू सांपडल्या त्यांपैकींच ह्या आहेत अशी त्यानें बतावणी करून त्यांबद्दल पुष्कळ किंमत मागूं लागला. प्रवासिजनास अशा प्रकारच्या कांहीं जिनसांचा संग्रह करण्याची उत्सुकता सहजच असते. ह्मणून त्यांनीं केलेल्या बतावणीच्या सत्यासत्यतेबद्दल विचार न करितां कशा असल्या तरी आपल्या संग्रहीं त्यांतील कांहीं वस्तू असाव्या अशा हेतूनें मीं कांहीं विकत घेतल्या. त्याबरोबर दुसऱ्यानें व तिसऱ्यानेंही पहिल्यापेक्षांही चमत्कारिक अशा वस्तू व नाणीं दाखविलीं. त्यांपैकींही कांहीं घेतलीं, व आधिक घेण्याची इच्छा नाहीं असें सांगून त्यांचीं तोंडें बंद करून मी ज्या स्थलीं बसलों होतों तेथून दृक्पातास विषयीभूत होणाऱ्या सर्व प्रदेशावर दृष्टीची प्रेरणा केली ; तों फारच अपूर्व व रमणीय देखावा दिसला. सर्व पृथ्वीवर अशा प्रकारचें परस्परविरोधीवस्तूंचें सान्निध्य अन्यत्र क्वचितूही नसेल. एकीकडे मृत्युसूचक अशा इमारती व दुसरीकडे सृष्टींतील सर्व व्यवसायांत व्यापृत अशा जनांनीं आकीर्ण अशीं गृहें. एका बाजूस शून्य भयानक व अशस्यप्रद अशी मरुभूमि व दुसऱ्या बाजूस प्रशस्त नीलनंदप्रवाहपोषित व ह्मणूनच बहुफलप्रद असा प्रदेश. पश्चिम दिशेस क्षुद्र व वृक्षहीन अशा पर्वतांनीं

चित्रित असा पीत व धूसरवर्ण वालुकामय देश दृग्गोचर होत होता; व त्यामध्यें रचलेले मनोरे हे मृत्यूचे तर स्मारक होतेच, परंतु त्यांशिवाय नश्वरशरीरास अमरत्व देऊं पहाण्यास कारणीभूत असा जो मानव जातीचा वृथाभिमान याचीही साक्ष देत होते. जवळील एका मनोऱ्यानजीक एक जंगी दगडाची मूर्ति आहे, तिचें धड सिंहाच्या आकृतीचें असून शिरोभाग मनुष्यासारखा ओबडधोबड कोरलेला आहे, त्यामुळें जसा कांहीं कोणी विशालाकृति राक्षसच वाळूमधून आपलें डोकें वर करीत आहे असें भासत होतें. दुसरे मनोऱ्यांचे समूहही दुरून अव्यक्त नजरेस पडत होते. पूर्वेचे बाजूस नाईल नदीचा वक्रगतीनें वाहणारा असा प्रवाह प्रातःकालीं सूर्यकिरणांच्या तेजानें चकाकत असल्यामुळें तप्तरौप्यरसाची शोभा पावत होता. प्रवाहाच्या दोनही बाजूंस नानाशस्योत्पादक अतिविस्तीर्ण क्षेत्रावली दिसत होती; व तींत सर्वत्र वृक्षराजि विराजमान होत होत्या. सर्व क्षेत्रांमधून पाण्याचे पाट नेलेले होते व ह्या पाटांच्या बाजूनें ताल वृक्षांच्या पंक्ति आपल्या व्यजनाकार पर्णांनीं दूरागत उष्णवायूच्या उपशमनार्थच कीं काय वीजनक्रियाव्यापृत अशा दिसत होत्या. कोठें कोठें खेडयापाडयांतील द्रव्यहीन लोकांचीं लहान लहान घरें सर्पाच्या वारुळाप्रमाणें दिसत होतीं. केरोशहराच्या बाजूंस नजर फेकली तेव्हां ज्या मार्गानें आह्मीं आलों तो मार्ग बराच लांबपर्यंत दिसत होता ; व आमच्या समोरच शहरचा लहान किल्ला व महम्मद अल्लीची अनेकशृंगभूषित मशीद होती. एकंदरींत सर्व देखावा जसा भीतिप्रद होता तसाच प्रमोदजनक असल्या कारणानें तें स्थल सोडावेंसें वाटेना. परंतु सूर्यकिर-

णांच्या कठोरत्वापासून बाधा होईल ह्या भयानें मोठ्या जुलुमानें फिरून खालीं उतरलों.

## आभ्यन्तर कक्ष.

मनोऱ्यांवरून खालीं उतरल्यावर कांहीं आरब लोकांनीं आमच्या भोंवतीं गराडा घातला व बक्षिसाचा घोष करूं लागले. कोणी कांहीं पुरातन नाणीं व दगड दाखवूं लागले; परंतु त्यांजकडे बिलकुल लक्ष द्यावयाचें नाहीं असा निश्चय करून पुढें काय करावयाचें याच्या विचारास आह्मी लागलों. कांहीं प्रवासी लोक मनोऱ्यांच्या वर निर्दिष्ट केलेल्या आभ्यन्तर कक्षांत प्रवेश करून त्यांच्या सांप्रत स्थितीबद्दल केवळ इतिहासप्रसिद्ध गोष्टींवर हवाला न देऊन 'चक्षुर्वै सत्यं' ह्या तत्वाचें अवलंबन करून अन्तःप्रवेश करण्याचें साहस करितात. परंतु आह्मांस कबूल केलें पाहिजे कीं आह्मीं पूर्णपणें त्या कोटींतले नसल्या कारणानें जेव्हां आह्मीं असें ऐकिलें कीं प्रवेशमार्ग संकुचित असून कष्टप्रद आहे व केवळ धूल्यवलुंठनाशिवाय गति नाहीं व मशालीशिवाय प्रकाश नाहीं, तेव्हां आह्मी आपल्या कुतूहलाचा संकोच केला व आल्या वाटेनेंच घरीं परत गेलों.

## संग्रहालय, बाजार वगैरे.

थोडी विश्रांति घेऊन, कांहीं अल्पाहार करून फिरून बाहेर पडलों. त्याच दिवशीं रात्रीं आह्मांला केरो सोडून आलेक्झांड्रियास जावयाचें होतें म्हणून जेवढा वेळ होता तेवढ्याचा होईल तितका उपयोग करणें भाग पडलें. रात्र थोडी व सोंगें फार अशी आमची दशा झाली. जुन्या खालिफांच्या कांहीं

कांहीं कबरा तशाच कांहीं मशिदी पाहण्यासारख्या आहेत असें म्हणतात. त्याचप्रमाणें शहरापासून कांहीं अंतरावर पाषाणीभूत अशीं कांहीं अरण्यें आहेत असें सांगतात; परंतु थोड्या अवकाशांत हीं सर्व पाहणें शक्य नसल्यामुळें आम्हीं त्याचा नाद सोडून दिला व दुपारचा वेळ पुराणवस्तुसंग्रहालय पाहण्यांत घालवून सायंकाल शहराची एकंदर रचना व बाजार वगैरे पाहण्यांत घालविला. संग्रहालयास जातांना जो शहराचा भाग पाहण्यांत आला तो बराच दरिद्री असून गलिच्छ होता व त्यामुळें प्रातःकालच्या परिक्रमणानें शहराच्या व्यवस्थेविषयीं व स्वच्छतेविषयीं जो अनुकूल ग्रह झाला होता त्यास बरेंच विरजण पडलें. संग्रहालयाची इमारत दुरून दिसण्यांत भव्य नसून तिचा आसमंताद्भागही रूक्ष दिसत होता. दरवाज्यांतून आंत गेल्यावर एक लहानसें आंगण लागतें त्यांत ठिकठिकाणीं दगडाच्या छिन्नभिन्न मूर्ति, स्तंभ वगैरे यांचा संग्रह आहे. इमारतीच्या द्वाराशीं एक द्वारपाल व एक मार्गदर्शक असे उभे होते. त्या ठिकाणीं आमच्या छत्र्या व काठ्या ठेवून संग्रहीत वस्तु अवलोकन करण्यास आम्हीं आरंभ केला. आमच्याबरोबर कुक कंपनीचा गुमास्ता होता त्यास कामापुरतें इंग्रजी भाषेचें ज्ञान होतें हें वर सांगितलेंच आहे. त्याचा ह्या ठिकाणीं बराच उपयोग झाला. कारण कीं ह्या ठिकाणीं जो मार्गदर्शक होता त्यास इंग्रजी बिलकुल येत नव्हतें तेव्हां तो वस्तुनिर्देश करून सर्व हकीकत आरबी भाषेंत सांगे. त्याचा तर्जुमा करून आमचा गुमास्ता इंग्रजींत सांगे; त्याचें भाषांतर करून हिंदुस्थानींत आमच्याबरोबरच्या मंडळीस मी सांगें. अशा रीतीनें प्रत्येक वस्तु पहाण्यास तिप्पट वेळ लागूं लागला. का-

येंभाग उरकण्यास आह्मांस तर अवकाश फार थोडा! तेव्हां सरासरी ह्या खोलींतून त्या खोलींत असे भराभर उड्या मारीत चाललों. लाभ काय झाला ह्मणाल तर केरो शहरांतील संग्रहालय आमच्या नजरेखालून गेलें एवढी त्या वेळेपुरती तरी मनाची समजूत! एवढें सांगणें अवश्य आहे कीं हा संग्रह केवळ अद्वितीय आहे; व ज्याची दृष्टि शास्त्रसंस्कृत असेल त्यास दीर्घकालपर्यंत विचित्र व तत्वान्वेपणप्रवर्तक अशा विपयांचा अप्रतिहत उपभोग घेण्यास विलक्षण साधन आहे. माझ्यासारख्याच्या प्राकृत दृष्टीला व त्यांतूनही अशा ओढाताणीच्या प्रसंगीं फारसा तत्वावबोध झाला नाहीं. तथापि ज्या कांहीं गोष्टी ध्यानांत राहिल्या त्यांचा येथें अतिसंक्षेपानें निर्देश करितों. कांहीं स्थलीं विस्तीर्ण शिलालेख होते त्यांवर भिन्न भिन्न लिपींत लेख लिहिले होते. इजिप्त देशाची प्राचीन लिपि, जिला इंग्रजींत हाएरॉग्लिफिक्स म्हणतात, तिचा नमुना येथें दृष्टीस पडला. ह्या लिपींचें मुख्य लक्षण हें कीं, अक्षरांचा किंवा अक्षरसमुदायाचा बोध बाह्य सृष्टींतील पदार्थ किंवा कांहीं प्रसिद्ध चिन्हें यांच्या द्वारानें करावयाचा. ह्या लिपीमध्यें कोठें कोठें घुबड, बगळा, हत्ती, खेकडा, व त्याचप्रमाणें त्रिकोण, चौकोन इत्यादि चिन्हें दृष्टीस पडलीं. ह्याचप्रमाणें ग्रीक व काप्टिक भाषेंतही कांहीं शिलालेख होते. कांहीं अतिप्राचीन लेख लिहिलेले सूक्ष्म कागद होते. कांहीं निरनिराळ्या प्रदेशांतील पुरातन नाणीं होतीं. कांहीं मातीचे व दगडाचे पुतळे होते. कांहीं नग्न व कांहीं अवयवविशेपीं आच्छादित असे होते. अवयवांचें परस्पर प्रमाण फारसें खुबीदार नसून पुरुष व स्त्रिया यांचे केशकलाप अगदीं विरूप दिसत

व त्यांत स्वभावाचें बिलकुल अनुकरण साधलें नव्हतें. कांहीं सिंहाकृति व कांहीं व्याघ्राकृति अशा देवता होत्या. परंतु सर्वांत विशेष चमत्कारिक गोष्ट ही वाटली कीं कांहीं प्राचीन राजांची व राज्ञींचीं प्रेतें मोठ्या काळजीनें राखलेलीं पेट्यांतून ठेविलेलीं दृष्टीस पडलीं. हीं जसजशीं निरनिराळ्या स्थळीं सांपडलीं तसतशीं संग्रह करून येथें आणून ठेविलीं आहेत. प्रेतसंरक्षणाची ह्या देशांत कांहीं विलक्षण युक्ति असावी. कारण कीं शेंकडों वर्षांनंतरही कित्येक आकृति फारच अविकृत दिसतात. ह्या सर्व प्रेतांस ते लोक फारच पवित्र मानतात. त्यांनीं जेव्हां आह्मांस हीं प्रेतें ह्मणून सांगितलें तेव्हां आह्मांस खरें वाटेना. आम्हास त्या सर्व मेणाच्या प्रतिकृति वाटल्या; परंतु त्यांनीं खात्रीपूर्वक सांगितल्यावर आम्हांस त्याचें फार आश्चर्य वाटलें. ह्याप्रमाणें संग्रहालयाची हकीकत झाली.

## बाजार.

सायंकाळीं शहर व बाजार पहावयास गेलों. तो देखावा फारच मौजेचा होता. इजिप्त देश पौरस्त्य व पाश्चात्य देशांच्या सरहद्दीवर असल्या कारणानें व बहुत कालापासून पाश्चात्य राष्ट्रांशीं राजकीय संबंधानें निकट जोडलेला असल्या कारणानें तेथें हिंदुस्थानापेक्षां पाश्चात्य राष्ट्रांच्या रीतरिवाजांची व वेषांची भेळ विशेष दृष्टीस पडते. या स्थळीं जसें वेषवैचित्र्य व विशेषत: पाश्चात्य संस्कारयुक्त रीतिभेद आढळतात तसे युरोपांतील कोणत्याही राष्ट्रांत आढळत नाहींत, व आपल्या इकडेही कांहीं कांहीं स्थळींच आढळतील. सुमार दोन घटका दिवस राहिलेला आहे, भगवान् सहस्रकिरण नभोम-

ध्यावरून अवतरण करून आतपानें संतप्त झालेल्या जनांच्या अनुग्रहार्थच कीं काय आपल्या रश्मींचें तेज कमी करून अस्ताचलाचा मार्ग क्रमीत आहे. असें पाहून क्लमभीरु अशा ललना आपलें अवगुण्ठण सांवरीत बाहेर पडल्या आहेत. कोणी क्रयव्यग्र व कोणी विक्रयव्यग्र. कोणी आरामाभिलाषी उद्यानाभिमुख चालल्या आहेत व त्यांच्या मुखचंद्रांच्या किरणानें उपवनलता आल्हादित होऊन अनिलविकम्पितपल्लवांच्या योगानें त्यांस मोठ्या औत्सुक्यानें आव्हान करीत आहेत. त्यांत ज्या श्रीमंत आहेत त्या गाड्यांत जात आहेत व वर्षवरपरिवेष्टित आहेत. बालकगण स्वभावानुरूप क्रीडा करीत आहेत, व आमच्यासारखीं विचित्र वेषविभूषित अशीं माणसें पाहून आपलीं क्रीडनकें टाकून कोणी साश्चर्य मुद्रेनें स्तब्ध राहत आहेत. कोणी कोमल करतलप्रहाराच्या योगानें आपला विस्मय दर्शवीत आहेत, व कोणी क्रीडाव्यग्र अशा वयस्यांस बोलावून आमच्याकडे अंगुलिनिर्देश करीत आहेत. श्रीमंतलोक अश्ववाहनाधिष्ठित होऊन रथ्यांतून मोठ्या दिमाखानें चालले आहेत. व त्यांतही कोणी राजपुरुष आपल्या गाडीपुढें जनसंमर्द मोडण्याकरितां नीटनेटके कपडे घातलेले असे दोन नोकर पळवीत आहेत. कोणी व्यापारी व प्रवासी अश्वतरारूढ होऊन आपल्याच झोंकांत इकडे तिकडे पहात आहेत. कांहीं पादचारी लोक टवाळकी करीत आहेत. दुकानदारांची एकच गर्दी उडून गेली आहे. ग्राहकांची प्रतीक्षा करीत कोणी आपल्या जिनसा साफसूफ करून ठेवीत आहेत. कोणी आलेल्या ग्राहकांस खुष करण्याच्या यत्नांत आहेत. कोणी बेपर्वा आपली गुडगुडी हातांत घेऊन तिच्या जलाशयां-

त होत असलेला मन्द व मंजुळ असा शब्द ऐकत मुखानें सुवासित असे धूमाचे फूत्कार टाकीत आहेत. रस्त्यांत एकच कल्लोळ होऊन गेला आहे. गाडीवाल्यांच्या चाबुकांचा कडाड शब्द, सराफांच्या दुकानचा छणछणाट, पाणी विकणाऱ्यांच्या हातांतील पितळेच्या वाट्यांचें क्कणन, त्यांतच उंटांचे विचित्र शब्द व लम्बकर्णांचे ध्वनि, कुत्र्यांचें भुंकणें, या सर्वांच्या योगानें सर्व गोंधळ होऊन गेला आहे. गर्दी इतकी झाली आहे कीं मार्ग मिळण्यासाठीं गाडी वरच्यावर थांबवावी लागत आहे.

बाजारचे बहुतेक रस्ते अरुंद असून त्यांवर सूर्यतापनिवारणार्थ छतें लाविलेलीं होतीं. सोमवारीं व गुरुवारीं मोठा बाजार भरतो व त्यादिवशीं गर्दी इतकी होते कीं माणसांस हालचाल करण्यास देखील अवकाश नसतो असें सांगतात.

रस्त्यांत ज्या ज्या व्यक्ति दृग्गोचर झाल्या त्यांची तऱ्हा व वेष अवलोकन करून फारच चमत्कार वाटला. आरब लोकांच्या शिरोवेष्टनाचे रंग फारच भिन्नभिन्न आढळले. असें सांगतात कीं फार प्राचीन काळापासून आरब लोकांत अशी चाल चालत आली आहे कीं त्यांच्या निरनिराळ्या जातींचा निर्देश त्यांच्या डोकीच्या पटक्याच्या रंगानें करावयाचा. शरीफ लोक, ह्मणजे महम्मदाचे वंशज, यांच्या पटक्यांचा रंग हिरवा; कारण कीं महम्मदाचा ध्वज त्या रंगाचा होता. पुरोहित वर्गांतले लोकांचा पटका साध्या रंगाचा असावयाचा. मुसलमान लोकांच्या पटक्याची लांबी डोक्याच्या व्यासाच्या सातपट असावयाची.

याचा मुद्दा असा सांगतात कीं तें वस्त्र सर्व शरीराच्या लांबी-ला पुरण्याइतकें असावयाचें, ह्मणजे मरणानंतर त्याचा उपयोग प्रेताचें आच्छादन करण्याकडे व्हावा, व अशा रीतीनें मृत्यूशीं विशेष परिचय व्हावा असा त्यांचा समज आहे. काप्ट, जू व दुसरे महंमदी धर्माच्या बाहेरील लोक यांच्या पट-क्यांचा रंग अनुक्रमें अस्मानी, पिंवळा व काळा असावयाचा. गरीब व खेड्यापाड्याच्या लोकांच्या बायकांचा पोषाक ह्मटला म्हणजे एक निळ्या रंगाचा घागरा व डोक्यावरून घेण्याचा एक बुरखा. त्यांच्या हातांत रुप्याच्या किंवा तांब्याच्या बांगड्या, कानांत झुंकलीं व पायांत वाळे. त्यांच्या हनुवटीवर, दंडावर व उरावर गोंदण्याची चाल आहे. उत्तर इजिप्त देशांत नासिकाभूषणेंही आढळतात. वरच्या प्रतीच्या लोकांच्या स्त्रिया घरांत शुभ्र कपडे घालतात. भिवयांस काळा रंग लावतात व नखांस मेंदी लावितात. बाहेर जातांना एक रेशमी अघळपघळ असा बुरखा अंगावरून घेतात. स्त्रिया बुरखा घालून खेंचरावर बसून इकडून तिकडे जातात व बाजारांतही जाऊन दुकानांतून माल खरेदी करि-तात. यावरून असें दिसलें कीं बुरख्याच्या चालीमुळें बायकांस पुरुषांप्रमाणें लौकिक व्यवहार करण्यास प्रत्यवाय नाहीं. मात्र त्यांचें मुख दृष्टीस पडावयाचें नाहीं.

आह्मी गाडींतून जात असतां वातायनस्थ होऊन सकुतू-हल आम्हांस अवलोकन करितांना कांहीं स्त्रिया आमच्या दृष्टीस पडल्या. त्यांचा वर्ण गौर, केश काळे व आकृति मनोहर दिसली. चौकशीअंतीं असें समजलें कीं इकडील

स्त्रिया साधारणतः सुरूप असतात. शहरांत भिकार फार आहे व त्यांत अंधळे पुष्कळ आहेत.

रस्त्यांत जे निरनिराळ्या प्रकारचे लोक आढळतात त्यांमध्यें पाणी विकणारे पुष्कळ असतात. कित्येक पाठीवर पखाली घेऊन हिंडतात. कित्येक एक मोठें मृत्तिकापात्र रज्जुवेष्टित करून तें पाठीवर बांधतात. त्यांच्या हातांत पितळेच्या वाट्या असतात. त्यांचा परस्परांवर आघात करून त्या शब्दासमवेत आपल्या मुखानेंही कांहीं शब्द करीत फिरत असतात. कित्येकांजवळ पितळेच्या वाट्यांशिवाय कांहीं लहान लहान खुजे असतात त्यांत भरून पाणी विकतात. याचप्रमाणें कांहीं लोक थंड पाण्यांत नारिंगाचीं फुलें घालून त्यांत द्राक्षासव वगैरे कांहीं मादक पदार्थ घालून ते विकीत असतात. दुसरे हलवा व मेवा विकणारे पुष्कळ विचित्र प्रकारचे लोक आढळले. कांहीं लोक ज्याप्रमाणें पुण्यांत मारवाडी फुटाणें देऊन फुटक्या बांगड्या गोळा करितात, त्याप्रमाणें लोखंडाचे तुकडे घेऊन हलवा देत. याचप्रमाणें कांहीं फिरस्ते हलवाई बरोबर एक लहानशी चूल घेऊन हिंडत होते. गिऱ्हाईक भेटला ह्मणजे रस्त्याच्या बाजूस चूल ठेवून ताजीं पक्वान्नें करून देत व बुभुक्षु जन त्यांचा तेथल्यातेथेंच आसनमांडी घालून चट्टामट्टा करून टाकीत. असें सांगतात कीं केरो शहरांत जिन्नस घरीं नेऊन तयार करून खाणारे लोक थोडे. पुष्कळांचा निर्वाह अशा रीतीनें पक्वान्नें घेऊन त्यांवरच असतो. अशा रीतीनें पक्वान्नें विकणारांची संख्या सुमारें तीस हजार आहे.

फळफळावळ विकण्याची तऱ्हा फारच चमत्कारिक आहे.

उदाहरणार्थ कोणी नारिंगें विकण्यास घेऊन चालला असल्यास तो " नारिंगें घ्या नारिंगें " असें न ह्मणतां " ईश्वर माझी नारिंगांची पाटी हलकी करो " असे व अशाच प्रकारचे दुसरे कांहीं उद्गार काढील. वाटेंत कांहीं हजामाचीं दुकानें नजरेस पडलीं. तेथें एक उंच कठडा असून आंत भिंतीला खिळ्यावर दोन तीन उघडे वस्तरे लटकाविलेले होते. स्मश्रूचा विधि आटोपल्यावर दाराशीं एक मुलगा आरसा घेऊन उभा असतो. तो आरसा दाखवितो. कोठें कोठें मुलांच्या शाळा आढळल्या. ह्या सर्व शाळा खासगी असून त्यांत फक्त कुराण पढवितात. अशा प्रकारच्या सुमारें २८० शाळा आहेत असें आम्हीं ऐकिलें. बाजार एकंदरीनें बराच समृद्ध असून बऱ्याच ठिकाणीं त्याची ठेवणही बरी आहे. व्यापाराच्या मुख्य मुख्य जिनसा ह्मटल्या ह्मणजे आरबी सुगंधी द्रव्यें, गुलाबाचें अत्तर, नानाप्रकारच्या औषधी, लोंकरी व इतर कापड, तऱ्हेतऱ्हेचे चर्मी जोडे, जुनीं व नवीं हत्यारें, जीन, लगाम वगैरे घोड्याचें सामान, साफ केलेलीं व्याघ्रादिकांचीं चर्में, रेशमी उंची कापड, गालीचे व सतरंज्या, जवाहिर, दागिने, इत्यादि. कारागिरांचीं हत्यारें आपल्या इकडल्या सारखींच जुन्या तऱ्हेचीं व आबडधाबड होतीं.

बाजारांतील रस्ते बेताचेच रुंद असून त्यांच्या दोन्ही बाजूंनीं पादचारी लोकांकरितां अल्पपथाची योजना केली होती. कांहीं कांहीं रस्ते फरसबंदी होते. शहरच्या पुरातन भागांत रस्ते साफ नसून फारच अरुंद आहेत, व तेथें गाडी जाण्यास मार्ग नाहीं. रस्ते पाहून मला पुणें शहरांतील बोळांची आठवण झाली. जागोजाग कचऱ्यांचे ढीग असून प्रकाशाची फारच कमताई

होती. दोन्ही बाजूंनीं उंच उंच घरें असून तीं इतकीं निकटवर्ती होती कीं त्यांच्या अलिंदभूमिकांवर उभें राहून हातास हात लावतां येईल. कित्येक गल्ल्या इतक्या अरुंद होत्या कीं त्यांतून दोन स्वारांस एका समयीं इकडून तिकडे जातां आलें नसतें. जागोजागीं अनेकशृंगयुक्त अशीं नाना पंथांच्या लोकांचीं देवालयें होतीं. कुक कंपनीच्या गुमास्त्यानें मला सांगितलें कीं केरो शहरांत लहानमोठीं अशीं ५८० देवालयें आहेत.

## काफीपानगृहें.

याप्रमाणें बाजार व शहर यांची रचना पाहून आह्मी परत फिरलों. येतांना नव्या शहरांत कांहीं काफी विकण्याचीं दुकानें नजरेस पडलीं. हीं केवळ काफी विकण्याचींच दुकानें नसून त्यांचा आरामस्थलांसारखा उपयोग होत असे. विस्तीर्ण प्रांगणभूमिका असून त्यावर जागोजाग छतें मारलीं आहेत व एक एक लहान मेज व त्याभोंवती चार चार पांच पांच खुर्च्या व बाजूला दुसरीं कांहीं आरामासनें ठेविलीं आहेत. निरनिराळ्या ठिकाणीं मंडळीचे लहान लहान समुदाय बसले आहेत. कोणी काफीचें, कोणी सरबताचें, व कोणी दुसऱ्या कांहीं पेय वस्तूचें सेवन करीत आहेत. कोणी कागदाच्या चिमुकल्या विड्या ओढीत आहेत. कोणी हुक्क्यांतून झुरक्यावर झुरके घेत आहेत. कोणी गंजीफा साध्या खेळत आहेत व कोणी इरई येण्याकरितां पैसे लावून खेळत आहेत. सर्वांच्या मुद्रेवरून असा भास होत होता कीं दिनदुनिया त्यांच्या खात्रींत नाहीं व तात्कालिक सुख हेंच श्रेष्ठ. अशा स्थलीं प्रत्येकीं पन्नास साठ माणसें बसलीं होतीं. हिंदुस्थानांत काय

आणि इजिप्तांत काय, संसार दुःखमय असणारच; परंतु तें दुःख विसरण्याचीं अशा प्रकारचीं साधनें सुखप्रद झाल्याशिवाय खचित राहणार नाहींत. अशा प्रकारच्या संस्थांची गोडी आमच्या लोकांस केव्हां लागेल ती लागो !

## आरबी लोकांतील लग्न.

घरीं येतां येतां एक आरबी लोकांचें लग्न दृष्टीस पडलें. आपल्या इकडे कुणब्यांच्या लग्नांत नवरानवरीवर ज्याप्रमाणें चार काठ्यांवर एक वस्त्र टांगून धरितात त्याप्रमाणेंच येथेंही दृष्टीस पडलें. तद्देशीय वाद्येंही–दोन ढोलकीं, दोन पिपाण्या-बरोबर होतीं. पिपाण्यांचा सूर मला बेसूर वाटला. मग कदाचित् त्यांच्या गायनकलेशीं माझा परिचय नसल्या कारणानें साहेब लोक जसे आमच्या गाण्यास हंसतात त्याप्रमाणें झालें असेल !

त्यानंतर कांहीं स्थलविशेषांचे व व्यक्तिविशेषांचे फोटोग्राफ घेऊन आह्मीं घरीं आलों व भोजनोत्तर आगगाडींत बसून केरो शहराचा निरोप घेतला.

## आलेक्झांड्रिया.

केरो शहराहून रात्रीं साडेदहा वाजतां निघालों ते आलेक्झांड्रिया मुक्कामीं सकाळीं सहा वाजतां पोहोंचलों. वाटेनें थंडी बरीच लागली. एप्रिलच्या महिन्यांत इजिप्त देशांत इतकी थंडी असेल असा आमचा अजमास नव्हता. गाडीच्या डब्याचीं सर्व दारें व खिडक्या बंद करून टाकल्या होत्या; तथापि हवा येण्यास सूक्ष्म रंध्रें पुष्कळ होतीं त्या मार्गानें थंड

हवा आंत येऊन बराच त्रास झाला, व वस्त्रानें अनावृत किंवा अल्पवस्त्रावृत असे जे शरीराचे भाग होते ते बधिर होऊन गेले. पूर्वरात्रींत अंधकार असल्यामुळें व उत्तररात्रींत चंद्रिकाप्रकाश असूनही शीतार्ततेमुळें ज्या प्रदेशांतून आह्मीं आक्रमण केलें तो प्रदेश स्थूलमानानें देखील अवलोकन करण्यास सवड झाली नाहीं. आलेक्झांड्रिया स्टेशनावर उतरल्याबरोबर कुककंपनीची गाडी तयार होती, तींत बसून एका पथिकाश्रमांत गेलों. हा आश्रम साधारण शहराच्या मध्यभागांत असल्यामुळें वाटेनें शहराचा एक भाग आमच्या नजरेस पडला. रस्ते फरसबंदी असून पार्श्वपथ कांहीं कांहीं स्थलीं संगमरवरी दगडांचे होते. मंदिरें कांहीं बरींच भव्य असून कांहीं मोडून ओसाड पडलेलीं आढळलीं. हीं उच्छिन्न भवनें आरबी पाछाच्या वेळची धामधूम व तदनंतर झालेला तोफांचा भडिमार यांचीं साक्ष देत आहेत. यासंबंधानें कुककंपनीच्या आरब गुमास्त्याबरोबर माझें संभाषण झालें, यांत त्यानें आरबी पाछाची बरीच निंदा व इंग्रजांची बरीच स्तुति केली. आरबी पाछाचा पक्ष खरा असो किंवा खोटा असो, त्याबद्दल या स्थलीं विचार करणें नाहीं. परंतु एकंदरीनें असा माझा ग्रह झाला कीं, हे लोक निजनिंदा व परश्लाघा या दुर्व्यसनांस पात्र झाले आहेत, व त्यामुळेंच यांचें स्वातंत्र्य नष्ट होत आलें असून तें अजिबात नष्ट होणार. असो. आलेक्झांड्रिया शहरांत राहण्यास आह्मांस बिलकुल अवकाश नव्हता. आह्मी सहा वाजतां तेथें पोहोंचलों, व लागलीच नऊ वाजतांच्या आगबोटींतून आह्मांस कान्स्टांटिनोपलास जाण्याकरितां आगबोटीवर चढावयाचें होतें. तेव्हां त्या अवकाशां-

त आह्मी प्रातर्विधि उरकून आगबोटीवर जाण्यास सिद्ध झालों. बंदरावर जातांना शहराचा दुसरा भाग दृष्टीस पडला. एक रस्ता फारच मोठा होता व तो राजमार्ग असावा असें वाटलें. त्यावर एका स्थलीं इजिप्तचा प्रसिद्ध माहॉमेट आली याचा अश्वारूढ पुतळा होता. याच्या आजूबाजूस भव्य प्रासाद होते, त्यांमुळें व व्यापाराची गर्दी व लोकांची कार्यव्यग्रता यामुळें हें शहर कैरोपेक्षां मोठें व अधिक समृद्ध असावें असें वाटलें. येथेंही कांहीं कांहीं लहान गल्ल्या व गलिच्छ रस्ते आढळले. रस्त्यांनें लोक मोठ्या उत्सुकतेनें न्याहाळून आमच्याकडे पहात व फार विस्मित होत. बंदरावर पोहोंचल्यावर होडींत बसून आगबोटीवर चढलों तों सुमार साडे नऊ वाजले. आगबोट निघण्यास फार थोडा अवकाश होता तेवढ्यामध्यें फोटोग्राफ, विड्या, शिंपांच्या डब्या व पाकिटें इत्यादि जिनसा विकण्याकरितां कांहीं लोक आले होते त्यांच्यापासून कांहीं जिनसा व कांहीं फोटोग्राफ विकत घेतले. फोटोग्राफ विकणारानें हळूच एक बंद केलेलें पुडकें खिशांतून काढून मला कांहीं ह्मणाला. परंतु त्याची भाषा न समजल्यामुळें मी घोटाळ्यांत पडलों. तेव्हां तो मला एकीकडे नेऊन पुडकें उघडून दाखवूं लागला तों अतिबीभत्स असे फोटोग्राफ दृष्टीस पडले. असें सांगतात कीं अशा प्रकारचीं चित्रें उघडपणें विकण्याची परवानगी नाहीं. परंतु हे लोक अशा प्रकारच्या चित्रांचा संग्रह करितात. हें पक्कें ठाऊक असून त्यांकडे अधिकारी लोक कसा कानाडोळा करितात हें समजत नाहीं. कदाचित् तुर्की राज्यांत अशीच अंदाधुंदी असावयाची, हाच या गोष्टीचा खुलासा असेल. असो. आगबोट बंदरांतून बाहेर पडली तेव्हां मोठा रम-

णीय देखावा नजरेस पडला. एका बाजूस शिलामय प्रदेशाधिष्ठित असें दीपगृह दृष्टीस पडलें. एका बाजूस नगराची प्राकारभिंत्ति स्थलविशेषीं उद्ध्वस्त झालेली दृग्गोचर झाली. कांहीं शिल्पशाला व त्यांचीं उच्चतम धूमनिर्गमयन्त्रें हीं आसमन्ताद्भागाच्या उजाड प्रदेशाला एका प्रकारचें विलक्षण स्वरूप देत आहेत असें भासलें. बंदरामध्यें डुलत असलेल्या अशा असंख्य अग्निप्रेरणीय व पवनप्रेरणीय नौका नगराचा व्यवहार व आनुषंगिक संपत्ती यांची साक्ष देत होत्या. प्रातःकालचा समय असतांही वीचिसमूह शांत नसून क्षुब्ध दिसत होता. कदाचित् भूमध्यसमुद्रांतील भावी क्षोभाचीच सूचना त्यांनीं आपल्या प्रस्तुत विक्षेपांच्या योगानें केली असें दिसलें.

## भूमध्य समुद्र.

आगबोट सुरू झाली तेव्हां सर्व व्यवस्था कोणत्या प्रकारची आहे हें पहाण्यास अवकाश मिळाला. आगबोट लहान असून निजण्याच्या खोल्या लहान व गैरसोईच्या होत्या. नौकरचाकर माणसें दांडगीं व बेपर्वा व त्यांतून त्यांस आमची भाषा समजत नसे, व आह्मांस त्यांची समजत नसे, यामुळें फार हाल झाले. तशांत जसजशी आगबोट भरसमुद्रामध्यें गेली तसतशी फार हलूं लागली व जिवास फार अस्वस्थता वाटूं लागली. सुएझपर्यंत सुखरूप येऊन पोंचल्यावर माझी समुद्राची भीति बरीच कमी झाली होती; व त्या दहा दिवसांच्या सफरीपुढें ह्या चार दिवसांच्या सफरीची काय विशाद असें वाटत होतें. परंतु जेव्हां वरुणमहाराजांनीं आपलें पूर्वपरिचित असें हिंदिमहासागरांतील शांत स्वरूप टा-

कून भूमध्य समुद्रांत भयंकर स्वरूपाचा स्वीकार केला ते-व्हां आमची फार गाळण झाली. मी तर स्वस्थ पडून राहि-लों व उठून बसण्याची छाती होईना. कांहीं वेळ वरच्या मजल्यावर धूम्रपानगृहांत पडलों तों थोडीशी निद्रा लागली. जागा झाल्यानंतर आपल्या खोलींत गेलों तों अस्वस्थता जा-स्त वाटली. परंतु उठून उभें राहण्याची सोय नव्हती. याप्र-माणें पहिल्या दिवशीं फार हाल झाले. साधारण असा नियम आहे कीं, मनुष्यास आगबोट लागते असें वाटलें ह्मणजे त्यानें वरच्या मजल्यावरच मोकळ्या हवेंत पडावें, ह्मणजे फार उप-द्रव होत नाहीं. खोलींत गेलें ह्मणजे स्वच्छ हवा न मिळून जीव गुदमरतो व मनुष्य जास्ती घाबरतो. दुसरें असें कीं ही आगबोट लांबीच्या मानानें रुंद जास्त असल्या कारणानें ला-टेसरशी वर उडे, त्यामुळें मनुष्याला एकदम खालून उचलल्या-सारखें वाटे. आगबोट नियमित प्रमाणानें लांब व रुंद व खोल असली ह्मणजे हालली तरी एका बाजूकडून दुसऱ्या बाजूवर कलते व त्यामुळें इतका त्रास होत नाहीं. सारांश ह्या आगबोटींत बसल्याबद्दल आह्मा सर्वांस पश्चात्ताप झाला. ही आगबोट सरकारी डांकेची होती. परंतु याशिवाय कांहीं रशिय-न आगबोटी जातात, त्या फार चांगल्या असतात असें ह्मणतात. ह्या प्रसंगीं माझ्या बरोबरच्या मंडळीनें माझी फार फार काळजी घेतली, व मला चांगला धीर दिला. दुसऱ्या दिवशीं आम्हीं भरसमुद्र सोडून आंत वळलों होतों त्यामुळें आगबोट फार हालत नव्हती; म्हणून दुपारीं वर-च्या मजल्यावर येऊन थोडासा फिरलों तों चित्तास स्वस्थ-ता वाटून उत्साह वाटला. हवा थंड असून बाजूनें पर्वतमय

द्वीपें दृष्टीस पडत होतीं. त्यांपैकीं क्यान्डिया हें एक होतें. तिसऱ्या दिवशीं सकाळीं आह्मी पिन्हिअस बंदरांत जाऊन पोहोंचलों. या ठिकाणीं माल चढविण्याकरितां व उतरण्याकरितां सहासात तास आगबोट उभी राहणार होती म्हणून उतरून आथेन्स शहर पहाण्याचा आह्मी बेत केला.

## आथेन्स शहर.

आगबोट उभी राहिल्याबरोबर उतरण्याच्या बाजूस लहान लहान होड्यांची एकच गर्दी झाली, व त्यांतून पुष्कळ लोक आगबोटीवर चढून आले, व उतारू लोकांच्या भोंवती जमून त्यांस उतरण्याचा व आथेन्स शहर पाहण्याचा फार आग्रह करूं लागले. त्यांमध्यें एक कुक कंपनीचा गुमास्ता होता त्यास बरोबर घेऊन आह्मी उतरलों. धक्का जवळच होता तेथें उतरून पायांनींच आगगाडीच्या स्टेशनावर गेलों तों वाटेनें आमच्या भोंवती दिदृक्षुजनांची गर्दी जमली. पिन्हिअस गांव लहान दिसला. घरें बेताबाताचींच असून स्वच्छताही जितक्यास तितकीच होती. लोक फार संपन्न दिसत नव्हते. आह्मी स्टेशनावर पोहोंचलों तों गाडी निघण्यास थोडा अवकाश होता ह्मणून प्रतीक्षागृहांत थोडा वेळ थांबलों; तों खिडक्यांच्या बाजूनें व दरवाजांत लोकांची फारच गर्दी झाली. जे लोक पुढेंच उभे होते त्यांस यथेच्छ पाहण्याची संधी मिळाल्या कारणानें ते आमच्या डोक्याचे रुमाल, आमच्या महाराजांच्या गळ्यांतील विभूषणें, त्यांच्या अंगांतील हिंदुस्थानी अंगरखे व पायांतील पायजमे यांचें अनुक्रमें निरीक्षण करून आपल्या आपल्यामध्यें चर्चा करीत.

मागल्या बाजूचे लोकांस असें करण्यास अवकाश न मिळाल्या कारणानें ते अधीर होऊन पुढल्या लोकांस ढकलीत किंवा पायांच्या अग्रभागावर उभें राहून त्यांच्या खांद्यावरून आमच्याकडे पहात, व दिदृक्षेचें कोड थोडया अंशीं तरी पूर्ण झालें ह्मणून धन्यताप्रदर्शक मुद्रेनें मागें वळत. लहान मुलांची व वामनाकृतिमंडळींची तर धांदल विचारूंच नका. कांहीं वेळानें गाडी निघण्याचा समय जवळ आला ह्मणून आह्मी गाडींत जाऊन बसलों; तों तेथेंही लोकांची गर्दी जमली. पिन्हिअसहून अथेन्स शहरापर्यंत सुमारें अर्ध्या तासाचा गाडीचा रस्ता आहे. वाटेनें प्रदेश लागला तो बराच रम्य होता. झाडझाडोरा बराच असून मधून मधून क्षुद्र पर्वत दृष्टीस पडत होते व त्यांच्या मध्यभागीं संचरण करणारे मेघ दिसत होते. त्यांवर पडलेलीं सूर्यकिरणें त्यांच्या उपरितन भागास दीप्तिमान् करीत होतीं. परंतु त्या किरणांचा ताप त्या मेघांच्या खालच्या भागास बाध करीत नव्हता, व कुमारसंभवांत सांगितल्याप्रमाणें " अधःसानुगत " छाया सेवन करणारे कांहीं पुरुष, स्त्रिया व बालक दृष्टीस पडले. जमीन बहुतेक हिरवीगार असून कांहीं कांहीं ठिकाणीं बागवान विहीरींतून पाणी काढून झाडांस लावीत होते. तो मुलूख पहात असतां मी आपला देश सोडून परदेशांत गेलों आहें याचें मला तावत्कालपर्यंत विस्मरण झालें. अथेन्स शहरीं पोहोंचल्यावर आह्मी एक घोड्याची गाडी करून प्रथम नव्या शहरांत गेलों व तेथें एका पथिकाश्रमांत चहापाण्याची व्यवस्था लावून पुढें इतिहासप्रसिद्ध पुरातन भाग पहाण्यास गेलों. नवें शहर बरेंच सपाटीवर वसलेलें असून तेथून जुन्या

शहरीं जाण्यास चढणउतरण लागते. परंतु रस्ता साफ असल्या कारणानें गाडींतून उतरावें लागत नाहीं. जेव्हां आह्मी नवें शहर सोडून जुन्या शहराकडे वळलों व कांहीं वेळानें दुरून प्राचीन उच्छिन्न देवालयें दृग्गोचर झालीं तेव्हां मनोवृत्ति कांहीं विलक्षण प्रकारची झाली. प्रथम असें नवल वाटलें कीं, लहानपणीं जेव्हां ग्रीस देशाचा इतिहास मी हातीं घेतला व त्यांतील धर्मसंस्था व लोकसंस्था यांचें चमत्कारिक वर्णन मी वाचलें तेव्हां तदनुषंगानें स्थलविशेषांची जी हकीकत अवलोकनांत आली तिच्याविषयीं मी केवळ कल्पनेवरच निर्वाह करून कृतकृत्यता मानली; व त्या प्रसंगीं असें स्वप्नींही आलें नाहीं कीं तीं स्थलें प्रत्यक्ष अवलोकन करण्याचा अवसर भविष्यकालीं प्राप्त होईल. अशीं स्थलें स्वचक्षूंनीं पहाण्याचा आज प्रसंग आला आहे असें वाटून औत्सुक्याची पराकाष्टा झाली. ही मनोवृत्ति केवळ सुखसंवेदक होती; परंतु तिच्या जोडीला दुसरी दुःखसंवेदक एकसमयावच्छेदेंकरून प्रादुर्भूत झाली. काळाचा महिमा विलक्षण आहे. जो ग्रीस देश पूर्वकालीं भाग्याच्या शिखरास चढला होता; जेथें सर्व विद्या व कला पूर्णावस्थेप्रत प्राप्त झाल्या होत्या; जेथील लोकांच्या प्रज्ञेची कीर्ति अमर होऊन राहिली आहे; जेथें सोलनसारखे स्मृतिशास्त्रकार, पेरिक्लीजसारखे राजकार्यकुशल पुरुष, हिराडोटससारखे प्रासादिक इतिहासकार, साफेक्लीज व युरिपिडिजसारखे नाटककार, डिमास्थनीजसारखे वक्ते, लिआनिडाजसारखे पराक्रमी पुरुष, साक्रेटीजसारखे तत्त्ववेत्ते झाले—त्या देशाची पायमल्ली होऊन तो निकृष्ट दशेप्रत पोहोंचावा, व जें अथेन्सशहर एका समयीं वैभवाचें माहेरघर असून जागोंजागीं अति-

कुशल अशा कारागिरांच्या कर्तृत्वाची साक्ष देत असेल त्यांनें-च आतां एका शून्य अशा वनस्थलीमध्यें आपल्या उच्छिन्न अशा मन्दिरांच्या योगानें सहृदयप्रेक्षकजनांच्या हृदयांत विषाद उत्पन्न करावा ह्यापेक्षां आश्चर्य तें काय असावें ? अथवा जगाची रहाटीच अशी आहे ! कवीनें ह्मटलें आहे कीं:—

भगवन्तौ जगन्नेत्रे सूर्याचन्द्रमसावपि ।
पश्य गच्छत एवास्तं नियतिः केन लंघ्यते ॥

कालाचा प्रवाह उलटण्याची शक्ति कोणास आहे ? असो.

प्रथम आह्मी पेझिस्ट्रेटस राजानें बांधलेल्या आलिम्पियन जुपिटरचे देवालयाशीं उतरलों. त्या ठिकाणीं केवळ सोळा शुभ्र संगमरवरी दगडांचे खांब मात्र उरले आहेत. त्यांपैकीं कांहीं उभे आहेत व कांहीं अस्ताव्यस्त पडलेले आहेत- असें सांगतात कीं ह्या देवळास एकंदर सुमारें १२० खांब होते. अवशिष्ट राहिलेले खांब उंचीला सुमारें तीन पुरुष असून मलिन दिसतात. अथेन्स येथील जुन्या इमारती दुरुस्त करून त्यांची व्यवस्था चांगली ठेवण्याकडे फारसें लक्ष दिसलें नाहीं. आपल्या हिंदुस्थानांत देखील ह्या गोष्टींविषयीं सरकार बरीच खबरदारी घेत आहे, व अशा प्रकारची व्यवस्था तेथें कां नाहीं ह्याचें कारण समजत नाहीं. ह्या स्थलाहून आह्मी नाटकगृह पहाण्यास गेलों. या जागीं एका बाजूस रंगभूमीचा ओटा मात्र दिसत असून त्यासमोर अर्धवर्तुलाकार संगमरवरी दगडांच्या आसनपंक्ति आहेत. रंगभूमीच्या चवथऱ्याच्या बाजूवरही तशाच प्रकारच्या दगडांत कोरलेल्या भिन्न भिन्न देवतांच्या मूर्ति आहेत. आसनपंक्ति सुमारें १५—१६ अजूनप-

र्यंत राहिलेल्या आहेत. ह्या आसनांमध्यें श्रेष्ठ पुरोहितास अग्रस्थान असून त्यांच्या बाजूस इतर पुरोहितवर्गास त्यांच्या त्यांच्या मानाप्रमाणें नेमलेलीं स्थानें आहेत. ह्याच रंगभूमीवर साफोक्लीज व युरिपिडिज यांनीं आपल्या नाटकांचे प्रयोग करून दाखविले असें सांगतात. येथून आम्ही अक्रापोलीस पहाण्यास गेलों.

## अक्रापोलीस.

अक्रापोलीस हें अथेन्सच्या जुन्या किल्ल्याचें नांव आहे. हा किल्ला एका कड्यावर आहे. वर जाण्यास एकाच बाजूनें मार्ग असून बाकी तिनही बाजूंनीं तुटलेला कडा आहे. ह्याच किल्ल्यामध्यें अथीना मिनर्व्हा व दुसऱ्या कांहीं मुख्य देवतांचीं मंदिरें आहेत. आह्मी वर चढून दरवाजाशीं गेलों तों द्वार बंद असून द्वारपालानें गुडफ्रायडेनिमित्त उघडण्याची मनाई आहे म्हणून सांगितलें. तेव्हां आमचा फार हिरमोड झाला. दुसऱ्या दिवसपर्यंत रहाण्याची सवड नव्हती. द्वारपालास कांहीं गोडीगुलाबीच्या व कांहीं धमकावणीच्याही गोष्टी सांगितल्या, तथापि तो दाद लागूं देईना. तेव्हां निरुपाय होऊन आह्मी स्तब्ध उभे राहिलों. इतक्यांत अशी युक्ति सुचली कीं द्वारपालाशीं घासाघीस न करितां मुख्य अधिकाऱ्यांकडून परवानगी मिळविण्याचा यत्न करावा, व त्याप्रमाणें यत्न सफलही झाला. आंत शिरतांना दोनही बाजूंनीं पडून गेलेल्या इमारती होत्या. पुढें पुष्कळ पायऱ्या लागल्या त्या चढून आह्मी अथीनामिनर्व्हाच्या मुख्य मंदिरांत गेलों. मंदिराचा सभामंडप कायम असून त्याचे आंतील खांब कोरीव मूर्तींचे होते. देवतेची मूर्ति वगैरे हल्लीं कांहीं नाहीं. परंतु ती अमुक ठिकाणीं होती असें

स्थान दाखवितात, व त्या समोर होमकुंडें व उपहार अर्पण करण्याची जागा वगैरे दाखवितात. मंदिराच्या चोहोंबाजूंनीं देखावा फारच मनोरम आहे. एका बाजूनें एक उंच टेकडी आहे, व तिच्या अग्रभागीं लाक्रियेटिसचें देवायतन श्वेतपुष्पोद्गमयुक्त अशा वृक्षाची शोभा पावत आहे. एका बाजूनें नव्या शहरांतील कवलारू घरांची गर्दी दिसत आहे. एका बाजूनें सालामिसचें द्वीप, थर्मापिलीचा डोंगर व माराथानची रणभूमि—ज्या तिनही स्थलीं जय मिळाल्यानें ग्रीसदेशाच्या स्वातंत्र्याचें रक्षण झालें—आपापल्या परीनें प्राक्कालीन ऐतिहासिक कथांचें स्मरण प्रेक्षकांस देऊन त्यांचें चित्त व्यग्र करून टाकीत आहेत. अशा प्रकारचा उद्वेगकारक व चमत्कृतिजनक देखावा पाहून तें स्थल सोडावेंसें वाटेना. नानाप्रकारच्या विचारांचे तरंग व कल्पनांच्या लहरी एकावर एक येऊं लागल्या. परंतु अवकाश नसल्या कारणानें मोठ्या संकटानें खालीं उतरलों. जवळच एक लहानशी टेंकडी लागली; तिच्यावर उभा राहून अपासल पाल यानें ग्रीक लोकांस पवित्र धर्माचा उपदेश केला असें आह्मांस सांगितलें. तेथून थीस्यूसच्या मंदिरांत आह्मीं गेलों. हें स्थान फार विस्तीर्ण नसून इमारतीच्या बाजूनें हर्क्युलीजनें केलेल्या नानापराक्रमाच्या आख्यायिकांचीं निदर्शक अशीं चित्रें कोरलेलीं आहेत. तेथून आह्मीं नव्या शहराकडे वळलों. वाटेनें पाठशाळा व राजमहाल या दोन्हीं इमारती लागल्या. पाठशालेची रचना प्राचीन शिल्पपद्धतीप्रमाणें होती. पुढल्या बाजूस पुष्कळ पायऱ्या असून त्यांवर लहानसें पटांगण व त्यावर शुभ्र मर्मरोपलाचे स्तंभ व मध्यमंदिराच्या दोहोंबाजूंस

दोन पुतळे होते. शहराचा हा भाग फार स्वच्छ असून सुंदर होता. नंतर पूर्व निर्दिष्ट पथिकाश्रमांत जाऊन अल्पाहार करून कांहीं फोटोग्राफ विकत घेऊन आल्या वाटेनें परत आगबोटीवर चढलों. इतक्यांत आकाश मेघाच्छादित होऊन थोडा पाऊसही पडूं लागला, त्यामुळें तुफान होण्याची धास्ती वाटली. परंतु फारसा उपद्रव झाला नाहीं. सुमारें चार वाजतां आगबोट बंदरांतून बाहेर पडली.

## आगबोटींत झालेले स्नानाचे हाल.

बारीक पाऊस पडल्या कारणानें हवेंत बराच गारठा आला व त्यामुळें संध्याकाळच्या समयीं वरच्या मजल्यावर बसून स्वच्छ हवेचा उपभोग घेण्यास सवड झाली नाहीं. त्यामुळें बरीच अस्वस्थता वाटून रात्र सुखानें गेली नाहीं. प्रातःकालीं सूर्योदयाच्या पूर्वीं उठून मुखमार्जनानंतर स्नान करण्याच्या उद्योगास लागलों. ह्या आगबोटींत बसल्यापासून प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें तीन दिवस स्नान करण्यास सवड झाली नव्हती. तेव्हां स्नान केल्यानें हुषारी जास्त वाटेल अशा हेतूनें ह्या उद्योगास लागलों. परंतु मोठी निराशा झाली. ह्या आगबोटींत फारच गैरसोय वाटली. दुसरें असें कीं मला माझ्या सोईप्रमाणें व खुषीप्रमाणें स्नान करावयाचें होतें. चाकरानें साहेबी रीतीप्रमाणें हौद भरून टाकला. परंतु ती रीत मला पसंत नव्हती. एकदम भरलेल्या पाण्याच्या हौदांत एकदां अंग स्वच्छ करून फिरून ह्याच पाण्यांत डुंचण्याइतकी विलायती सुधारणा ह्या वेळेस माझ्या मध्यें आली नव्हती व अजूनही आली नाहीं हेंही सांगणें जरूर आहे. जेथें जेथें धारायंत्राची योजना

नसे तेथें तेथें पातेल्यांत पाणी घेऊनच मी निर्वाह केला. पण ह्या कार्यभाग उरकण्यास या स्थलीं मोठी पंचाईत पडली. मला ज्या ज्या उपकरणांची गरज तीं तीं उपकरणें प्राप्त होण्याचा संभव दिसेना. नोकरांस इंग्रजी भाषा समजत नव्हती हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां खाणाखुणांनीं काम करून घेण्याचा बेत केला तो सिद्धीस जाईना. मला ऊन केलेलें गोडें पाणी हवें होतें पण तें मिळतें कसें? अशा विवंचनेंत पडून कसा तरी निर्वाह करणार होतों इतक्यांत एक उतारू गृहस्थ त्या बाजूनें जात होता तो जवळ आला व त्यानें आमची झटापट मिटवून आमच्या कामाचा निकाल लावला. असलें हें स्नानपर्व आटपून कपडे बदलून वर गेलों तों लवकरच स्मर्ना बंदरांत शिरल्याची सुवार्ता कानीं आली. मला ह्या आगबोटीचा फारच कंटाळा आला होता. जितका वेळ तिच्या बाहेर जाईल तितका मला श्रेयस्करच होता.

## स्मर्ना बंदर.

समुद्र सोडून अखातांत वळल्याकारणानें पाणी अगदीं शांत होतें. दोन्ही बाजूंनीं लहान लहान टेंकड्या दिसत होत्या व त्यांच्या पायथ्याशीं लहान लहान खेडीं दिसत होतीं. डोंगरांचे पृष्ठभाग हिरव्या गार गवतानें आच्छादित होते व वर पडत असलेल्या सूर्याच्या कोमल किरणांनीं अवर्णनीय शोभा पावत होते. अशा स्थितींत आगबोटीचा वेग हळू हळू कमी होत चालला व कांहीं वेळानें आगबोट थांबली. बंदरांतून शहराची बहुतेक लांबी दिसत होती. स्मर्ना हें शहर एका डोंगराच्या पायथ्याशीं बसलेलें आहे. ह्या डोंगराच्या अग्रभागीं किल्ल्याचे

तट दृष्टीस पडले. डोंगराचा प्रत्येक भाग पूर्वनिर्दिष्टपर्वतांप्रमाणें मनोहर नसून रूक्ष दिसत होता. धक्याच्या बाजूनें जी भवनराजि दृग्गोचर होत होती ती नगराच्या ऐश्वर्याची व व्यवस्थेची साक्ष देत होती. परंतु पश्चाद्वलोकनानें हा ग्रह क़ायम राहिला नाहीं. आगबोट उभी राहिल्याबरोबर पुष्कळ लोक वर चढून आले व पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच आह्मास उतरण्यास आग्रह करूं लागले. त्यांपैकीं एका बरोबर आह्मी होडींत बसून धक्क्यावर उतरलों.

## स्मर्ना शहर.

धक्क्यावर घोड्याच्या गाड्या दिसल्या नाहींत. तथापि आमच्या बरोबरच्या मनुष्यानें हवी असल्यास गाडी जवळूनच घेऊन येतों ह्मणून सांगितलें. परंतु जास्त चवकशीअंतीं असें समजून आलें कीं सुखानें गाडींत बसून जाण्यासारखे रस्ते थोडे आहेत व थोड्या वेळांत बाजार वगैरे पहाणें असल्यास पायीं जाण्यासारखें सुख नाहीं. ही गोष्ट पुढें आमच्या चांगली प्रत्ययास आली. ह्मणून आह्मीं गाडीचा नाद सोडून दिला. धक्क्याला लागून व धक्क्याशीं समान्तर असा जो रस्ता दिसत होता तो मोठा असून त्या बरोबरीचा दुसरा रस्ता सर्व शहरांत नव्हता. ह्या रस्त्याशीं समान्तर असा दुसरा एक रस्ता रुंदीला याच्या खालोखाल परंतु व्यापार वगैरे संबन्धानें जास्त महत्वाचा असा आहे. या रस्त्यावर सर्व मोठ्यामोठ्या व्यापाऱ्यांचीं दुकानें आहेत. सर्व रस्ते फरसबंदीचे होते. परंतु त्यांपैकीं मुख्य मुख्य रस्ते तेवढेच सारखे व साधारणपणें व्यवस्थित असून बाकीचे उंचसखल, खाचखळग्याचे असे होते. कांहीं

कांहीं रस्त्यांच्या मध्य भागांतून गटाराचें पाणी जात असल्यामुळें फारच दुर्गंधी येत होती. रस्त्यावर जिकडे तिकडे कचरा पडलेला असून कांहीं ठिकाणीं मनुष्यांच्या व जनावरांच्या मलमूत्राचाही प्रत्यय येत होता. भरबाजारांत एके ठिकाणीं मेंढरांचे कळपच्याकळप उभे केले होते व त्यांभोंवतीं क्रयविक्रयोत्सुक जनांची गर्दी होती; व कोणत्याही प्रकारच्या व्यवस्थेचा पूर्ण अभाव असल्याकारणानें सर्वत्र जसा कांहीं कल्लोळ उडून गेला होता. तुर्क लोकांचें हेल काढून संभाषण व त्यांशीं मेषयूथांच्या रुताचें संमीलन झाल्याकारणानें विचित्र भासणारा असा ध्वनि; अगोदरच दुर्गन्धयुक्त वीथिका; व त्यांमध्येंच मेंढरांचें मलमूत्रविसर्जन, व यामुळें कलुषीकृत अशा वातावरणाचा सूर्यतापनिवारणार्थ वर टांगलेल्या छतांच्या योगानें संरोध; व तशामध्यें शाकभुक् महाराष्ट्र ब्राह्मणास अत्यंत अनभिमत असा ठिकठिकाणीं असलेल्या मांसपाचकांच्या दुकानांतून निघत असलेला दर्प—ह्या सर्व कारणसमवायानें आशियांतल्या तुर्कस्थानची राजधानी जें स्मर्ना शहर त्याविषयीं फारच प्रतिकूल असा मनाचा ग्रह झाला. एका रस्त्यांतून दुसऱ्या रस्त्यांत जाण्याकरितां वांकडे तिकडे संकुचित व लोकांच्या गृहांच्या प्रांगणभूमिकांतून गेलेले असे मार्ग होते. कांहीं कांहीं मोठीं दुकानेंही अशा आड रस्त्याला होतीं. आह्मीं एका गालिच्यांच्या वखारींत गेलों होतों. तेथें लाखों रुपयांचे गालिचे ठेविलेले होते. ही वखार एका युरोपियन गृहस्थाची होती तरी व्यवस्था बिलकुल नजरेस पडली नाहीं. गालिच्यांची किंमत जुनेपणावर आहे असें तेथें समजलें. कांहीं गालिचे फारच मजित दिसत होते, व त्यावरून ते

फारच पुरातन असावे असें सहज लक्षांत येत होतें. परंतु कालात्ययानें जितकें त्यांचें सौंदर्य नष्ट झालें होतें तितक्याच मानानें त्यांची किंमत जास्त होती. ह्याचें नांव संप्रदाय ( फ्याशन )! ह्या दैवताचें प्राबल्य युरोपांत तर पुष्कळच आहे; परंतु बिचाऱ्या आमच्या आशियाखंडांतही त्याचा इतका प्रादुर्भाव होत चालला आहे ना ? असो. येथेंही केरोशहराप्रमाणें लिंबांचें सरबत विकणारी मंडळी दृष्टीस पडली. परंतु यांची तऱ्हा थोडी भिन्न होती. यांच्या कमरेभोंवती एक वस्त्र गुंडाळलेलें असून त्यामध्यें एक मोठा काचकलश खोविलेला होता व त्याचे बाजूनें दोनतीन काचेचीं पानपात्रें होतीं. येथें हुक्केही विलक्षण आढळले. चिलीम ठेवण्याची काठी उंच नसून जलाशय लहान व काचेचें होतें. त्यालाच एक लहानशी नळी जोडलेली दिसली. हे हुक्के जरी मोठ्या नेचासारिखे झोंकदार व ऐटबाज दिसत नव्हते तरी हलके असून फार सोयस्कर असावेसे वाटलें.

शहरची वस्ती सुमारें दोन लक्षांची आहे. त्यांपैकीं जवळ जवळ निम्मे ग्रीकलोक आहेत. याठिकाणीं ग्रीकलोकांची वस्ती आथेन्सच्या दुप्पट आहे. बाकी राहिलेल्या निम्मे भागांत तुर्क लोकांची संख्या मोठी आहे व बाकी राहिलेल्या अंशांत ज्यू, आर्मिनियन व युरोपियन यांचा समावेश होतो.

वर सांगितल्या प्रमाणें शहर जरी गलिच्छ आहे तथापि व्यापार फार मोठा आहे. वर्षाच्या कांठीं सुमारें तीन कोट रुपयांच्या आयात व निर्गत मालाची घडामोड आहे. असें असूनही ह्या ठिकाणीं व्यापाररक्षण व वृद्धि यांस आवश्यक अशा

संस्था बिलकुल नाहींत. मुख्य व्यापाराचे जिन्नस ह्मटलें ह्मणजे अंजीर, द्राक्षें व मनुका, रेशीम व जर, गालिचे, रंग करण्याचीं द्रव्यें, स्पंज, अफू व औषधि हे होत. वाळलेल्या अंजिराविषयीं स्मर्नाची प्रख्याति आहे.अंजीर वाळविण्याची कला दुसऱ्या कोठल्याही लोकांस साधत नाहीं असें म्हणतात. दरवर्षी सुमारें ५००० टन अंजीर बाहेर जातात. रेशमी किडे पोसून रेशीम उत्पन्न करण्याचा उद्योग फार चालतो. शहराच्या आजूबाजूस तुतीचीं झाडें फार आहेत.रेशमी कापड फार बारीक व खुमासदार निघतें व त्याचप्रमाणें जरीच्या किनारी व पडदे फारच सुबक असतात. अफूचा व्यापार बहुत करून जाव्हा बेटाशीं चालतो. सुमारें पंचवीस लक्ष रुपयांचा स्पंजाचा व्यापार आहे. आह्मी कांहीं रेशमी कापड व कांहीं स्पंज खरेदी केले व एक प्रकारचा हलवा येथें होत असतो तो घेतला. बंदुका, तरवारी, जंबिये, कट्यारी वगैरे नानाप्रकारचीं हत्यारेंही येथें बनतात, व जुन्या प्रकारच्या विचित्र नाण्यांचें तर हें मुख्य संग्रहालयच आहे असें ह्मटलें असतां चालेल. येथें प्राचीन ग्रीक, इराणी, रोमन वगैरे नाणीं फारच मिळतात, व येथूनच युरोपांतील मोठमोठ्या संग्रहालयांत जातात. याप्रमाणें थोड्या वेळांत जेवढें दिसलें तेवढें पाहून आह्मी शहरास सलाम केला व सुमार साडेतीन वाजतां आगबोटीवर परत आलों.

## स्मर्ना येथील युद्धविद्यालयांतील मुलें.

आह्मी आगबोटीवर परत आलों तों तेथें पुष्कळ १० पासून १५ वर्षांच्या वयाचीं मुलें जमलीं होतीं. हीं मुलें स्मर्ना येथील युद्धविद्यालयांतील छात्रवर्ग असून कान्स्टान्टिनोपलास

जाण्याकरितां आगबोटीवर चढलीं होतीं. यांचे गुरुवर्य यांस पोहोंचविण्यास तेथें आले होते; व युद्धवाद्यांचीं वगैरे साहित्यें बरोबर होतीं. आगबोट निघण्याची वेळ जशी जवळ आली तसा एक एक मुलगा आपल्या गुरुवर्याजवळ येऊन त्यांचा उजवा हात आपल्या उजव्या हातांत घेऊन त्याचें सन्मानपूर्वक चुंबन करी व नंतर आपला उजवा हात आपल्या छातीला, तोंडाला व डोक्याला लावी. हा त्यांच्यामध्यें मोठा सन्मानसूचक विधि आहे. सर्व मुलांची मुद्रा प्रफुल्लित असून त्यांचे पोषाक नीटनेटके होते. डोक्यास तुर्की तांबडी टोपी व बाकी पोषाक साहेबी रीतीचा. शेवटीं वाद्यांचा गजर होऊन हे गुरुवर्य आगबोटीवरून उतरले व आगबोट चालू झाली.

## एका मडमेशीं संवाद.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आमच्या उजव्या बाजूस आह्मास ग्रीक लोकांचें कुरुक्षेत्र जें ट्राय तें लागलें. याच दिवशीं आगबोटीवर इंग्लंडचा एक वृद्ध चित्रकार होता त्याच्या मडमेशीं माझा संवाद झाला. मुंबईहून निघाल्यापासून जरी आगबोटींत पुष्कळ इंग्लिश स्त्रियांशीं सहवास झाला तरी संभाषणाचा हा पहिलाच प्रसंग. साहेब लोकांत स्त्रियांचें माहात्म्य मोठें. तेव्हां त्यांच्याशीं त्यांच्या शिष्टाचाराविरुद्ध असें वर्तन झाल्यास अडाणीपणा पदरांत येऊन मोठाच प्रसंग गुजरावयाचा ह्मणून मी फारच भिऊन होतों. परंतु ह्या बाईनीं जेव्हां आपण होऊन असा प्रसंग आणिला तेव्हां माझा नाइलाज झाला. या स्त्रियांची नेहेमींची रीति ह्मटली ह्मणजे मोठ्या तोऱ्यानें, हळू, ऐकूं न येईल असें, पुष्कळ आढेवेढे घेऊन बो-

लावयाचें. परंतु जिच्याशीं माझा संवाद झाला ती बाई फार सत्वस्थ असून तीस जिज्ञासा फार होती ह्मणून आमचें बरेंच जमलें, व पुष्कळ सामाजिक व ऐतिहासिक विषयांवर बोलणें झालें. प्रथम तिला माझ्या इंग्रजी बोलण्याचें मोठें नवल वाटलें. ती ह्मणाली कीं, मी परकी असून मला इतकें अस्खलित इंग्रजी बोलणें व शुद्ध उच्चार कसे आले ? मी तिला सांगितलें कीं कालाची गति अशी कांहीं विचित्र आहे कीं आह्मी हिंदु लोक स्वभाषेच्या ज्ञानार्जनाची बिलकुल अपेक्षा न धरितां लहानपणापासून इंग्रजीचा अभ्यास करितों, तेव्हां इतकी तयारी होणें यांत नवल तें कोणतें ? मी तर सामान्य यःकश्चित् खर्डेघाशा. परंतु जर आमच्या इकडील वाक्पटु मंडळीचीं व्याख्यानें तिनें ऐकिलीं तर ती तोंडांत बोटच घालून राहील असें मला वाटलें. असो. सामाजिक विषय निघाले त्यांत रखमाबाई आल्याच. तेव्हां त्या संबंधानें माझ्या मतें जो त्या बाईंचा गैरसमज होता त्याचा निरास करण्याचा मीं यत्न केला व तो कांहीं अंशीं सफलही झाला असें मला वाटलें.

## डार्डनेलीसची सामुद्रधुनी.

सुमारें दोन प्रहर दिवस आल्यानंतर आम्ही डार्डनेलीसच्या सामुद्रधुनींत शिरलों. दोन्हीं बाजूनें एकसारखी जमीन दृष्टीस पडत होती. सुमारें तीन चार वाजतां आह्मी डार्डनेलीस गांवीं पोहोंचलों. तेथें आगबोट अंमळ उभी राहिली व कांहीं उतारू वर घेऊन फिरून चालू झाली. ह्या गांवीं द्राक्षासव व मातीचीं भांडीं सुरेख होतात. ह्या गांवाच्या आजूबाजूस पुरातन कालापासून प्रसिद्ध असलेले असे किल्ले आहेत. एथून पुढें

सामुद्रधुनीचें पात्र बरेच कोसपर्यंत समान रुंदीचें असून आजूबाजूस देखावा फार रमणीय आहे. हरितवर्ण अशीं शस्यक्षेत्रें कृषीवलांच्या उद्योगशीलत्वाची साक्ष देऊन प्रेक्षकांचा नेत्रोत्सव करीत आहेत. स्थलीं स्थलीं द्राक्षांचे वेल लावलेले आहेत व ते आपल्या सुंदर फलगुच्छांनीं दृग्विषयास वैचित्र्य देत आहेत. मधून मधून लहान लहान खेडीं दिसत आहेत व त्यांमुळें एकंदर प्रदेश अधिक रमणीयता पावत आहे. ह्या समयीं आकाश अभ्राच्छादित असून वृष्टि होण्याचीं चिन्हें दिसत होतीं. त्यामुळें एकपरी असें वाटलें कीं सूर्याचा प्रकाश असता तर हा प्रदेश विशेष नयनाभिराम झाला असता. परंतु दुसऱ्या परी असेंही वाटलें कीं नभोवितान मेघांनीं आक्रान्त झाल्यामुळें व वृष्टि आसन्न असल्यामुळें सर्व दिशा कुंद होऊन गेल्या होत्या व त्यामुळें एक प्रकारचें जें विलक्षण सौंदर्य आलें होतें त्याचा अनुभव सूर्यप्रकाशांत आला नसता. अशाच प्रकारचा नयनोत्सव अनुभवीत सायंकालपर्यंत कालक्रमण केला. याच दिवशीं एका वेल्श गृहस्थाशीं व एका तुर्क गृहस्थाशीं माझी ओळख झाली. हा वेल्श गृहस्थ वकिलीचा धंदा करीत असून त्याची पत्नी नुकतीच मेल्या कारणानें निर्विण्णचित्त असा होता. थोड्या संभाषणांतच त्यानें माझ्याशीं बरीच सलगी केली, व सुखदुःखाच्या गोष्टी सांगितल्यानें आह्मी तात्कालिक स्नेही बनलों. त्यानें मला सवड झाल्यास त्याच्या गांवीं येण्याचें निमंत्रण केलें व मींही त्याला हिंदुस्थान देश पहाण्याची शिफारस केली. तो गृहस्थ केवळ दुःखविनोदनार्थच प्रवास करीत होता. परंतु वर सांगितलेल्या रम्य वस्तु पाहून त्याच्या उत्कंठेचा अपनोद न होतां ती वृ-

द्धि पावली असेल यांत बिलकुल शंका नाहीं. दुसरे जे तुर्क गृहस्थ सांगितले ते आलेग्झांड्रियाच्या गवर्नराचे चिरंजीव असून त्यांच्या बरोबर त्यांची मातुःश्री होती. यांस इंग्रजी बोलतां येत नव्हतें. केवळ व्यवहारांतले दहावीस शब्द मात्र येत होते. यांनींही परत जातांना आलेग्झांड्रियास त्यांच्या घरीं उतरण्याचा आग्रह केला. या लोकांपैकीं पुष्कळांस बोलतांना खांदे वर करण्याची लकब असलेली दृष्टीस पडली. तशीच कांहीं ग्रीक लोकांतही दृष्टीस पडली होती. कांहीं गोष्ट विचारली असतां ती माहीत नाहीं असा जबाब देतांना बहुतकरून खांदे वर करितात.

## तुर्क लोकांच्या स्त्रिया.

ह्या आगबोटीवर तुर्क लोकांच्या दहापांच स्त्रिया होत्या. त्यांपैकीं ज्या फार श्रीमंत होत्या त्या बहुतकरून खोलीच्या बाहेर पडत नसत व पडल्या तरी अंगावरून बुरखे घेऊन जेथें परकी लोक नसतील अशा ठिकाणीं बसत; परंतु त्यांच्यासाठीं निराळी जागा नव्हती. यावरून मध्यम प्रतीच्या लोकांत पडद्याची अटक अगदीं अनुल्लंघ्य नाहीं असें दिसलें.

## कान्स्टांटिनोपलचें बंदर.

ह्याप्रमाणें या आगबोटींत पांच दिवस घालवून सहावे दिवशीं—ह्मणजे तारीख १८ एप्रिल रोजीं—प्रातःकालीं कान्स्टांटिनोपल बंदरांत आह्मी दाखल झालों. सुमारें पहांटेस चार वाजतां जागा झालों तों आगबोट हळू हळू चालावयास लागली. त्यावरून बंदर जवळ आलें असा तर्क झाला. आग-

बोटीवरून उतरण्याची उत्कंठा फार झाल्यामुळें फिरून निद्रा लागेना म्हणून प्रातर्विधि उरकण्याच्या उद्योगास लागलों, व झुंजूमुंजू झालें नाहीं तोंच कपडे वगैरे घालून वरच्या मजल्यावर गेलों. हवा कुंद असून मधून मधून पावसाचे थेंबही पडत होते. अंगाला झोंबण्यासारखा गार वारा सुटला होता, व शरीर जरी नखशिखांत वस्त्रावृत होतें तथापि शैत्याची बाधा फार होऊं लागली व हात आणि पाय गारठून गेले.

जसजसा दिवस उगवत चालला तसतसा पार्श्वप्रदेश दृष्टिगोचर होऊं लागला व नयनास त्याच्या परम सौंदर्याचा प्रत्यय येऊन चित्तास भ्रम झाला. कांहीं कालपर्यंत मी कोठें आहें व काय अवलोकन करीत आहें याचें भान राहिलें नाहीं. जिकडे पहावें तिकडे चमत्कृतिजनक व विस्मयोत्पादक अशीं नगररचना दृष्टीस पडत होती. असें सांगतात कीं अशा प्रकारचा नयनास कृतार्थ करणारा मनोहर देखावा पृथ्वीवर दुसऱ्या स्थलीं नाहीं. या सर्व रमणीयतेस कारण त्या नगरीचे प्रतिष्टास्थान आहे. खुद्द इस्तंबोल व बाजूचीं उपनगरें हीं लहान लहान टेंकड्यांवर व टेंकड्यांच्या बाजूनें वसलेलीं आहेत, त्यामुळें दुरून सर्व भवनें एकावर एक ठेवल्यासारखीं अशीं एक समयावच्छेदेंकरून दृष्टीस पडतात व त्यामुळें प्रेक्षकास फार चमत्कार वाटतो. त्यांतूनही भवनराजीच्या रचनावैचित्र्यामुळें जास्त आनंद वाटतो. कांहीं प्रासाद आपल्या भव्यतेनें नेत्र आकर्षीत आहेत. कांहीं यावन देवतायतनें आपल्या उच्च शिखरांच्या योगानें जणूं काय वर डोकीं करून आपल्याकडेच अवलोकन करण्यास प्रेक्षकांस खुणावीत आहेत. कांहीं अग्निप्रलय सूचनार्थ रचलेले असे मनोरे आपल्या उच्चत्वानें आसमन्ताद्भागाच्या इतर विशाल

रचनांस लघुत्व आणून, आपल्या मोठेपणाच्या दिमाखांतच जसे कांहीं शांत व निश्चल असे उभे आहेत.

डाव्या बाजूस सुमारें चार मैल लांबीची प्राचीन तटभित्ति दृष्टीस पडते, व तिजवर एकाशीं एक अस्ताव्यस्त मिसळलेलीं अशीं इस्तंबोल शहरांतील नानाप्रकारचीं भवनाशिखरें दिसतात. उजव्या बाजूस स्कुटारी शहर असून त्यांतील शुभ्र रंगाचे प्रासाद, श्मशानभूमिका, व नजर पोहोंचेपर्यंत एकसारख्या लागून गेलेल्या सायप्रेस वृक्षांच्या वाटिका, ह्या पाहून आल्हाद होतो. समोरच बास्फोरसची सामुद्रधुनी असून तिच्या अद्वितीय सौन्दर्याची दूर अन्तरामुळें अस्फुट प्रतीति येत आहे. अशा स्थितींत आगबोट हळू हळू चालून, इस्तंबोलचा पूर्व भाग डाव्या बाजूस टाकून ईशान्य दिशेस जी नदी समुद्रास मिळाली आहे तिच्या मुखस्थानीं नांगर टाकिते. ह्या मुखाच्या दोन्ही बाजूंस शहरचे निरनिराळे भाग वसले असल्यामुळें त्यास अप्रतिम सौन्दर्य आलें आहे व त्याची आकृति शृंगासारखी असल्यामुळें त्यास "कनकशृंग" (गोल्डनहॉर्न) हें नांव पडलें आहे. आगबोटीच्या आजूबाजूनें लढाऊ व व्यापाराच्या आगबोटी व दुसऱ्या लहान लहान नौका यांची गर्दी होती.

## कान्स्टांटिनोपल शहर.

कान्स्टांटिनोपल या संज्ञेंत तीन शहरांचा समावेश होतोः— (१) इस्तंबोल, (२) ग्यालेटा, पेरा, व तोफेन मिळून एक, व (३) स्कुटारी. इस्तंबोल हें प्राचीन इतिहासप्रसिद्ध जें बायझान्शियम् याच्या जागीं वसलेलें आहे. याची स्थापना

इसवी शकाच्या ३३० वे वर्षी कान्स्टन्टाइन धी ग्रेट यानें केली. त्यानंतर भिन्न भिन्न लोकांनीं निरनिराळ्या प्रसंगीं त्यावर स्वाऱ्या केल्या. या शहरास एकंदर चोवीस वेळ वेढा पडला होता, व तें सात वेळ शत्रूच्या हस्तगत झालें होतें. हें शहर त्रिकोणाकृति वसलेलें असून त्याचें क्षेत्रफळ सुमारें १४ मैल आहे. या ठिकाणीं मुख्य वस्ती मुसलमान लोकांची आहे. प्राचीन अन्तःपुर, मोठमोठ्या मशिदी, सार्वजनिक कार्यगृहें, व सर्व प्रकारचे बाजार, हीं सर्व इस्तंबोल शहरांत आहेत.

इस्तंबोलच्या उत्तरेस कनकशृंग, व त्याच्या उत्तरेस ग्यालेटा, पेरा व तोफेन मिळून झालेलें शहर आहे. या दोन शहरांस जोडणारे असे दोन नौकासेतु आहेत. ग्यालेटा हें युरोपियन व्यापाऱ्यांचें मुख्यस्थान आहे. हें बंदराला लागूनच एका उंच टेंकडीच्या पायथ्याशीं वसलें आहे. यामध्यें कनकशृंगाशीं समान्तर असा एकच लांबच्या लांब गेलेला रस्ता मोठा असून, त्यास मिळालेल्या अशा लहान लहान गलिच्छ गल्लया अनेक आहेत. ग्यालेटाला लागूनच बास्फोरसच्या किनाऱ्यापर्यंत गेलेला जो भाग आहे, त्यास तोफेन ह्मणतात. येथें असलेल्या तोफांच्या कारखान्यामुळें ह्या भागास हें नांव पडलें आहे. ह्याच्याच पलीकडे हल्लीं उपयोगांत असलेले सुलतानाचे भव्य व सुशोभित असे महाल आहेत. ग्यालेटा व तोफेन यांच्या वरच्या बाजूस टेंकडीच्या माथ्यावर वसलेला जो भाग आहे, त्यास पेरा ह्मणतात. या शहरांत जागोजागीं नाना राष्ट्रांच्या प्रतिनिधींचीं उज्ज्वल अशीं भवनें आहेत. त्यांच्या योगानें त्या प्रदेशास विशेष सौन्दर्य आलें

आहे. त्याशिवाय ठिकठिकाणीं बागबगीचे असून तेही प्रेक्ष-
कांस आल्हाद देण्यास साहाय्यभूत होतात. युरोपियन लोकां-
च्या सोईचे सर्व पथिकाश्रम याच भागांत आहेत. वर सांगि-
तल्यापैकीं तिसरें शहर स्कुटारी. हें आशिया खंडांत असून त्यां-
त मुख्यत्वें मुसलमान लोकांची वस्ती आहे.

आगबोट उभी राहिल्याबरोबर बाजूनें लहान लहान होड्यां-
ची गर्दी झाली. प्रत्येक होडीच्या सुकाणावर एक लहान पता-
क असून तिजवर निरनिराळ्या पथिकाश्रमांचीं नांवें होतीं.
शिवाय कुक कंपनीचीही एक होडी होती. होड्या आगबोटी-
सरशा आल्याबरोबर त्यांतील सर्व मंडळी आगबोटीवर चढली,
व उतारू लोकांस स्वस्थानीं निमंत्रण करण्यांत गुंग झाली.
आह्मी एका आश्रमाच्या व्यवस्थापकास येण्यापूर्वींच तार के-
ली होती, व कुक कंपनीचाही आमच्याशीं संबंध होता, तेव्हां
ह्या दोन्ही गुमास्त्यांस आमचें सामान काय काय होतें तें दा-
खवून आह्मी प्रस्थानाची तयारी करूं लागलों. त्यांनीं आमचें
सर्व सामान वर काढून खालीं होडींत उतरविलें. आह्मांस चि-
ळकुल त्रास पडूं दिला नाहीं. होडींत उतरलों तों बारीक पाऊस
पडूं लागला. धक्क्यावर उतरण्याच्या अगोदर सर्व सामान त-
पासविण्यासाठीं आह्मांस कस्टमच्या चौकींत जावें लागलें. सर्व
प्रवासभर हा कस्टमचा मोठा त्रास असतो. ह्या लोकांची चां-
गली समजूत न केली तर ते सर्व पेट्या व गांठोडीं उघडून वि-
नाकारण बरेच छळतात. आमच्या बरोबर माहितगार मंडळी
होती, त्यांनीं सर्व यथास्थित बंदोबस्त केल्यामुळें आह्मांस
बिलकुल तसदी पडली नाहीं. नांवाला मात्र पेट्यांत काय
काय जिन्नस आहेत यांची वरवर चौकशी करून सर्व डागां-

वर परीक्षणाचें चिन्ह करून आह्मांस जाऊं दिलें. याशिवाय आमच्या जवळ मुंबईच्या गव्हर्नर साहेबांच्या सहीचें प्रत्येकाच्या नांवाचें एक एक अनुज्ञापत्रक ( पासपोर्ट ) होतें तेंही दाखवावें लागलें. धक्कयावर उतरलों तों बाजूनें गलिच्छ अशा मोठमोठ्या वखारी होत्या. हेलकऱ्याच्या डोक्यावर सामान देऊन कांहीं अन्तरावर गेलों तरी गाड्याघोडीं वगैरे कोठेंच दिसेनात. शोधाअन्तीं असें समजलें कीं, जरूर असल्यास गाड्या मिळण्यासारख्या आहेत; परंतु ज्या आश्रमांत आह्मांला जावयाचें तो पायरस्त्यानें नजीक असल्याकारणानें पायीं जाणें विशेष सोईचें होईल असें समजल्यावर आह्मी पायीं जाण्याचा बेत केला. परंतु स्वस्थानीं पोहोंचेपर्यंत बरीच खोड जिरली. रस्ता फरसबंदी असून एकसारखी चढण होती. जागजागीं खाचखळगे असून कचरा व मैल बराच पडला होता. गल्लीच्या दोन्ही बाजूंनीं उंच उंच इमारती असून त्या इमारतींसंबंधीं सर्व कचरा ह्या ठिकाणीं पडलेला असे. वाटेनें एकदां एक मोठा रस्ता वलांडून गेलों. त्यावर ट्रामवेच्या गाड्या दृष्टीस पडल्या व कसायांचीं दुर्गंधयुक्त दुकानें आढळलीं. याप्रमाणें सुमारें पंधरावीस मिनिटें वाट चालल्यावर आह्मी आश्रमासंनिध येऊन पोहोंचलों. आकाश अभ्राच्छन्न असल्याकारणानें सूर्यकिरणांची बाधा तर झाली नाहींच, परंतु अल्पवृष्टीचे तुपार पडत असल्याकारणानें आरोहणश्रमाचा भास झाला नाहीं.

आश्रमांत गेल्यावर सर्व सामान जेथल्या तेथें लाविलें, व प्रातरुपहाराची तयारी करावयास सांगून आह्मीं थोडी विश्रांति घेण्यासाठीं खिडकीसमोर हवा खात बसलों. चालण्याच्या

श्रमानें अंगांत उष्णता उत्पन्न झाली होती, त्यामुळें वातायन मार्गानें येणारा शिशिरवायु सुखावह वाटला. परंतु अंगांतली उष्णता नाहींशी झाल्यावर थंडी वाजूं लागली. इतक्यामध्यें पाऊसही जोरानें पडूं लागला यामुळें हवेंत गारठा जास्त आला. तेव्हां खिडक्या लावून घेऊन हातपाय जोडून बसावें लागलें. आजूबाजूचीं जीं घरें दिसत होतीं त्यांपैकीं कांहींवर धुराडीं दिसत होतीं. तेव्हां आमच्याच आश्रमांत अभिज्वलनाची सोय कां नसावी याचें आह्मांस आश्चर्य वाटलें. इतक्यांत एका परिचारकानें येऊन असें कळविलें कीं,' तत्संबंधी सर्व सोय आहे, परंतु व्यवस्थापकास जरूर न वाटल्यामुळें ती केली नव्हती. नंतर आमच्या सांगण्यावरून त्यानें सर्व आवश्यक उपकरणें आणून त्यांची जुळवाजुळव सुरू केली. जमिनीसरशी एक रुंद लोखंडाची शेगडी होती. तिची एक बाजू उघडी असून बाकीच्या सर्व बाजूंनीं लोखंडी पत्रा होता. त्याच्या वरच्या बाजूस एक वाटोळें भोंक होतें, त्यांत एक वाटोळ्या तोंडाचा लोखंडी नळ लावला होता. तो नळ त्याच्याच बेताचें खोलीच्या छतांत एक भोंक होतें त्यांत अडकविल्याबरोबर शेगडी तयार झाली. जवळ दहावीस काष्टखण्ड आणून टाकिले होते. शेगडींत पेटवण घालून वर चारपांच लांकडें टाकिलीं, तेव्हां प्रचण्ड अग्नि सिद्ध होऊन खोलींतील वातावरणांत उष्णता आली. शेगडींत लांकडें सारण्याकरितां व नीट करण्याकरित लोखंडी सळ्या ठेविल्या होत्या. शिवाय अशी कांहीं कळ होन कीं, तिच्या योगानें वाटेल तेव्हां शेगडीच्या तोंडाशीं लहान लहा न लोखंडी पट्ट्यांचें आवरण होई, त्यामुळें आंत वारा कोंडून विस्त. व मोठ्या जोरानें पेटे. शेगडीचा शेक घेतल्यानंतर आम्हीं थोडा

फराळ करून घरोघर पत्रें लिहिलीं. आह्मास मुंबई सोडून सारे अठराच दिवस झाले होते, तथापि प्रवास बऱ्याच अंतरावर झाल्या कारणानें पुष्कळ दिवस झाल्यासारखें वाटे. शिवाय मुंबईकडील डाक आह्मीं निघाल्यापासून आह्मास पोहोंचली नव्हती, त्यामुळें उत्कंठा विशेष वाटे. परदेशांत असतांना आपल्या प्रियजनांस पत्रें लिहिणें, व त्यांच्याकडून आलेलीं वाचणें, यासारखें उत्कंठाविनोदक दुसरें कांहीं नाहीं. चिट्ठी, पत्र वगैरे लिहावयाचें तें लिहून मग स्वेच्छ स्नान करावें असें वाटलें. केरोहून निघाल्यापासून मनाप्रमाणें स्नान करण्यास सांपडलें नव्हतें, ह्मणून स्नानाविषयीं विशेष उत्सुकता होती. परंतु जेव्हां असें समजलें कीं, आश्रमांत धारायंत्राची तर योजना नाहींच, परंतु स्वतंत्र स्नान करण्यास स्थलाचीही योजना नाहीं, व करणें असल्यास ज्यानें त्यानें आपल्या खोलीतच पिपांत पाणी घालून त्यांत कावळ्यासारखें डुंबूनच निर्वाह केला पाहिजे, तेव्हां फारच वैताग आला. परंतु इलाज काय ? कान्स्टांटिनोपल शहराची हम्मामा ( टर्किशबाथ्स् ) विषयीं प्रसिद्धि ऐकिली होती ; परंतु त्यासमयीं त्यांचा शोध करून तेथें जाण्यासारखी चित्ताची स्थिति नव्हती, ह्मणून जेवढें कांहीं प्राप्य होतें तेवढ्यांतच वेळ मारून नेण्याचा निश्चय केला. स्नानविधि जरी मनाप्रमाणें झाला नाहीं तथापि त्यायोगानें जिवाला हुपारी तर वाटलीच.

## ब्रिटिशसरकारच्या प्रतिनिधीचा हस्तस्पर्श.

स्नान केल्यावर कांहीं वेळ रिकाम्या गप्पांतच घालविला. कारण कीं बाहेर फिरावयास जातां येईना. आमचे महाराज

ब्रिटिशसरकारच्या प्रतिनिधीच्या भेटीस गेले होते ते परत आल्यावर लागलीच प्रतिनिधि परत भेटीकरितां आमच्याकडे यावयाचे होते. त्या तयारींत कांहीं वेळ गेला. मी आपली रेशमी पुण्याची पगडी, मुंबईच्या रिवाजाचा आंगरखा व रेशीमकांठी उपरणें काढून साहेबांस सलाम करण्यास सिद्ध झालों. माझा तो विचित्र पोषाख पाहून आश्रमांतील परिचारकगण एकमेकांकडे टकमक पाहूं लागले, व महाराजादि मंडळीचे भूषणवेष्टित कंण्ठ व पाद पाहून तर थक्क होऊन गेले. साहेब मजकूर येऊन निर्दिष्टस्थानीं विराजमान झाल्यावर ‘ परिचयकरण ’ विधीस सुरुवात झाली. नांवें वगैरे सांगितल्यावर हस्तस्पर्श होऊन मंडळी खालीं बसली. हस्तस्पर्शासंबंधानें येवढें सांगणें अवश्य वाटतें कीं, हिंदुस्थानदेशांत साहेब लोकांचें ह्यासंबंधानें जें साशंक वर्तन असतें त्याचा मासला ह्या प्रसंगीं नजरेस आला नाहीं, व केवळ एवढ्या गोष्टीवरूनच आशियाखंड सोडून आह्मीं युरोपखंडांत आलों याचा आह्मांस प्रत्यय आला. नाहीं तर मी कोण–हिंदुस्थानांतील संस्थानिकाचा यःकश्चित् कारकून, तेव्हां मला हा सार्वभौम बादशाहिणीच्या प्रतिनिधीच्या हस्तस्पर्शाचा योग येईल असें स्वप्नीं देखील नव्हतें. असो; योग तर साधलाच; व माझ्या सारख्याला जर ‘ दहा आठवडे ’ लिहावयाचे असतें, तर मी खचित या गोष्टीचें करवेल तितकें गौरव करून घेतलें असतें. साहेब मजकुरास संस्कृत वगैरे प्राच्य विषयांची अभिरुचि होती. ह्मणून त्यांस जेव्हां समजलें कीं मी जातीचा ब्राह्मण असून मला संस्कृताचें थोडेंबहुत ज्ञान आहे, तेव्हां तर त्यांनीं मला पंडितच बनविलें व असें दुःख प्रदर्शित केलें

कीं माझ्यासारख्या विद्वानाला विद्वत्तेनुरूप अशी करमणूक कान्स्टांटिनोपल शहरांत बिलकुल नाहीं. हें ऐकून तर मला फारच चुटपुट लागली. असें वाटलें कीं जर माझ्यांत एकाचे दोन करून दाखविण्याची खुबी असती तर पंडितगिरीचा आव घालून एखादें व्याख्यान झोडून माझें मोठेंच प्रस्थ माजवितां आलें असतें. परंतु सुदैवानें ह्मणा अगर दुर्दैवानें म्हणा, तसलें माझ्या अंगांत पाणी नव्हतें म्हणून मजल तेथपर्यंतच थांबली. असो;—नंतर ठरीव व्यावहारिक गोष्टींविषयीं थोडें संभाषण होऊन समारंभ समाप्त झाला.

## पेरा शहर.

इतकें आटपेतोंपर्यंत दिवस तीन प्रहर होऊन गेला होता. सकाळपासून घराच्या बाहेर न पडल्या कारणानें अगदीं कंटाळा येऊन गेला होता व थोडेंसे पाय मोकळे करावे असें वाटलें. परंतु पाऊस पडून रस्ते फारच खराब झाले होते व झिम् झिम् पाऊसही पडत होता, यामुळें बाहेर पडण्याचा उत्साह कमी झाला. तथापि बाहेर न पडलें तर शरीरास स्वस्थता वाटणार नाहीं, असा मनाचा पक्का ग्रह झाल्याकारणानें तसाच निघालों व पेरा शहरांतील राजवीथिकेमधून चाललों. ही रथ्या फार रुंद नसून तिच्या दोनही बाजूंनीं उच्च व सुंदर अशीं एकाला एक लागलेलीं घरें होतीं. पार्श्वपथ फारच लहान असल्या कारणानें सर्व पादचारी लोकांची सोय होत नव्हती व कांहीं लोकांस रथमार्गावर आक्रमण करण्याची पाळी येई, व दोनही बाजूंनीं येणाऱ्या रथांची गर्दी झाली ह्मणजे पादचारिजनांची फारच धांदल उडे. या रथ्ये-

ची रचनाही व्यवस्थित नव्हती. रुंदी एकसारखी नसून घरेंही समांतर नव्हतीं.

रस्त्यांत जीं माणसें दृष्टीस पडलीं त्यांत कांहींचा वेष युरोपियन लोकांसारखा व कांहींच्या शिरोभागीं रक्तवर्ण तुर्की टोपी होती. वाटेनें स्त्रियाही पुष्कळ दृष्टीस पडल्या. वर सांगितलेंच आहे कीं पेरा हें मुख्यांशीं युरोपियन लोकांचें निवासस्थान आहे. येथें इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, आर्मिनियन व ग्रीक ह्या लोकांची वस्ती आहे. त्यांच्या बायकांचे पोषाक सर्व एकसारखेच असतात. सर्व स्त्रियांचा वर्ण गौर आहे; तथापि सर्वांमध्यें आर्मिनियन स्त्रियांचें सौन्दर्य कांहीं विलक्षण आहे. त्यांचे ते कृष्णवर्ण केशकलाप, त्यांचीं सरळ व रेखीव नासिकें, त्यांच्या धनुष्याकार भ्रूलता, त्यांचे प्रफुल्लारविंदासारखे नेत्र व "उन्मादतरल" असे कटाक्ष, त्यांच्या गौरवर्णांत मोठ्या बहारीचा रक्तिमा —या सर्व सामुग्रीशीं यौवनाच्या टवटवीचा योग—मग काय विचारतां ! प्रेक्षक जनांच्या नयनांची कृतार्थताच व्हावयाची, व त्यांतूनही त्यांच्या दर्शनाला अनभ्यस्त अशा माझ्यासारख्या वैदेशिकाची तर फारच. ह्या दिवशीं पाऊस पडत असल्या कारणानें गर्दी फार नव्हती. परंतु यानंतर व जेव्हां हिंदुस्थानांतील कोणी राजा आल्याची बातमी सर्वत्र पसरली तेव्हां, आह्मी रस्त्यानें चाललों ह्मणजे सर्व रथ्या केवळ " कुवलयितवातायन " होऊन आमच्यावर सुंदरीनेत्रकटाक्षांचा वर्षावच होई. कोणी वृद्ध मातापितरांबरोबर कांहीं व्यवसायानिमित्त बाहेर पडल्या आहेत; कोणी समवयस्क सख्यांबरोबर बाजारांत कांहीं वस्तु विकत घेण्याच्या मिषानें विवाहवयस्क अशा तरुण जनांच्या दृक्पातास विप-

यांभूत होत आहेत; कोणी आपल्या पतीसह केवळ करमणुकीसाठीं व कोणी आपल्या मुलांच्या करमणुकीसाठीं दुकानें पहात परिक्रमण करीत आहेत; एकंदरीनें सर्व देखावा मोठा मौजेचा भासला. परंतु एका गोष्टीचा मोठा चमत्कार वाटला कीं पुष्कळ स्त्रियांच्या औंठावर बारीक मिशांची झुलूक दिसे. घरें व दुकानें केरो शहरांतल्या सारखींच दिसलीं. घरांवरील कवलें आपल्या इकडील नळयाच्या कवलांसारखींच होतीं. मधून मधून ज्या गल्लया दिसल्या त्या गलिच्छ व उतरत्या होत्या व सकाळीं बंदरावरून येतांना आह्मांस ज्या लागल्या होत्या त्याच मासल्याच्या असाव्या अशा वाटल्या.

## लांकडी घरें, आगीच्या उपशमनार्थ विशेष तजविजी.

पूर्वकालीं कान्स्टान्टिनोपल शहरांतील सर्व घरें काष्ठमय असत, घराच्या भिंती देखील लांकडाच्या फळ्यांच्या असावयाच्या. यामुळें आग लागण्याची व एकदां लागली ह्मणजे पसरण्याची फारच भीति असे व त्यासाठीं विशेष प्रकारच्या तजविजी केलेल्या आढळतात. तशा प्रकारचीं घरें दिवसानुदिवस कमी होत चाललीं आहेत. तथापि अजून मधून मधून नजरेस पडतात. पेरा शहरांत आतां कमी आहेत, परंतु इस्तंबोलांत पुष्कळ आहेत. आग लागली म्हणजे तावडतोच चहूंकडे सूचना देण्यासाठीं दिवसरात्र पहारेकरी ठेविलेले आहेत. ग्यालेटामध्यें जिनोईज लोकांनीं बांधलेला एक उंच मनोरा आहे त्यावर, तसेंच इस्तंबोलमध्यें सिरास्किअर नां-

यांचा मनोरा आहे त्यावर व बास्पीरसच्या पलीकडे आंशिया-च्या किनाऱ्यावर कान्दिलिजवळ एक टेंकडी आहे तिजवर—हे पहारेकरी नेहेमीं असतात. कोठेंही आग लागली ह्मणजे वर शेवटीं सांगितलेल्या टेंकडीवरून तोफा सो-डतात व तोफांच्या संख्येवरून ज्या शहरच्या भागांत आग लागली असेल त्याचा निर्देश होतो, त्याचप्रमाणें एका रक्त-वर्णविमानांत दीप प्रज्वलित करून तें विमान एका जहाजा-च्या डोलकाठीच्या टोंकाला अडकवितात. तसेंच वर सांगित-लेल्या दोन मनोऱ्यांवर ध्वज उभारतात, व त्या ध्वजां-च्या रंगावरून अग्निप्रलयाच्या स्थानाचा निर्देश होतो. या दोन ठिकाणीं आग विझविणारे लोक नेहमीं तयार अस-तात. ते अमुक ठिकाणीं आग लागली आहे असें कळतांच दुसऱ्या मंडळीस वर्दी देऊन आवश्यक यंत्रें वगैरे घेऊन प्र-लयस्थानीं जातात व ज्यास जरूर असेल ते त्यांस भा-ड्यानें कामास लावितात. अग्निप्रलयापासून फारच अनर्थ होतात. कधीं कधीं थोड्या घटकांच्या अवकाशांत पन्नास ह-जार घरें जळून गेल्याचीं उदाहरणें आहेत.

## भुयारांतली गाडी.

ज्या मोठ्या रस्त्यानें आह्मीं चाललों होतों त्या रस्त्यावर ट्रामवे होती. ती एक मजल्याची होती व तिला घोडे जोडलेले होते. असें पहात पहात त्या रस्त्याच्या टोंकापर्यंत गेलों. तेव्हां वस्ती पातळ झाली, व कांहीं बराखी व एक बगीच्या लागला. तेथूनच आह्मी परत फिरलों व ट्रामवेंत बसून परत आल्या रस्त्यानें चाललों. गाडींत तीन चार टवाळ तरुण होते. ते मद्य-

पानानें जरा तरें झाल्यासारखें दिसत होते. त्यांनीं माझ्या डो-
कीच्या जरीकांठी रुमालावरून मी परकी आहें असें
जाणून माझी थट्टा करण्याचा उपक्रम केला. त्यांची भाषा
मला समजत नव्हती ; परंतु त्यांच्या बोलण्याच्या तऱ्हे-
वरून मला असें वाटलें. माझ्याबरोबर एक माहितगार गृह-
स्थ होताच, ह्मणून फारशी काळजी वाटली नाहीं. ट्रामवेंत
कांहींवेळ बसल्यावर पुढें बरीच उतरण लागली तेव्हां घोडे सो-
डून तशीच कांहीं अंतरावर नेली. समोरून येणाऱ्या गाडीला
चढणीसाठीं चार घोडे लाविले होते. या ठिकाणीं आह्मी उत-
रलों व पेरामधून ग्यालेटांत उतरण्यासाठीं एक डोंगर पोखरून
केलेला असा लोहमार्ग आहे तो पहाण्यास गेलों. रस्ता
सुमार दोन मैल लांबीचा असून गाडींतून जाण्यास सुमारें
दहा मिनिटें लागतात. गाड्या दर दहा मिनिटांनीं
जात येत असतात. गाडीला जोडलेलें वाफेचें यंत्र मु-
ळींच नसतें. गाडीबरोबर एक गार्ड मात्र असतो. आह्मी गाडींत
बसून गेलों व परतही आलों. गाडींत बसलों असतां जसें पु-
ण्याच्या वाटेनें बोरघाटांत वाटतें तसें वाटलें. गाड्यांची अशी
व्यवस्था असते कीं जाणाऱ्या व येणाऱ्या गाड्या एकाच
काळीं सुरू असतात. यांस चालकशक्ति काय असावी याची
आह्मांस अटकळ होईना. जेव्हां आह्मीं चौकशी केली तेव्हां
असें कळून आलें कीं स्टेशनाजवळ एक मोठा कारखाना
आहे तेथें वाफ उत्पन्न करितात. लोहमार्गाच्या मध्यभागीं ए-
क कंगोरा केला आहे व त्यामध्यें पुढेंमागें हलण्यासारखी
अशी एक लोहतंतूंची बनलेली चापट दोरी आहे. ह्या चापट
दोरीशीं गाडीच्या डब्याचा संबंध असतो. वाफेच्या जोरानें

दोरी ओढली गेली कीं खालच्या बाजूची गाडी वर येते व त्याच जोरानें वरची खालीं जाते. वाटेंत उभी करण्याचा कधींच प्रसंग येत नसेल ; परंतु जर कधीं आला तर मात्र सर्व गोंधळ होण्याचा संभव आहे. कदाचित् डब्याचा लोहरज्जूशीं संबंध तोडण्याची कांहीं युक्ति असेल व तसें असलें ह्मणजे वाटेल तेव्हां गाडी चालू व बंद करितां येईल. ही गम्मत पाहून आह्मी घरीं परत आलों व नियमाप्रमाणें भोजनादि विधि आटपून परिश्रांत अवयवांस विश्रांति देण्याकरितां आह्मी आपआपल्या खोल्यांत जाऊन निजलों.

## इस्तंबोलचा रस्ता.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं इस्तंबोल शहर पहाण्यास गेलों. रस्ता बराच उतरणीचा होता; व पाऊस पडल्या कारणानें फरसबंदीवर चिखलही झाला होता; व असें असतांही गाड्यांचे घोडे बरेच वेगानें उतरत होते याचें आह्मांस आश्चर्य वाटलें. आपल्या इकडल्यासारख्या गाड्या व घोडीं यांचा एक दिवसही तेथें निभाव लागला नसता. तेथील भाड्याच्या गाड्यांचे घोडे फारच मजबूत व सुंदर दिसतात; व त्यांच्या पायांच्या खुराला लावलेले जे नाल असत त्यांचीं टोकें आंत वळविलेलीं असल्या कारणानें उतरतांना व चढतांना पाय सरण्याची भीति कमी असते. उतरण संपल्यावर पुढें मोठा बाजार लागला. त्यांत लोकांची फार गर्दी असून, तऱ्हेतऱ्हेच्या जिनसा विकणारांचे स्वर ऐकूं येत होते. वर्तमानपत्रें विकणारांची तर धांदलच उडत होती. रस्त्यांतील गर्दीमुळें कोणाची गाडी उभी राहिली कीं जवळ मंडळी जमे, व कंठाच्या आभ्यन्तरस्थाना-

पासून उच्चारलेल्या ' क 'कार व ' ख 'कारप्रचुर अशा शब्दां-नीं ते आपल्या जवळील जिनसा घेण्याचा आग्रह करीत.

तेथून कांहीं अंतरावर आह्मांस एक पूल लागला. हा पूल होड्यांशीं होड्या जोडून केलेला होता. जोडाच्या ठिकाणीं मोठमोठ्या परंतु फारच ओबडधोबड रीतीनें बसविलेल्या लोखंडाच्या पट्ट्या होत्या. पूल बराच सखल दिसतो, व त्याखालून साधारण मोठें जहाज किंवा लहान आगबोट जाऊं शकेल किंवा नाहीं याची शंकाच वाटते. जेव्हां मोठीं लढाऊ किंवा व्यापाराचीं जहाजें जावयाचीं असतात तेव्हां हा पूल मोडून वाट द्यावी लागते. अशाच प्रकारचा एक पूल मी कलकत्त्यास पाहिला होता; परंतु तो फार उंच असून सफाईदार दिसे. प्रस्तुतचा पूल सुमारें चार गाड्या जाण्याइतका रुंद असून त्याच्या बाजूनें लहान लहान खोल्या काढलेल्या होत्या. त्यांमध्यें सर्व प्रकारची खाद्य व पेय या वर्गांतील ऐषआरामाची सामुग्री असून बसण्याकरितां खुर्च्या, कोचें वगैरे मांडलेलीं होतीं. यांच्याच बाजूनें नदीवर जाण्यास मार्ग होता. या पुलावरील देखावा फारच मनोहर होता. दोन्ही बाजूनें ' कनकशृंगाचें ' पात्र दृग्गोचर असून त्यावर असंख्य नौका अधिष्ठित होत्या. कांहीं विलायती तऱ्हेच्या साध्या; कांहीं तुर्की रिवाजाच्या रंगवैचित्र्यशोभित; कांहींवर लहान लहान पताका फडकत आहेत; कांहीं उतारू घेऊन मार्ग क्रमीत आहेत; कांहीं तीरसंमुख होऊन आगन्तुक जनांस आव्हान करीत आहेत; कांहीं अग्निप्रेरित नौका नियमित वेळीं कोणाची वाट न पाहतां मोठ्या झपाट्यानें चालल्या आहेत; व शिडानें व वल्ह्यानें चाललेल्या नौ-

कांस मागें टाकून जणूं काय प्राच्य कलांवर पाश्चात्य कलांच्या वर्चस्वाची सद्यःप्रतीतीच देत आहेत. पुलावरून जाणाऱ्या येणाऱ्या मंडळींचें वेषवैचित्र्य तर बरेंच संभ्रामक होतें. कोणीं तुर्की टोपी घातलेली आहे; कोणी काळा पटका घातला आहे; कोणीं पांढरा पटका घातला आहे; कोणीं पटक्यावर झालरीसारखें रेशमी कापड सोडलेलें आहे; कोणीं युरोपियन तऱ्हेचा पोषाक चढविलेला आहे; कांहीं स्त्रिया आपलें नखशिखांत शरीर वस्त्रानें झांकून गाड्यांतून चालल्या आहेत; कांहीं पायानेंच चालल्या आहेत; कांहीं स्त्रियांच्या डोक्यावर टोप्या असून त्यांवर बारीक सफेत कपड्याचें वेष्टन आहे, व कांहींनीं तोंडावरून पदर घेतला आहे, परंतु कपाळ, नेत्र व नासिका दृग्गोचर असल्याकारणानें त्यांचें लावण्य अनुमित होत आहे. पुलावरून जातांना प्रत्येक सांध्यावर गाडीला बरेच हिसके बसत. दोन ठिकाणीं कर घेण्याचीं नाकीं आहेत, तेथें आमची गाडी उभी राहिली होती. परंतु कर घेऊन पावती देण्याचें काम फारच झटपट झालें व आमचा खोळंबा झाला नाहीं.

याप्रमाणें पूल वलांडून आम्ही इस्तंबोल शहरांत शिरलों. रस्ते फार रुंद नसून गलिच्छ होते. दुकानें वगैरे नीटनेटकीं नसून मलिन दिसत होतीं, लोकही स्वच्छ नव्हते. रस्त्याच्या बाजूनें लहान लहान पार्श्वपथ होते व त्यांवर झाडें लाविलेलीं होतीं. परंतु हीं झाडें केवळ उच्चस्तंभाकार असून त्यांच्या मुळापासून वर बऱ्याच अंतरापर्यंत पल्लव वगैरे कांहीं दिसत नव्हतें, व शिखराजवळ मात्र कांहीं शाखा दिसत होत्या. यामुळें वृक्षांच्या योगानें रथ्यांस शोभा न येतां एक प्रकारचा रुक्षपणा व विरूपता मात्र प्राप्त झाली होती.

## व्हालीदीची मशीद–जोड्यांविषयीं विलक्षण समजूत.

कांहीं वेळानें आह्मी सुलतान व्हालीदीच्या मशिदींत गेलों. ज्या रस्त्यानें पूर्वीचे सुलतान घोड्यावर स्वार होऊन मशिदींत जात असत त्याच रस्त्यानें आमच्या मार्गदर्शकानें आम्हांस नेलें. हा मार्ग बराच रुंद व उंच होता. परंतु त्यावर धूळ बरीच पडली होती व दोन्ही बाजूंच्या भिंतींवरून व छतावरून त्यांविषयींची अनास्था अनुमेय होती. आंतल्या दाराशीं गेल्यावर तेथें कांहीं वेळ मुक्काम करावा लागला. कारण कीं आमच्या अपवित्र जोड्यांनिशीं आंत जाण्यास मनाई होती. इतक्यांत एक मुलगा चारपांच स्लिपरचे जोड घेऊन आला, व त्या घालण्याविषयीं मठाधिपतीनें आम्हांस विनंति केली. आह्मी आपल्या पायांतील बूट काढावयास लागलों तेव्हां असें करण्याची जरूर नाहीं असें आम्हास सांगितलें; तेव्हां त्या स्लिपर बुटांवरच चढविल्या. त्यांनीं आमच्या बुटांचा तळसुद्धां झांकला गेला नाहीं. असें करविण्याचा हेतु काय असेल तो असो. जर मशिदींतील उंची गालिचे व रुजामे खराब होतात म्हणून ही योजना असेल तर तो हेतु सिद्धीस जात नाहीं हें उघड आहे. कारण बुटांच्या टोंकांशिवाय कोणताही भाग त्यांनीं आच्छादित होत नाहीं. जर रस्त्यांतील जोडे पवित्र स्थानीं न यावे याविषयीं कटाक्ष असेल तर बूट अजिबात काढून त्यांऐवजीं स्लिपर घातल्या शिवाय तो कार्यभाग होत नाहीं. कोणत्याही दृष्टीनें पाहिलें असतां असें स्पष्ट दिसतें कीं मूळ हेतु बाजूला राहून तन्निमित्त पडलेला आचार मात्र राहिला आहे. असो; त्या स्लिपरच्या योगानें आह्मास चालण्यास मात्र फार अडचण झाली. कारण

कीं त्या वरचेवर सरत व त्या फिरून घालण्यांत वेळ जाई. नंतर आह्मी मशिदींत गेलों. इमारत मोठी होती परंतु सफाई व सौन्दर्य फारसें नव्हतें. खिडक्यांस नाना रंगांच्या काचा लाविलेल्या होत्या व भिंतींवरही रंगीबेरंगी असे लहान लहान दगडांचे व कांचेचे तुकडे चिकटविलेले होते. अशा कामास इंग्रेजींत "मोझेइक" ह्मणतात. मशिदींत लोकांची गर्दी नव्हती. कांहीं लोक रमजानानिमित्त लावण्याकरितां दिवे तयार करीत होते.

## रमझानचा सण आणि तंबाखूचें व्यसन.

रमझान ह्या मुसलमानांचा मोठा सण आहे हें वाचकांस ठाऊक असेलच. तेव्हां त्या प्रसंगीं सर्व जगांतील मुसलमानी राष्ट्रांत अग्रभागीं गणलेलें असें जें तुर्की राज्य त्याच्या राजधानींत ह्या सणाची संभावना किती डामडौलानें होत असेल याची कल्पना वाचकांस सहज करतां येईल. आह्मी गेलों तेव्हां रमझानास कांहीं दिवस अवकाश होता तरी तेव्हांपासून थोडे थोडे दिवे तयार करण्याच्या कामांत लोक गर्क होते. ह्या सणासंबंधीं एक मोठी गमतीची नक्कल ऐकिली. ह्या सणांत दिवसा खाण्यापिण्याची मनाई आहे. सूर्य अस्तास गेला म्हणजे तोफ होते. त्यानंतर सर्व व्यवहार सुरू होतात. या प्रांतीं लोकांना तंबाखु ओढण्याचा शोक फार आहे व कडकडीत उपवास करावयाचा ह्मणजे तंबाखु ओढण्याचीही मनाई. तेव्हां ही मंडळी सायंकालचा समय झाला ह्मणजे हुक्का तयार करून चिलीम भरून एका हातांत अग्नि सिद्ध करून तोफेची वाट पहात बसत असतात; व तोफ झाल्याबरोबर ते चिलीम

पेटवून अगोदर दोन झुरके ओढतात. नंतर खाण्यापिण्याचा दुसरा उद्योग. याचें नांव व्यसन !

## प्राचीन अन्तःपुर.

ही मशीद पाहून आह्मी सुलतानांच्या जुन्या महालांत गेलों. सुलतान महंमुदाच्या कारकीर्दीपूर्वी सुमार पंधराशें वर्षें या महालांत बादशाहांची वस्ती होती. तेव्हांपासून विशेष समारंभाच्या प्रसंगींच काय ते सुलतानांचे पाय या महालांस लागतात. या कारणानें या इमारतींचें वैभव सर्व नष्ट झालें असून त्या फार उजाड दिसतात. कांहीं भवनें मोडलेलीं असून प्रांगणभूमिका आपल्या तृणाच्छन्नतेमुळें अनास्था सुचवितात. १८६३ सालीं या महालांच्या कांहीं भागास आग लागून ते जमीनदोस्त झाले. परंतु सुदैवानें ज्या भागांत राज्यांतील मोठे मोठे समारंभ होण्याची चाल होती व आहे तो भाग तसाच कायम राहिला. या भागास "प्राचीन अंतःपुर" ही संज्ञा आहे. मार्मोराच्या समुद्रांतून बास्फोरसच्या सामुद्रधुनींत शिरतांना डाव्या बाजूला जी भूशलाका युरोप व आशिया यांची भेट करून देण्याच्या उद्देशानेंच जणूं लांबवर समुद्रांत गेली आहे, तिजवर उच्चस्थानाधिष्ठित असे हे महाल आहेत. यांची मूल रचना दुसऱ्या महम्मदाच्या कारकीर्दीत झाली, व त्यांस मागाहून कांहीं महाल जोडले गेले. यांचा परिवेष सुमारें तीन मैलांचा आहे. यांच्या सभोंवार भिंत असून समुद्राच्या बाजूला टेंकडीच्या माथ्यापासून पायथ्यापर्यंत एकसारखे बगीचे लागलेले आहेत. त्यामुळें त्यांस रमणीयता विशेष आली आहे. भिंतीच्या कोंपऱ्या कोंपऱ्यांनीं लहान लहान मनोरे आहेत. हे जरी

उत्सन्नावस्थेंत आहेत, तरी एकंदर दृग्विषयाच्या सौंदर्याची हानि न करितां तत्पोषकच होतात. या प्राचीन अन्तःपुरांतील कांहीं विशेष स्थलें पहाण्यास अधिकाऱ्यांकडून आगाऊ परवानगी घ्यावी लागते. आह्मीं यांतील सर्व स्थलें पाहिलीं नाहींत. फक्त प्राचीनवस्तुसंग्रहालय मात्र पाहिलें. या स्थलीं कान्स्टांटिनोपलाच्या आजूबाजूला सांपडलेल्या प्राचीन ग्रीस व रोमन देवतांच्या मूर्ति, शिलालेख, भांडीं व सिरियामधून आणिलेल्या कांहीं वस्तु यांचा संग्रह आहे. याशिवाय जुन्या प्रकारच्या शस्त्रांचाही संग्रह आहे. एके ठिकाणीं कांहीं सोन्याचीं पदकें व दागिने ठेविलेले होते. ते हिंदुस्थानी तऱ्हेशीं बरेच मिळते होते. एके ठिकाणीं एक लहानसा देव्हारा होता व त्यांत जैन लोकांच्या देवासारखी एक नग्न मूर्ति होती.

## " सब्लाईम पोर्टी. "

हें संग्रहालय पाहून महालाच्या मोठ्या दरवाज्यानें आह्मी बाहेर पडलों. हा दरवाजा फार प्रचंड होता. याचा शिरोभाग कमानदार असून त्यावर एक आरबी लेख आहे, व कमानीच्या बाजूनें भिंतींत दोन कोनाडे आहेत. ह्याला जुनी "सब्लाईम पोर्टी" ह्मणतात. बहुतेक वाचकांस अवगत असेलच कीं तुर्की राज्याला "ऑटोमन पोर्टी" हा पर्याय शब्द आहे. याचें कारण असें आहे कीं तुर्की रिवाजाप्रमाणें राजवाड्याचा दरवाजा हेंच न्याय करण्याचें स्थान-दरवाजा ह्मणजे "पोर्ट." त्यावरून सर्व तुर्की राज्याला "धी पोर्टी" असें नांव पडलें आहे. हल्लींचीं कार्यगृहें निराळ्याच ठिकाणीं आहेत त्यास "न्यू सब्लाईम पोर्टी" असें ह्मणतात. या दरवाज्यांतून

बाहेर पडल्यावर आह्मी प्राचीन व नामांकित अशी जी सान्टा-सोफियाची मशीद तिच्याकडे वळलों.

## सान्टा सोफियाची मशीद.

या इमारतीचा इतिहास फार विचित्र आहे. इचा प्रथम पाया कान्स्टान्टाईन बादशहानें इसवी सन ३२५ या वर्षी घातला. पुढें ४०४ सालीं शत्रूंनीं या इमारतीस आग लावून ती जाळून टाकिली. दुसऱ्या थिओडोशियसनें ती फिरून बांधिली. जस्टिनियनच्या कारकीर्दींत तिची फिरून अग्निमुखांत आहुती पडली. तेव्हां जस्टिनियनानें मूळ पायापासून अजिबात नवीन व प्रचंड इमारत उभारिली. इच्या भिंती व कमानी विटांच्याच आहेत. परंतु आंत असलेले खांब तऱ्हेतऱ्हेच्या संगमरवरी दगडांचे व भव्य असे आहेत. कांहीं सफेत असून त्यांवर गुलाबी रंगाच्या रेपा आहेत. कांहीं हिरवे; कांहीं निळे; कांहीं काळे असून त्यांवर शुभ्र रेपा; कांहीं सफेत असून त्यांवर काळ्या रेघा आहेत. यांपैकीं आथेन्स येथील प्राचीन देवालयास लावलेले कांहीं होते. कांहीं इफिसस येथील डाएनाच्या प्रसिद्ध देवालयांतून आणले होते; कांहीं ईजिप्तमधून, कांहीं डेलॉसमधून व कांहीं सिझिकसमधून आणले होते.

या देवालयासंबंधानें कांहीं चमत्कारिक माहिती इतिहासकारांनीं लिहून ठेविली आहे. ती अशीः—या कामावर एकंदर शंभर नामांकित कारागिर होते; व त्या प्रत्येकाच्या हाताखालीं शंभर शंभर गवंडी होते. याप्रमाणें पांच हजार गवंडी इमारतीच्या उजव्या बाजूकडे व पांच हजार डाव्या बाजूकडे

काम करीत. बादशहास स्वप्नामध्यें दृष्टांत होऊन एका देवदूतानें इमारतीच्या रचनेचा नकाशा दाखविला त्या धोरणावर रचना सुरू झाली. तोंच देवदूत पुनः एक वेळ आला व काम लवकर आटपण्याविषयीं सूचना करून परत गेला. वरच्या घुमटापर्यंत इमारत येऊन ठेपल्यावर पैशाच्या तंगीमुळें बंद ठेवण्याचा प्रसंग आला. तेंव्हां वर निर्दिष्ट केलेला देवदूत पुनः आला, व त्यानें खेंचराच्या पाठीवर लादून सोन्याच्या लगडी तिजोरींत पोंचविल्या. हें वर्तमान ऐकून बादशहास फारच आश्चर्य वाटलें. तेव्हांपासून इमारतीची देखरेख दुसऱ्यावर न सोंपवितां बादशहा स्वतः जाडेभरडे कपडे अंगांत घालून कामावर हजर असे, व मजूरदारांस बक्षिसाची आशा लावून काम लवकर आटपण्याचा यत्न करी. देवालयांतील वेदिकेला नाना तऱ्हेचे हिरे, माणिकें वगैरे जवाहिर लाविलेलें होतें. या वेदिकेवर एक लहानसा मंडप असून त्यावर एक लहानसा घुमट होता. याच्या शिरोभागीं सुवर्णमय कमलें असून त्यांच्या मध्यभागीं ७५ पाउंड वजन सोन्याचा एक त्रिशूल ( क्रास ) होता. वेदिकेच्या बाजूनें पुरोहितगणांसाठीं जीं आसनें तयार केलीं होतीं तीं रुप्याच्या मुलाम्याचीं होतीं. दरवाजे कांहीं हस्तिदंती व कांहीं उंची लांकडाचें होते. मुख्य दरवाजा रुप्यानें मढविलेला होता.

या इमारतीच्या सर्व सामुग्रीची जुळवाजुळव करण्यास साडेसात वर्षें व इमारत बांधण्यास साडेआठ वर्षें मिळून एकंदर सोळा वर्षें लागलीं. इमारत तयार झाल्यावर बादशहा मोठ्या थाटानें तेथें जाऊन दरवाज्यापासून व्यासपिठापर्यंत धांवत गेला. व आनंदनिर्भर होऊन मोठ्यानें ह्मणाला “ परमेश्वरा,

तुझा महिमा विचित्र आहे, कीं तूं माझ्या सारख्यांच्या हातून हें काम शेवटास नेलेंस. हे सालोमानराजा, मीं तुझ्यावर तान केली. ”

याप्रमाणें या देवालयाच्या आदिरचनेची हकीकत आहे. रचनेनंतर सुमार ९०० वर्षेपर्यंत या इमारतीचा उद्दिष्ट हेतूप्रमाणें उपयोग झाला. परंतु जेव्हां काल फिरला तेव्हां त्याच खिस्ती देवळाची मशीद बनली. ज्या देवालयाचें प्राचंडय खिस्तीधर्माच्या उन्नतीची साक्ष देत होतें तेंच महंमदी धर्माचें वर्चस्व प्रकट करण्यास सहायभूत हल्लीं होत आहे. कालचक्राच्या झपाट्यानें असा विपर्यय झालेला पाहून खिस्ती युरोपियनांच्या जिवास चुटपुट लागेल यांत नवल काय? माझ्या ऐकण्यांत एका गृहस्थानें मशीद पहात असतां असा उद्गार काढिला कीं ‘ हें खिस्ती देवालय असतें तर यांत उपासनेकरितां येण्यास मला किती हर्ष वाटला असता ! ’ अशी मनाची स्थिति होणें हें ज्यास ह्मणून स्वधर्मप्रीति व स्वदेशप्रीति आहे त्यास साहजिकच आहे. नष्टवैभवाविषयीं इतकी हळहळ लागणें हें एक स्वदेशकल्याणतत्परतेचें सूचक आहे. नाहीं तर आमची मंडळी ! हळहळ वाटणें तर एकीकडेच राहून उलटें पूर्ववैभवाचें स्मारक असें जें कांहीं असेल त्याचा मागमूस नाहींसा करण्यांत व परकीयांचें सर्वस्वी अनुकरण करण्यांत दक्ष ! असोः–इसवी सनाच्या पंधराव्या शतकांत जेव्हां दुसऱ्या महंमदानें कान्स्टांटिनोपल काबीज केलें तेव्हां घोड्यावर स्वार होऊन तरवार हातांत घेऊन लोकांची कत्तल उडवीत तो या देवळाशीं आला. तेथें त्याला लोकांनीं आंत शिरण्यास अटकाव केला तेव्हांही तरवारीच्या जोरावरच तो आंत शिर-

ला व प्रेतें तुडवीत जातां जातां त्यानें एका संगमरवरी दगडा-च्या खांबावर वार केला. या वाराची खूण प्रेक्षक जनांस मुद्दाम दाखवितात. ही खुण जमिनीपासून दीड पुरुष उंचीवर आहे. तेव्हां इतक्या उंचीवर तरवारीचा वार कसा लागला? ह्या प्रश्नाच्या निराकरणार्थ असें सांगतात कीं प्रेतें इतकीं एकावर एक पडलीं होतीं कीं त्यांच्या राशींची उंची सुमारें अर्ध पुरुष होती. ह्यांत तथ्यांश किती आहे हें सांगतां येत नाहीं. परंतु युरोपियन लोक ही केवळ काल्पनिक आख्यायिका आहे असें समजतात.

## मशिदीचें वर्णन.

ही इमारत चतुष्कोनाकृति असून दक्षिणोत्तर २३५ फूट व पूर्वपश्चिम २५० फूट आहे. पूर्वेकडील भिंत एकसारखी नसून तिच्या मध्यभागीं अर्धवर्तुलाकार असा बांक आहे. याठिकाणीं पूर्वकालीं वेदिका असे. बाहेरून इमारत फार साधी दिसते. मध्यभागीं एक मोठा घुमट असून त्याच्या पूर्व व पश्चिम बाजूस लहान अर्धे घुमट जोडलेले दिसतात. यांच्या प्रत्येकाच्या बाजूस तीन लहान लहान घुमट आहेत; ह्मणजे लहान मोठे मिळून एकंदर ९ घुमट झाले. सर्वांत मोठ्या घुमटाचा व्यास १०७ फूट व त्याची उंची ४६ फूट आहे. हा घुमट जमिनीपासून १८० फूट उंचीवर आहे. या घुमटाचा आधार चार कमानींवर आहे. यांपैकीं दक्षिण व उत्तर भागच्या कमानींचा घेर १०० फूट असून उंची सुमारें १२० फूट आहे. या कमानींचा आधार चार धक्क्यांवर आहे. मशिदीच्या चारही कोपऱ्यास चार उंच मनोरे आहेत. हे बहुधा देवळाची मशीद झाल्यावर बांधले असावे.

आह्मीं नैर्ऋत्य दिशेच्या दरवाजानें आंत गेळों. हा दरवाजा जरी मोठा होता तरी झकू दिसत नसून मालिन दिसत होता. मोठ्या दरवाज्यानें आंत शिरल्यावर मशिदींतील कांहीं अधिकारी लोक आमच्या जवळ आले व त्यांनीं आमच्या बुटांवर अडकविण्यासाठीं कांहीं स्लिपरचे जोड आणविले. ते अडकवून आह्मी त्यांच्या मागोमाग आंत गेलों. पुढें आणखी एक दरवाजा लागला. त्या दरवाजानें आह्मी मशिदीच्या उपासनामंडपांत प्रवेश केळा. कांहीं पावलें पुढें जाऊन आजूबाजूला व वर खालीं नजर फेंकली तों मशिदीच्या अवयवांची भव्यता, विशालता व प्राचंडय यांच्या योगानें एक प्रकारचा तात्कालिक संमोह उत्पन्न झाला. तो विस्तीर्ण सभामंडप, ज्यामध्यें एकसमयावच्छेदेंकरून दहा हजार लोकांस निमाज पढण्यास जागा आहे; तो प्रचंड घुमट, जो आपल्या उत्तुंगतेमुळें व मध्यभागीं निराधार असल्यामुळें केवळ गगनावलंबी आहे असा भास होत आहे; ते रंगवैचित्र्ययुक्त स्थूल असे स्तंभ, ज्यांच्या प्रेक्षणानें सृष्टिकर्त्यांच्या रचनाचातुर्याविषयीं आश्चर्य व शिल्पिजनांच्या कौशल्याविषयीं धन्यता वाटल्याशिवाय राहत नाहीं; त्या विशाल कमानी, ज्यांचें परिमाण निर्दोष आहे व ज्या स्वतः सुंदर असून आसमन्ताद्भागाच्या अवयवांस सौन्दर्य देत आहेत; ते आरबी लिपींत लिहिलेले कुराणान्तर्गत लेख, जे आपली विशालता व परिस्फुटता या गुणांमुळें लेखकांच्या नैपुण्याची प्रतीति देत आहेत; त्याचप्रमाणें भिन्न भिन्न स्थळीं दृगोचर होत असलेलीं मर्मरोपलनिर्मित पीठें, व स्त्रियांच्या सोईसाठीं योजलेल्या अलिंदभूमिका, व उपासकजनांच्या पिपासाशमनार्थ निर्मिलेलीं ज-

छोद्गारयंत्रें—या सर्वांच्या अवलोकनानें आनंद होतो, आश्चर्य वाटतें, जीव दडपून जातो व मनुष्य किंकर्तव्यता-व किंवक्तव्यतामूढ होऊन त्यास कांहीं वेळ स्तब्ध उभें रहावें लागतें.

ज्या चार धक्क्यांवर घुमटाचा आधार आहे ह्मणून वर सांगितलें आहे त्या प्रत्येकाच्या बाजूस एक एक उंच व जाड असा स्तंभ आहे. धक्क्याच्या व स्तंभांच्या दरम्यान प्रत्येक कोंपऱ्यास दोन दोन असे आठ लहान खांब आहेत. हे खांब रोमन देवालयांतून आणिले होते. दक्षिणोत्तर भागांत ज्या स्त्रियांच्यासाठीं अलिंदभूमिका काढलेल्या आहेत त्या प्रत्येकीखालीं चार हिरव्या दगडांचे स्तंभ आहेत. हे स्तंभ इफिसस् येथील डाएनाच्या देवालयांतून आणिले होते असें ह्मणतात. यांशिवाय आणखी पुष्कळ खांब आहेत. एकंदर लहान मोठ्या खांबांची संख्या १०७ आहे. ही संख्या गूढार्थव्यंजक मानिली आहे. ह्यांपैकीं ६७ खांब नानावर्णमिश्रित संगमरवरी दगडाचे आहेत व त्यांच्या शीर्षभागावर तऱ्हेतऱ्हेचीं चित्रें व वेल काढलेले आहेत.

वर ज्या चार कमानी सांगितल्या आहेत त्यांपैकीं दक्षिणोत्तर बाजूला ज्या आहेत त्या खुल्या नाहींत. पूर्वपश्चिम बाजूच्या मात्र अगदीं खुल्या आहेत. त्यामुळें प्रवेशद्वारापासून तों थेट वेदिकेपर्यंत सर्व भाग एकसमयावच्छेदेंकरून अवलोकनांत येतो. मोठ्या घुमटाच्या पोकळीच्या चार कोंपऱ्यांत चार नानावर्णांच्या प्रस्तर खंडांनीं निर्मित अशीं पक्षयुक्त देवदूतांचीं चित्रें आहेत. हीं मूळ ख्रिस्ती लोकांनीं काढलेलीं होतीं; परंतु त्यांत आवश्यक फेरफार करून तीं तशींच राखिलीं आहेत. यांशिवाय दुसरीं पुष्कळ चित्रें ख्रिस्ती धर्मसंबंधी

जागजागीं होतीं; तीं सर्व, मुसलमानांच्या ताब्यांत हीं इमारत आल्यावर, नाहींशीं करून टाकिलीं आहेत. या चित्रांच्या जागीं महंमदाच्या अनुयायांचीं नांवें भव्य व सुंदर अशा आरबी लिपींत लिहिलेलीं आहेत. याशिवाय जागजागीं दुसरेही कांहीं तशाच लिपींत लिहिलेले लेख आढळतात. हे लेख चवथ्या मुरादाच्या कारकीर्दींत चलेबी नांवाच्या प्रसिद्ध लेखकानें लिहिलेले आहेत. या लेखांतील सर्वांत मोठ्या अक्षराची लांबी १० यार्ड आहे. घुमटाच्या पोकळींत एक कुराणांतील लेख लिहिला आहे त्याचा अर्थ "परमेश्वर स्वर्ग व पृथ्वीचा प्रकाशक आहे" असा आहे. मोठ्या घुमटास एकंदर २४ खिडक्या आहेत.

मशिदीचें तोंड पश्चिमेकडे असल्या कारणानें व पूर्वेच्या बाजूस त्यांची पवित्र वेदिका असल्या कारणानें ख्रिस्ती उपासक पूर्वेकडे तोंड करून उपासना करीत. परंतु मुसलमानी धर्माप्रमाणें मक्केंत असलेल्या महंमदाच्या पवित्रगृहास संमुख होऊन प्रार्थना करावी लागते. हें स्थान कान्स्टान्टिनोपल शहराच्या आग्नेय दिशेस आहे, तेव्हां आग्नेय दिशेकडे तोंड करून प्रार्थना करणें भाग आहे. तेव्हां अर्थात् इमारतीच्या स्थितीप्रमाणें योग्यायोग्यतेचा विचार बाजूला राहून धर्मविषयक आचारानुरूप व्यवस्था अमलांत आली. परंतु दिसण्यांत मात्र हा प्रकार फार विचित्र झाला. कारण कीं मशिदींत गेल्याबरोबर खालीं पाहिलें कीं प्रथम सर्व गालीचे व सतरंजा तिरक्या घातल्या आहेत असें नजरेस पडतें, व त्यामुळें एक प्रकारचा अव्यवस्थितपणा वाटतो. परंतु

त्याचें कारण समजलें ह्मणजे त्या लोकांचा दुराग्रह एका दृष्टीनें श्लाघ्य व एका दृष्टीनें उपहासास्पद वाटतो.

ह्या आग्नेय कोंपऱ्याजवळ विशेष प्रसंगाकरितांच केलेलें उपदेशकाचें पीठ आहे. असा प्रघात आहे कीं, दर शुक्रवारीं उपदेशक या आसनावर विराजमान होऊन सुलतानाप्रीत्यर्थ ईश्वराची प्रार्थना करितो. महंमदानें एका हातांत कुराण व एका हातांत तरवार घेऊन आपल्या धर्माचा प्रसार केला ह्या गोष्टीचें स्मरण लोकांस देण्याकरितां असा एक आचार अजून चालू आहे कीं, उपदेशक पीठारूढ होतांना हातांत एक काष्ठखड्ग धारण करितो. या पीठाच्या दोन कोंपऱ्यांत दोन पताका लाविलेल्या आहेत. ह्या पताका मक्केहून आणिल्या आहेत असें सांगतात; व त्या महंमदीय धर्माचा यहुदी व ख्रिस्ती धर्मांवर जो विजय झाला त्याच्या निदर्शक आहेत असें मानितात. हल्लीं वेदिकेवर पूर्व कालीं असलेलें जवाहीर दिसत नाहींत; व वर सांगितलेला सुवर्णत्रिशूलही आढळण्यांत आला नाहीं. मनोऱ्यांच्या शिखरांवर मात्र सुवर्णमंडित अर्धचंद्र झळकत आहे. मशिदीच्या मध्य घुमटावरील अर्धचंद्र सर्वांत फार मोठा आहे. ह्याला सोन्यानें मढविण्याकरितां तिसऱ्या मुरादानें ५०,००० डयुकट खर्च केले असें सांगतात. हा अर्धचंद्र समुद्रांत शंभर मैल अंतरावरून दृष्टीस पडतो.

ह्या मशिदींतही रमझानानिमित्त दीपोत्सवाची तयारी एव्हांपासूनच सुरू झाली होती. त्या समयीं एकंदर साडेआठ हजार दिवा या एका मशिदींत लागतो असें आह्मांस सांगित-

लें—कांहीं रोशनाई फारच खुषीदार करितात. वर सांगितले-ला कुरणांतील लेख, जो मुख्य घुमटाच्या पोकळींत आहे, त्यांतील सर्व अक्षरांच्या बाजूनें दिवे लावितात; व सर्व दीप प्रज्वलित झाले ह्मणजे सानंदचमत्कृतिजनक असा देखावा होतो असें ह्मणतात. रमझानाच्या २४ व्या तारखेस रात्रीं कुराण स्वर्गांतून पृथ्वीवर आलें असें मुसलमान लोक मानितात. तेव्हां दीपोत्सव विशेष बहारीचा होतो. यासमयीं सुलतान आपलें मंत्रिमंडल, मानकरी, व इतर लवाजम्यासह या स्थानीं मोठ्या थाटानें येतात; व उपासनेनंतर परत जातात. याशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्रसंगीं राजश्रींचे पाय या मशिदीस लागत नाहींत.

आमचा पोषाक युरोपियन रिवाजाचा नसल्या कारणानें, व आमच्या डोक्यास पटके व रुमाल असल्यामुळें मशिदींतील अधिकारिजनांस आह्मीं महंमदीय धर्मानुयायी आहोंत असें वाटलें, परंतु प्रवेशानंतर आमची उपासना-प्रवीणता जेव्हां त्यांच्या अनुभवास आली नाहीं तेव्हां त्यांनीं आमच्याकडे रोषयुक्त असे दृक्पात फेंकले. तेव्हां आह्मांस मोठी पंचाईत पडली. आमच्याबरोबर दुभाष्या होताच; त्याकडून आह्मीं मुसलमान नाहीं हें तावडतोब कळविण्याचा तर आह्मीं यत्न केला. परंतु तसें करूनही जेव्हां शंकासमाधान झाल्याची मुद्रा दृष्टीस पडली नाहीं, तेव्हां एक क्षणभर कांहीं विरोध उत्पन्न होतो कीं काय असें वाटलें. कारण कीं त्यांच्या मनाचा आम्हीं मुसलमान असा जर पक्का ग्रह झाला असला तर त्यांच्या पवित्र देवालयांत जाऊन सांप्रदायिक आचारानुरूप आचरण न केल्यामुळें अवहेलनेचा

आमच्यावर आरोप येऊन आम्हीं त्या धर्माग्रही व तर्कटी लोकांच्या हातीं असभ्याचरणास पात्र झालों असतों. परंतु पुनः एकवार खात्रीपूर्वक सांगितल्यामुळें ही चिंता दूर झाली.

मशीद पहातां पहातां एका स्थलीं काहीं मौलवी शिष्यांकडून कुराणाध्ययन करवितांना आढळले. शिष्यवर्ग गुडघे टेंकून बसलेला होता व गुरूनें सांगितलेल्या पाठाची गुंडिका करतांना स्वर उच्चनीच करीत होता, व त्यांचा अंगविक्षेपही बराच होत होता. हा मासला कांहींसा आपल्या वेदपठणासारखाच होता. गुरूची मुद्रा गंभीर असून कार्यगौरवव्यंजक दिसत होती. आह्मी जवळ उभे राहिलों तरी गुरुशिष्यांचें काम निश्चलपणें चाललें होतें.

याप्रमाणें ही मशीद पाहून आह्मी परत निघालों. मशीद फार पुरातन असल्याकारणानें मलिन दिसत होती, व या कारणानें तिच्या भव्यतेनें व प्राचंड्यानें जो विलक्षण ठसा मनावर व्हावा त्यांत कमीपणा येई. आपल्या उत्तरहिंदुस्थानांतील दिल्ली व आग्रा येथील इमारती जरी या मशिदीच्या तुलनेनें फार लहान आहेत, तथापि त्यांत जी उज्वलता आहे ती इस्तंबोल शहरीं पाहण्यांत आली नाहीं. एक तर वर निर्दिष्ट केलेल्या मशिदी शुभ्र मर्मरोपलमय असल्या कारणानें त्यांवर जसे दुसरे रंग खुलून उठतात त्याप्रमाणें विटांच्या भिंतीवर तुकडे जोडून केलेल्या नक्षीची छाप पडत नाहीं; व दुसरें असें कीं या इमारतींची व्यवस्था ठेवण्याचा व डागडुजी करण्याचा बंदोबस्त इकडे आहे तसा तिकडे नसावा असें वाटतें. असो; आम्ही मशिदींतून निघावयास लागलों तेव्हां एका माणसानें मूठभर कांचेचे व दगडाचे

तुकडे प्रसादादाखल आमच्या जवळ दिले. हे तुकडे भिंतीचे काढून आणिले असावे असें वाटलें. मी मूठ उघडून पहावयास लागलों तों मला मनाई केली; व कारण विचारलें तेव्हां असें सांगितलें कीं हे तुकडे पवित्र असल्या कारणानें प्राकृत जनांच्या दृष्टीस पडूं द्यावयाचे नाहींत, व उघड दाखविले असतां मठाधिकारिजनांस मोठी चीड येईल. यांत तथ्य काय होतें कोण जाणें ! परंतु असें असण्याचा मात्र संभव दिसतो कीं, असे भिंतीचे तुकडे राजरोज काढूं दिल्यास सर्व भिंती उध्वस्त होतील. तेव्हां तसें करण्याची मनाई केली असेल व ज्या माणसानें कांहीं बक्षिस मिळविण्याच्या इच्छेनें आह्मीं भाविक असें समजून आह्मास हे दिले त्यानें आपल्या कृत्याचें गोपन करण्याकरितांच ते न दाखविण्याविषयीं असा बहाणा केला असेल !

## " हिपोड्रोम. "

सान्टासोफिया मशिदीच्या नैर्ऋत्य दिशेस कांहीं अंतरावर एक पटांगण आहे त्यास " हिपोड्रोम " ह्मणतात. मशीद पाहून आह्मी तिकडे वळलों. प्रथमतः हें पटांगण सेव्हेरस बादशहानें तयार करविलें होतें. याची लांबी ९०० फूट व रुंदी ४५० फूट होती. परंतु आकृति चौकोन नसून वर्तुलाकार होती. याचा मूळ उद्देश घोड्यांचे वगैरे खेळ व शर्यती करण्याकरितां होता. सभोंवार प्रेक्षकांकारितां पांढऱ्या संगमरवरी दगडाचीं आसनें बनविलेलीं होतीं. बादशहाच्या हातून हें काम पुरें झालें नाहीं; व कालान्तरानें त्याचा मागमूसही नाहींसा झाला. असें सांगतात कीं, या स्थळीं पूर्वकालीं दगडावर

कोरलेल्या पंचरसी धातूच्या बनविलेल्या अशा असंख्य पौरा-णिक देवता होत्या. परंतु त्यांचा हल्लीं कोठें पत्ता लागत नाहीं. तुर्की राज्य सुरू झाल्यापासून ह्या मैदानाचा उपयोग घोड्या-वर बसून फेरफटका करण्याकडे होत होता. पुढें कांहीं काळानें "जानिसरीज" नांवाचा एक सैनिकवर्ग उपस्थित झाला. त्यांचें ठाणें ह्या मैदानांत झालें. ह्या लोकांचा प्रभाव इतका वा-ढत गेला कीं ते कर्तुमकर्तुमन्यथाकर्तु शक्तिमान् झाले होते. वाटेल त्या सुलतानास पदच्युत करून वाटेल त्यास गादीवर बसवीत. प्रथम सुलतान अहमदाच्या राज्यांत यांनीं बंड केलें व कांहीं कालानंतर त्यांचा मोड झाला. या लोकांच्या कृत्यांचें स्मरण झालें ह्मणजे अजून तुर्क लोकांच्या अंगावर रोमांच उभे राहतात. सांप्रत काळीं ह्या पटांगणांत अवलोकनार्ह कांहीं एक नाहीं. आजूबाजूनें कांहीं उंच घरें दिसतात परंतु त्यांच्या बाह्य स्थि-तीवरून तीं गतवैभव भासतात. मात्र पटांगणाच्या मध्यभागीं ठिकठिकाणीं कांहीं मनोरे दिसतात. सर्वांच्या मध्यस्थानीं इजिप्त देशांतून आणिलेला मर्मरस्तंभ आहे. याची उंची सु-मारें ५० फूट आहे. हा चतुष्कोण असून याच्या चतुःपृष्ठावर मिसरदेशीय सांकेतिक लिपींत लिहिलेले कांहीं लेख आहेत. ह्या स्तंभाच्या शिरोभागावर एक पंचरसी धातूचें बनविलेलें अननस होतें, परंतु धरणीकंपानें तें पडून गेले असें सांगतात. ह्या स्तंभानजीकच एक संगमरवरी मनोरा आहे; परंतु ह्याचा शिरोभाग ढासळून गेला आहे व बाकी राहिलेला भागही फार दिवस टिकेल असें वाटत नाहीं. कांहीं अंतरावर दुसरा एक चमत्कारिक स्तंभ आहे. ह्याची उंची सुमारें १५ फूट आहे. हा पंचधातुमय अशा सर्पत्रयाच्या संयोगानें बनलेला आहे.

सर्पांचे शिरोभाग सांप्रतकालीं तुटून पडले आहेत, परंतु पूर्व-कालीं ह्या सर्पत्रयाचीं शीर्षाग्रें, डेल्फाय येथील आपालो दे-वाच्या गुर्विणीचें जें सुवर्णमय त्रिपाद् (तीन पायांचें मेज) असे, त्याला आधारभूत झालीं होतीं. हें त्रिपाद् खालील स्तं-भासकट कान्स्टंटाइन यानें कान्स्टान्टिनोपल येथें आणिलें, व इसवी सन १६७५ सालापर्यंत तें जसेंच्या तसेंच होतें.

## एका पंतोजीची शाळा.

हे स्तंभ व मनोरे पहात पहात आह्मीं ह्या मैदानांतून चा-ललों; व कांहीं वेळानें पश्चिमेच्या बाजूस एक लहानशी मो-डकीतोडकी इमारत आहे तिच्याजवळ गेलों. गाडींतून उतरू-न एक लहानशी प्रांगणभूमिका वलांडून पुढें गेलों. बाजूनें ए-का ओट्यावर कांहीं मुलें जमलेलीं दिसलीं. विशेप लक्ष ला-वून पाहिल्यावर ती एक शाळा होती, असें दिसलें. ती एकं-दर व्यवस्था पाहून मला पुण्यामध्यें एखाद्या जुनाट वाड्यांत गांवठी पंतोजीच्या धुळाक्षर शिकविण्याच्या शाळेची आठवण झाली. आह्मांस पाहून मुलें टाळ्या वाजवूं लागलीं व शिक्षक जवळ नसता तर आह्मांवर त्यांनीं धूलिविक्षेपाचाही प्रयोग केला असता.

## प्राचीन वेषांचें संग्रहालय.

पुढें एक जिना लागला त्या जिन्यावरून चढून आह्मी एका माडींत गेलों. या स्थलीं प्राचीन वेषांचा संग्रह होता. ठिकठिकाणीं काष्ठमय प्रतिकृति बनवून ठेविल्या होत्या व पूर्वकालच्या निरनिराळ्या कामदा-रांच्या व इतर भिन्नभिन्न लोकांच्या वेषांचें व रूपवैचित्र्याचें

यथार्थ ज्ञान देण्याचा यत्न केलेला दिसत होता. हा यत्न कितपत सफल झाला होता हें सांगण्याचा तर माझा अधिकार नाहींच. परंतु इतकें मला ह्मणण्यास बिलकुल हरकत वाटत नाहीं कीं, कारागिरांनीं कौशल्याचा अभाव पूर्णपणें दाखविला होता. सर्व प्रतिकृति आचडधोबड असून रंगांत किंवा वेषवि- भूषणांत कांहींच मार्मिकता दिसून येत नव्हती. ज्या दिवाण- खान्यांत हा संग्रह मांडला होता तोही अगदीं निकृष्टावस्थेंत असल्यामुळें संग्रहास शोभा येण्याची एकीकडे राहून उलट त्याची जी काय थोडी बहुत शोभा असेल ती कमी होई. या ठिकाणीं पूर्वीच्या कारकीर्दींत सुलतानाच्या खास तैनातीला ज्या ज्या प्रकारचे कामदार व नोकर चाकर असत त्या सर्वां- च्या प्रतिमा आहेत. त्याचप्रमाणें सर्व प्रकारचे धंदे व व्यापार करणाऱ्या मंडळींच्याही आहेत. वर जो 'जानिसरीज' नामक सैनिक वर्ग सांगितला त्याच्या नायकाची चित्रविचित्र व हा- स्योत्पादक अशा वेषानें अवगुंठित अशी एक प्रतिमा आहे. सुलतानाच्या तैनातींतील मंडळींपैकीं विशेष लक्षांत ठेवण्या- जोगीं पात्रें ह्मणजे कृष्णवर्ण व गौरवर्ण वर्षवरगणाचे अधि- पति, न्हस्वाकृति पुरुष, राजवैद्य, वध्य पुरुष, निरनिराळ्या वर्गाचे मानकरी, वजीर इत्यादि. बाकी मंडळींत नृत्य व गा- यन करणाऱ्या स्त्रिया, पखालवाला, मिठाईवाला, धर्मोपदेशक, व शिपाई ह्यांचे पुतळे थोडेसे मौज वाटण्यासारखे होते. एका स्थळीं एका अल्पवयी शिपायाचा पोषाक केलेल्या मनुष्याची प्रतिमा होती. परंतु तोंडावर एक सूक्ष्म वस्त्राचें अवगुंठण हो- तें. त्याबद्दल चौकशी केली तेव्हां असें समजलें कीं तुर्क लो- कांस सुस्वरूप तरुण मुलांचा मोठा शोक. तेव्हां तोंड झाकल्या

शिवाय तरुण मुलांस फिरूं दिल्यास त्यांस बिघडवून टाकण्या-च्या फार संभव ह्मणून वर सांगितलेल्या अवगुण्ठणाची चाल पडली. ही चाल आमच्या पाहण्यांत कोठें आली नाहीं. परंतु तसलें व्यसन अजूनही प्रचारांत असावें असें वाटतें. याप्रमाणें हें संग्रहालय पाहून आह्मी घरीं परत आलों.

## भाषेची अडचण.

मुंबईहून निघाल्यापासून सुएझपर्यंत भाषेसंबंधानें व्यवहाराची अडचण पडली नाहीं. कारण कीं आगबोटीवरील नोकरचाकर इंग्रज असल्या कारणानें इंग्रेजी भाषेंत सर्व व्यवहार होई. परंतु पुढें कांहीं कांहीं ठिकाणीं ह्मणजे केरो, आलेक्झांड्रिया वगैरे जागीं इंग्रेजीनें निर्वाह होईना. ज्या देशांत जावें त्या देशाची भाषा निराळीच. परंतु असें आढळण्यांत आलें कीं, फ्रेंच भाषेचा प्रचार बऱ्याच ठिकाणीं आहे ; ह्मणून थोडें फ्रेंच आल्यास बरें असें वाटून नित्य व्यवहारांतील संभाषणवाक्यांचा संग्रह ज्यांत असेल असें एखादें पुस्तक विकत घेण्यासाठीं बाजारांत गेलों, व एक पुस्तक खरेदी केलें. परंतु अभ्यास करण्यास अवकाश फार न मिळाल्यामुळें व इंग्लंडांत पोंचल्यावर त्याची गरज न लागल्यामुळें तें पुस्तक जसेंच्या तसेंच परत आणलें.

## स्मश्रूची पंचाईत.

याचप्रमाणें दुसरी एक गोष्ट सांगावयाची ती ही. सुएझपर्यंत ज्या आगबोटींत होतों तींत हजाम होता, हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां पहिले दहा दिवस हा कारागीर आमच्या तैनातीला होताच. पुढें कान्स्टान्टिनोपल येथें पोहोंचेतोंपर्यंत प्रवासांतच दिवस गेल्याकारणानें स्मश्रू करविण्याकडे फारसें लक्ष गेलें नाहीं. परंतु तेथें आमचा आठ दिवस मुक्काम व्हा-

वयाचा व चार लोकांकडे जाण्यायेण्याचा प्रसंग पडावयाचा. साहेबी रीतीप्रमाणें तर रोज दाढी केल्याशिवाय बाहेर जाणें ह्मणजे शिष्टाचाराला विरुद्ध. हजामाच्या दुकानीं रोज जावें तर कार्यांतरव्यापृततेमुळें जाण्याची सवड नाहीं. हजाम घरीं बोलवावा तर मजुरी भलभलतीच द्यावी लागेल असें भय घालीत. अशा अडचणींत साहेबलोक कसें करितात म्हणून विचारिलें तर जबाब असा मिळाला कीं स्वत: ते त्यावेळेपुरते नापिक बनतात. तेव्हां तदनुसार वर्तन करण्याशिवाय दुसरी तोडच उरली नाहीं. अशीच कल्पना केली कीं पूर्वीं एकवेळ पुण्यांत व वाईस जसा न्हाव्यांनीं कट केला होता त्याप्रमाणें जसा कांहीं आतांही केला आहे. तेव्हां अशा प्रसंगीं तत्संबंधी आयुधांची जुळवाजुळव करण्याकरितां आमची स्वारी बाजारांत गेली व आवश्यक हत्यारें घेऊन परत आली. प्रथम हें कृत्य कसें उरकतें व माझ्यासारख्या मंदद्दष्टि जनास हें कसें निभेल ह्याची फार पंचाईत वाटली. परंतु ह्मण आहेना 'अनभ्यासे विषं शास्त्रम्', परंतु अभ्यासानें वपनशास्त्राचें परिशीलन बरेंच झाल्यावर कामापुरतें प्रावीण्य प्राप्त झालें ! असो; त्या दिवशीं दुपारीं एकदा इस्तंबोलच्या बाजारांत उभ्या उभ्या जाऊन आलों ; परंतु खरेदी वगैरे कांहीं केली नाहीं.

## इस्तंबोलचा बाजार.

तिसऱ्या दिवशीं सकाळीं बाहेर पडलोंच नाहीं. दुपारीं मात्र इस्तंबोलचा बाजार पहावयास गेलों. सर्व बाजार उंचवट्यावर असल्या कारणानें गाडींत बसून सर्व ठिकाणीं जाण्याची सोय नाहीं. रस्त्याची फरसबंदी फारच वाईट असल्या कारणानें

सुखानें पायीं चालण्याचीही पंचाईत; मग गाडींतून हिंडण्याची तर गोष्टच नको. एकांतएक अशा जिकडे तिकडे गल्ल्याच गल्ल्या दिसत होत्या. माझ्या बरोबर एक यहुदी वाटाड्या हो-ता. मी गाडींतून उतरून पायीं चाललों तों माझ्या भोंवतीं मुलांची गर्दी जमली व माझ्या बरोबरच्या माणसास त्यांस दूर करतां करतां पुरेवाट झाली. कांहीं गल्ल्यांमधून छतें टांग-लीं होतीं त्यांमुळें तर हवा अस्वच्छ होऊन तेथून जातांना फारच अस्वस्थ वाटलें. जो तो दुकानदार आपल्या दुकानांत बोलावी. कारण त्याला असें वाटे कीं हिंदुस्थानी मंडळीकडून पैसे काढून घेण्याची ही उत्तम संधि आहे. परकी माणसास ह्या बाजारांत कोणतेंही सामान घेणें ह्मणजे फार पंचाइतीचें काम आहे. एक तर हे लोक कधींही अस्सल माल दाखवाव-याचे नाहींत व किंमत वाजवीपेक्षां दहापट किंवा निदान पां-चपट तरी सांगावयाची. दुसरें असें कीं जितकी ह्मणून मार्ग-दर्शक मंडळी आहेत तितक्या सर्वांचा या दुकानदारांशीं मिलाफ असल्या कारणानें त्यांच्या मार्फत घेण्यांतही फारसा फायदा नाहीं. हें जाणूनच आमच्या महाराजांनीं येथें कांहींच खरेदी केली नाहीं. मी मात्र अल्पस्वल्प केली. कांहीं इस्तंबोली गुलाबाचें अत्त-र व कांहीं हस्तीदंती सामान घेतलें. येथील बाजाराची जरीच्या व नक्षीच्या कापडसामानाविषयीं, प्राचीन जडावाच्या हत्यारां-विषयीं, व रुपेरी सामानाविषयीं फार प्रख्याति आहे. आह्मी एका मोठ्या वखारींत गेलों होतों. तेथें लाखों रुपयांचा माल भरलेला होता. तेथें कांहीं अमोलिक वस्तु आमच्या नजरेस पडल्या. कांहीं किनखाबी व भरजरीचे पडदे होते त्यांवर आ-रबी लिपीची वेलबुटी काढलेली होती. कांहीं फारच खुमास-

दार व मुलाईम असें जाळीचें कापड होतें त्यावर सोनेरी क-
लाबतूचीं व रेशमी फुलें काढलेलीं होतीं. हें सर्व काम तुर्की
बायका आपल्या जनानखान्यांत करतात असें आह्मांस सां-
गितलें. याशिवाय कांहीं तरवारी, जंबिये, कट्यारी वगैरे
आह्मांस दाखविल्या त्यांपैकीं कांहींच्या मुठीवर हस्तीदंती कों-
रीव काम केलें होतें. कांहींवर जडावाचें काम होतें. कांहींच्या
पातींवरही सोनेरी नक्षी होती. 'अंबर' नामक काष्टविशेष
निर्मित अशा नाना तऱ्हेच्या धूम्रवाहकमुखयष्टिका होत्या.
त्या प्रदेशीं हुक्का ओढण्याचें मोठें व्यसन, तेव्हां त्या कामीं ह्या
यष्टिकांचा फारच उपयोग. शिवाय एक प्रकारच्या हातांत
घ्यावयाच्या काठ्याही येथें चांगल्या मिळतात.

दुकानें चांगलीं नीटनेटकीं दिसत नसून तीं एकमेकांशीं
अव्यवस्थितपणें मिसळलीं होतीं. ह्या सर्व अव्यवस्थितपणांत
एवढी मात्र व्यवस्था होती कीं, निरनिराळ्या प्रकारच्या का-
रागिरांचे निरनिराळे महल्ले होते. हें आथेन्स व रोम या शह-
रांचें अनुकरण आहे असें म्हणतात. जवाहिरी लोक एका
प्रांतीं आहेत; सोनार दुसऱ्या प्रांतीं; चर्मकार तिसऱ्यांत; व
औषधी विकणारे लोक चवथ्यांत, अशी व्यवस्था आहे. असें
सांगतात कीं, पेरा शहरांत जो हल्लीं बाजार झाला आहे तो
होण्यापूर्वीं इस्तंबोलच्या बाजाराची फार भरभराटी होती.
परंतु हल्लीं सर्व बडे लोक पेरा येथील दुकानदारांशींच व्यव-
हार करतात. इस्तंबोल येथील दुकानदारांना इंग्रजीचे दहा-
वीस शब्द येत असतात. कांहींना थोडें फ्रेंचही येत असतें. हें
शहर केवळ पहाण्याकरितां युरोपांतील निरनिराळ्या देशाचे
शोकी लोक येथें फार येत असतात, व ते बाजारांत गेले

ह्मणजे त्यांच्यावर झडप घालण्याला वर सांगितलेली भाषाज्ञानाची तयारी अवश्यकच आहे.

बाजार पाहून आह्मी इस्तंबोल शहराचा जो भाग पूर्वी पाहिलेला नव्हता तिकडे वळलों. हा भाग बराच सपाट असून त्यांतील रस्तेही मोठे प्रशस्त होते. मोठ्या रस्त्यानें एक ट्रामवे चालली होती. त्यांत दोन दालनें असून एक फक्त स्त्रियांच्या उपयोगाकरितां होतें. यावरून असें स्पष्ट होतें कीं, जनानखान्याची जरी चाल चालू आहे तरी बाहेर हिंडणें फिरणें, व बाजारांत जाणें या गोष्टींला बिलकुल प्रत्यवाय नाहीं. मात्र सर्व शरीर वस्त्रावगुण्ठित असण्याची रीत सर्व ठिकाणीं आढळली.

## कारंजीं.

नंतर आम्ही एका मशिदींत गेलों. तेथें एक जलोद्गारयंत्र असून त्या भोंवतीं तृषार्त लोक जमलेले होते. बाजूला पुष्कळ खबुतरें बसलीं होतीं. त्यांमुळें तें स्थल आपल्या देशांतल्यासारखें दिसत होतें. या शहरीं अशा प्रकारचीं कारंजीं फार आहेत. या कारंजाचे दोन प्रकार आहेत. कांहीं धार्मिक लोकांनीं केवळ लोकांना पाणी पिण्याकारितां बांधलेलीं आहेत; व कांहीं सरकारी खर्चानें निमाज पढण्यापूर्वी लोकांना हातपाय धुण्यासाठीं बांधलेलीं आहेत. कांहीं कारंजीं मोठीं भव्य व चित्रविचित्र आहेत. त्यांवर पांढऱ्या संगमरवरी दगडांचे काम असून शिरोभागीं नाना तऱ्हेचीं फुलें व पुष्पें प्रस्तरमय पात्रविशेषांत ठेविलेलीं अशीं दिसतात. याप्रमाणें इस्तंबोलचा बाजार व मशीद पाहून आह्मीं तीन प्रहर दिवसाच्या आंत घरीं परत आलों.

# एक विलक्षण प्रसंग.

कांहीं वेळ विश्रांति घेऊन सायंकालच्या सुमारास फिरून एकटा घराबाहेर पडलों. आमच्या तैनातीला असलेले मार्गदर्शक कार्यान्तरांत व्यग्र असल्यानें माझ्याबरोबर येण्यास त्यांस फुरसत नव्हती, ह्मणून एकटें जावें लागलें. परंतु मनांत असा विचार आला कीं या अपरिचित स्थलीं नाना पंथांच्या गुंफेंत शिरून जर मार्गभ्रष्ट झालों तर फिरून स्वपथाप्राप्ति दुष्कर होईल. त्यांतून इतर जनांच्या भाषेचें परिज्ञान मला नाहीं व माझ्या भाषेचें इतर जनांस नाहीं. बरें मुळींच बाहेर पडूं नये तर ज्या ठिकाणीं आपल्याला फिरून जाण्याचा प्रसंग येण्याचा संभव नाहीं अशा जागीं दोन घटका स्वतंत्र फिरण्याला मिळाल्या तर त्यांचा लोकस्थितीचें अवलोकन करण्यांत उपयोग न करून केवळ आपल्या खोलींत बसून त्या घालवाव्या हेंही बरें वाटेना—अशा प्रकारच्या मनाच्या द्वैधीभावाच्या स्थितींत कुतूहल भयापेक्षां बलवत्तर होऊन मी बाहेर पडलों. मात्र परिचित प्रांतापासून फार दूर न भकण्यचा निश्चय केला. असें सांगतात कीं इस्तंबोलांत परकी लोकांस रात्रीस फिरणें फार भयावह आहे. परंतु आह्मी पेरा शहरांत रहात होतों हें वर सांगितलेंच आहे. येथें पुष्कळ युरोपियन लोक राहतात तेव्हां येथें भय कमी. तथापि दिवसाउजेडीं घरीं परत आलों ह्मणजे बरें असें वाटलें.

कांहीं अंतरावर गेल्यावर एक विस्तीर्ण सोपानपरंपरा लागली. परंतु निरनिराळ्या पायऱ्यांचें परिमाण सारखें नव्हतें. पूर्वीं सांगितलेंच आहे कीं हीं शहरें टेंकड्यांवर वसलीं आहेत. तेव्हां ज्या रस्त्यानें गाड्या वगैरे जावयाच्या त्यापासून लांब

अंतरावर व त्यापेक्षां सखल असे जे शहराचे भाग आहेत त्यांत रहाणाऱ्यांच्या सोईकरितां अशा प्रकारचे सोपानपथ केले आहेत. दुसरा यांचा उपयोग असा होतो कीं ज्या ठिकाणीं गाडीच्या रस्त्यानें जाण्यास लांब फेरा पडून वेळ लागतो त्या ठिकाणीं पायांनीं थोड्या वेळांत जातां येतें. या पायऱ्या उतरून मी खालीं गेलों तों लोकांची फारच गर्दी दृष्टीस पडली. संध्याकालचा समय असल्या कारणानें मजूरदार लोक कामावरून परत येत होते व घरीं जाण्याच्या अगोदर आपल्या उदरनिर्वाहाची आवश्यक सामुग्री विकत घेण्यांत मिळालेल्या वेतनाचा कांहीं भाग खर्च करून कांहीं अंश आपल्या मुलाबाळांकरितां खाऊ घेण्यांत खर्च करीत होते. कांहीं शोकी लोक काफीपानगृहांत जाऊन एकेक खुर्ची घेऊन रथ्यासंमुख बसले होते व काफी पितां पितां मध्यें हुक्कयांचे व कागदी विड्यांचे झुरके ओढीत होते. सर्व दुकानदार मोठ्या लगबगींत आहेत. अशा प्रकारची मजा पहात पहात कांहीं वेळ फिरलों, व नंतर घरीं जाण्याचा विचार केला; परंतु आल्या रस्त्यानें घरीं परत न जातां दुसऱ्या रस्त्यानें जावें ह्मणून ज्या दिशेकडून मी आलों होतों, त्या दिशेच्या धोरणानें परत चाललों. कांहीं वेळ गेल्यानंतर तुर्की टोपी व इंग्रजी तऱ्हेची विजार व डगला घातलेला असा एक यहुदी मजजवळ येऊन मला सलाम करून माझ्याशीं इंग्रजींत बोलूं लागला. याच्या चेहऱ्यावरून हा मोठ्या फिकिरींत असावासा दिसला; व त्याच्या अतिनम्रपणाच्या भाषणावरून हा कोणी तरी कामसाधु असावा असें वाटलें. कांहीं प्रश्नोत्तर झाल्यावर असें समजलें कीं हा गृहस्थ एक प्रकारचा

दलाल असून परदेशांतून आलेल्या लोकांस कांहीं जिन्नसपा-न्नस घेणें झाल्यास त्यांस मदत करितो. मीं त्यास सांगितलें कीं मला कांहीं खरेदी करावयाची नाहीं. तेव्हां त्याचा नाइला-ज झाला. नंतर तो माझ्या अगदीं जवळ येऊन हळू हळू बोलूं लागला. प्रथम मला त्याचा भावार्थ समजला नाहीं, परंतु कांहीं वेळानें असें लक्षांत आलें कीं कांहीं तरी नाद लावून तो मला फुसलावयास पहात आहे. तेव्हां मी त्याला सोडून तडक घरचा रस्ता धरला. नंतर घरीं आल्यावर आमच्या ओ-ळखीच्या मार्गदर्शकास हा वृत्तांत सांगितला. तेव्हां तो असें म्हणाला कीं या शहरांत कित्येक काफीपानगृहांत वाईट चालीच्या स्त्रिया असतात त्या तेथें गेलेल्या अपरिचित माणसास लुबाडून घेतात. ही गोष्ट येथें सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं कोणास कधीं या शहरीं जाण्याचा प्रसंग आला तर त्यानें सावध रहावें.

## हारुमेनिया आगबोटीचा जलसमाधि.

चवथ्या दिवशीं ह्मणजे तारीख २१ रोजीं उठावयास जरा उशीर झाला ह्मणून मुखमार्जनविधि लवकर आटपून खोली-च्या बाहेर पडलों व दिवाणखान्यांत आलों तों सर्व मंडळी फार सचिंत दिसली. तेव्हां कांहीं तरी मोठा अनर्थ घडला असावा असें वाटून काळीज चर झालें; परंतु काय झालें हें विचारण्यास धीर होईना. म्हणून कांहीं वेळ तसाच स्तब्ध ब-सलों तेव्हां प्रसंगोपात्त संभाषणावरून असें समजलें कीं ज्या आगबोटीवर आह्मी सुएसपर्यंत आलों ती आगबोट वाळूंत रुतून बुडाली. हें वर्तमान ऐकल्या बरोबर चित्तवृत्ति कांहीं वि-

चित्र होऊन गेली. एकसमयावच्छेदेंकरून नानाप्रकारचे विचारतरंग मनःसमुद्रांत उद्भवून आपआपली स्फुटप्रतीति देण्याचा यत्न करूं लागले. परंतु त्यांच्या एककालीनत्वामुळें एकाचाही स्फुट भास न होऊन सर्वंच गोंधळ होऊन गेला. कांहींवेळ गेल्यानंतर किंचित् स्वस्थता वाटली व झालेल्या गोष्टीशीं आपला सद्यः संबंध काय आहे याचा विचार करावयास लागलों. तत्वदृष्टीनें विचार केला म्हणजे असें कबूल करावें लागतें कीं जगांतील सर्व व्यवहारांत मनुष्य नेहमीं स्वार्थपर असतो. कांहीं झालें तरी त्याचा आपल्यावर परिणाम काय याचा प्रथम विचार येतो; व त्यासंबंधानें सर्व अबाधित असलें म्हणजे लौकिकदृष्ट्या झालेल्या गोष्टीविषयीं विचार करावयास लागतो. मीही ह्या साधारण श्रेणींतीलच मनुष्य, तेव्हां माझ्याही विचाराचा हाच क्रम होता हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. ' टास्मोनिया ' च्या जलनिमज्जनाचा सर्व वृत्तांत त्यावेळीं वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालाच होता, व मीही वर्तमानपत्रांतूनच वाचला होता, तेव्हां त्याबद्दल येथें कांहीं लिहिण्याची जरूर नाहीं. तें वर्तमान जेव्हां कळलें तेव्हां ताबडतोब प्रसंग कोणत्या प्रकारचा असावा याचें चित्र मनासमोर आलें. ती आगबोट व तीवरील सर्व खलाशी व कामदार लोक, तीवरील अल्पसहवासानें परिचित झालेले उतारू लोक-पुरुष, बायका व मुलें-यांची त्या प्रसंगीं काय अवस्था झाली असेल याची कल्पना मनांत येऊन अंगावर रोमांच उभे राहिले खरे; परंतु आम्ही त्या प्रसंगांतून बांचलों याबद्दल एक प्रकारचें मनाला समाधान वाटून ईश्वराचा त्याच्या अतर्क्य कृतीबद्दल स्तव केला. असें जरी समजलें होतें कीं उतारूंपैकीं एकही अ-

सामी दगावला नाहीं तरी असें ऐकिलें होतें कीं, थंडीवाऱ्यामुळें वरेच लोकांचे हाल झाले, व त्यामुळें असें वाटे कीं, उतारू लोक युरोपियन असल्या कारणानें त्यांना थंडीवाऱ्याची संवय म्हणून त्यांनीं टिकाव धरिला; परंतु आमच्यासारख्या उष्णकटिबंधांत राहणाऱ्या लोकांची अशा प्रसंगीं दशाच व्हावयाची, व जलसमाधीचा प्रसंग यावयाचा ! हा एक विचार झाला.

याच्या मागोमाग दुसरा विचार आला त्यानें मात्र कंबर खचली. ह्या आगबोटींत आमच्या महाराजांचें सर्व जवाहीर, कपडालत्ता व इतर पुष्कळ सामान पाठविलें होतें. आम्ही जागोजाग थांबत व प्रदेश पहात जाणार, तेव्हां सर्व सामानसुमान बरोबर असल्यानें हरकत व त्रास होण्याचा संभव म्हणून अशी व्यवस्था केली होती. तिचा असा परिणाम झाला तेव्हां सर्वच बेत फिसकटतो किंवा काय असें वाटलें. "प्रथम ग्रासे मक्षिकापातः" अशी स्थिति झाल्यावर ही सफर शेवटास जाते कां येथूनच परत हिंदुस्थानाचा रस्ता धरण्याचा बेत होतो याचा निश्चय न होऊन मनाला विषाद झाला, व आगामि सुखाची जी इमारत मनोराज्यांत बांधली होती ती डळमळून पडते कीं काय असें वाटलें. कारण कीं ज्युबिलीच्या समारंभासाठीं विलायतेला जावयाचें व त्या वेळीं दुसरे राजेरजवाडेही तेथें जमावयाचे. तेव्हां अशा प्रसंगीं आपल्या इतमामास योग्य अशा कपड्यालत्त्याशिवाय व जवाहिराशिवाय नुसतें हात हालवीत जाणें कोणालाही बरें वाटावयाचें नाहीं. अशा प्रसंगीं कमी धैर्याच्या मनुष्यानें तेव्हांच पीछेहाट केली असती. परंतु आमचे महाराज बिलकुल डगमगले नाहींत. पांच लक्षांचें जवाहीर पाण्यांत बुडून नाहींसें झालें असें सम-

जलें तरी त्या गृहस्थाची मुद्रा यत्किंचितूही बदलली नाहीं झाल्या गोष्टीबद्दल त्यांस उद्विग्नता वाटली नाहीं; उलट त्या हिम्मतबहाद्दर राजपुत्राच्या मुखांतून असे उद्गार आले कीं, " फार दुःखाची गोष्ट कीं मी आगबोटीवर नव्हतों; असतों तर त्या विपद्ग्रस्त लोकांस मदत केल्याचें तरी श्रेय मला आलें असतें. मग बेहेत्तर आहे त्यांच्यासाठीं माझा प्राण गेला असता तर. " याचें नांव मनुष्य! प्रतापसिंह तर प्रतापसिंह खराच !

## ग्यालेटा शहरांतील मनोरा.

खुद्द महाराजांनींच अशा प्रकारच्या वृत्तीचें अवलंबन केल्यावर बरोबरच्या मंडळीचीही उदासीनता नाहींशी झाली व सर्व आपआपल्या भोजनादि कृत्यांत व्यापृत झाले. तदनंतर आह्मी ग्यालेटा शहरांतील जिनोईज लोकांनीं बांधलेला पुरातन मनोरा पहावयास गेलों. हा मनोरा बाहेरून फार उंच, भव्य, सफाईदार दिसतो. परंतु आंत गेलें ह्मणजे बांधकाम फार जुनें झाल्याकारणानें मोडकळीस आल्यासारखें दिसतें. मनोऱ्याचा मध्यभाग खालपासून वरपर्यंत पोकळ ठेविलेला असून बाजूनें भिंतींत पायऱ्या केलेल्या आहेत, व प्रकाश पडण्याकरितां मधून मधून लहान झरोके ठेविले आहेत. पायऱ्या साफ नसून उंचसखल व झिजलेल्या आहेत. शिखराजवळ एकदोन हात रुंदीची अलिंदभूमिका काढलेली आहे; परंतु तिची जमीन कडेला उतरती असल्यामुळें पहाणारास तेथें स्वस्थपणें फिरतां येत नाहीं. या ठिकाणाहून सर्व कान्स्टांटिनोपल शहराचा देखावा फारच मनोरम दिसतो. कनक-

शृंगाचें पात्र बरेंच लांबवर दृग्गोचर होऊन त्याच्या वरच्या मार्गीं ठेविलेलीं लढाऊ जहाजें दृष्टीस पडतात. कनकशृंगावरी-ल पूल व त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या माणसांची गर्दी, प-लीकडे इस्तंबोलची वीस्तीर्ण वस्ती, एका बाजूला स्कुटारी व आशियाचा किनारा, एका दिशेस बास्पोरस, एकीकडे शुभ्रप्रा-सादमंडित असें पेरा शहर—या सर्वांच्या अवलोकनानें चित्तवृ-त्ति चंचल होते; दृग्विषयाची शोभा अवर्णनीय वाटून मौन धरावें लागतें; व असा असाधारण नयनोत्सव वारंवार अनुभ-वावयास मिळावयाचा नाहीं असें वाटून त्याच आनंदांत गुंग होऊन कांहीं वेळ निश्चल उभें राहवेंसें वाटतें.

या मनोऱ्याचा मूळ उद्देश काय असेल तो असो; परंतु सांप्रतकालीं त्याचा उपयोग अग्निप्रलयसूचनार्थ करितात हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां तत्संबंधीं सर्व सामुग्री येथें दृष्टीस प-डली. एक मोठी घंटा व कांहीं प्रकारचे दिवे व पहारेकरी लोक हे सर्व येथें होते.

## स्कुटारी शहरांतील 'ओरडणाऱ्या दरवे-शां' चा मठ.

हा मनोरा पाहून आह्मी परत घरीं आलों व माध्यन्दि-नोपहार करून स्कुटारीशहरांत जाण्याकरितां बाहेर पडलों. वर सांगितलेंच आहे कीं स्कुटारी आशियाच्या किनाऱ्यावर आहे. तेव्हां बास्फोरसची सामुद्रधुनी वलांडून पलीकडे जावें लागतें, म्हणून आह्मी बंदरावर गेलों. तेथें आमच्यासाठीं एक. नौका तयार होती. तींत बसून सुमार अर्ध्या तासांत आह्मी स्कुटारी-च्या किनाऱ्याला लागलों. तेथें उतरल्यावर एक गाडी करून

आह्मी शहरांतून चाललों. शहराचे रस्ते फारच वाईट होते. इस्तंबोलापेक्षांही जास्त वाईट म्हटलें तरी चालेल. फरसबंदी फारच अस्ताव्यस्त असून स्वच्छपणा कसा तो मुळींच दृष्टीस पडला नाहीं. या स्थलीं एका प्रकारच्या दरवेशांचा मठ आहे. तो पहाण्याकरितां मुद्दाम आह्मी गेलों होतों. या मठाच्या इमारतींत कांहीं प्रेक्षणीय होतें असें नाहीं. परंतु उपासना करण्याची तऱ्हा कांहीं विलक्षण आहे युरोपियन लोकांनीं यांचें "हाऊलिंग दर्विशेस" ह्मणजे 'ओरडणारे दरवेशी' असें नांव ठेविलें आहे, व कान्स्टान्टिनोपल शहरांतील प्रेक्षणीय वस्तूंमध्यें ह्या मठाची गणना केली जाते. ही इमारत फार मोठी नसून अगदीं साधी आहे. दारांतून आंत गेलें ह्मणजे एक लहान प्रांगणभूमिका आहे. नंतर एक पडवी लागते, तिला एक दार आहे. या दारांतून आंत गेलें म्हणजे एक मोठा दिवाणखाना लागतो. प्रेक्षकांच्या उजव्या बाजूस एक भिंतींत कोरलेली कमान आहे. तीवर कांहीं आरबी लिपींत सोनेरी अक्षरांनीं लिहिलेले लेख सोनेरी चौकटींत बसवून टांगून ठेविलेले आहेत, व खिळ्यांवर पिंवळ्या मण्यांच्या माळा आहेत. हें स्थान फार पवित्र मानलेलें आहे. येथून कांहीं अंतरावर मठाधिपतीचें आसन आहे. ह्या पुरुषाचा वर्ण गौर असून कांतिमान् होता. मुद्रा शांत असून समाधानसूचक होती; परंतु असें दिसे कीं ज्या उपासनारूपकार्यांत तो व्यग्र होता त्या कार्याच्या गौरवाचा त्याला फार अभिमान असावा. त्याच्या डोक्याला एक बसकी टोपी असून तिच्या भोंवताली एक बारीक वस्त्र गुंडाळलेलें होतें. अंगांत पायघोळ अंगरखा असून हातांत जपमाळ होती. याच्या

सम्मुख व बाजूला उपासक मंडळी बसली होती व एकदोन शिष्य बाजूला उभे होते. एकजण दरवाज्यांत उभा होता. दिवाणखान्याच्या मध्यभागीं ही मंडळी बसली होती. जमिनीवर जाजम आंथरलें होतें. दिवाणखान्याच्या तिन्ही बाजूंनीं थोडी जागा सोडून एक लहान कठडा होता. जेवढ्या मंडळींची उपासना करण्याची खुपी होती तेवढी कठड्याच्या आंत बसली होती. बाकीची कठड्याच्या बाहेर बसली होती. युरोपियन वगैरे परधर्मी लोकांच्या सोयीकरितां वर लहान लहान अलिंदभूमिका काढिल्या आहेत. तेथें बसण्याकरितां बांकें व खुर्च्या आहेत. आह्मी गेलों होतों त्या दिवशीं युरोपियन स्त्रीपुरुषांची बरीच गर्दी जमली होती; व उपासनाक्रम पाहून उपहास करणारीही कांहीं मंडळी आढळली. मला असें नवल वाटलें कीं, ही महम्मदीय धर्मानुयायी मंडळी आपल्या उपासकांचा उपहास करणाऱ्या मंडळीस मठांत कां प्रवेश करूं देते? मुसलमानांसारख्या धर्माग्रही व धर्मोन्मत्त लोकांनीं असा प्रकार चालूं द्यावा, हें त्यांच्या बाण्याशीं विसंवादक दिसलें. प्रत्येक धर्माचे निरनिराळे आचार आहेत. त्यांसंबंधानें कोणी कोणास हंसण्याचें कारण नाहीं. असो; उपासना करणाऱ्या बहुतेकांच्या डोक्याला पांढऱ्या व घट्ट बसणाऱ्या अशा टोप्या होत्या. आह्मी गेल्यावर कांहीं उपासक आंत आले. ते प्रथम मठाधिपतीसमोर उभे राहिले व मोठ्या नम्रपणानें अभिवंदन करून बाजूला झाले, व आपला पोषाक बदलून वर सांगितलेल्या प्रकारच्या टोप्या घालून त्या मंडळींत मिसळले. ह्या सर्व कृत्याला उपासना न ह्मणतां कुराणघोष म्हटलें असतां जास्त शोभेल. आरंभीं मठाधिपति मौनधारण करून व नयन

ला निमंत्रण होतें. कांहीं विशिष्टधर्मकृत्याकरितां पैसे जमविण्याच्या हेतूनें एक प्रकारचा चित्रदर्शनाचा प्रयोग (टॉब्लोज ) करून दाखविण्याचा तेथील आंग्ल समाजानें बेत केला होता; व त्यामध्यें प्रतिनिधि साहेबांची पत्नी लेडी व्हाईट यांनीं आधिपत्य स्वीकारलें होतें. तेव्हां अर्थातूच सर्व व्यवस्था प्रतिनिधींच्या हाताखालील सर्व मंडळीकडे होती. आंग्लसमाजांत मिसळण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग. तेव्हां कोणत्याही तऱ्हेनें आपल्याकडे ग्राम्यतेचा दोष न यावा अशी खबरदारी घेण्याविषयीं मी फार उत्सुक होतों. अत्यावश्यक गोष्ट कोणती तर श्मश्रू करावयाची; व तीही सफाईदार झाली पाहिजे. नाहीं तर नवी केली असली तरी एक दिवसाची वाढलेली असा भास होऊन शिष्टाचारसंपन्न मंडळांतून गरीबाला बहिष्कृति प्राप्त व्हावयाची ! मी तर पडलों नवशिखा. बाहेर जाऊन यावयास तर सवड नाहीं. प्रकाशमय दिवस जाऊन तमोमय रात्रीचा अंमल बसत चालला होता. तेव्हां तिकडूनही दिसावयाची पंचाईत. अशा संकटसमयीं आमच्या बरोबरच्या एका गृहस्थानें मदत केली नसती तर माझे फार हाल झाले असते ! असो. सर्व तयारी करून आम्ही निमन्त्रणस्थानीं जाऊन पोहोंचलों. दाराशीं रक्तवस्त्रपरिधान केलेले परिचारकगण होतेच. त्यांनीं आंत जाण्याचा रस्ता दाखविला. थोडा वेळ चालून गेल्यावर एक विस्तीर्ण सोपानपरंपरा लागली. तिच्यावर रक्तपटाचें आच्छादन होतें. दीपसमूह बराच होता; परंतु प्रकाश उज्ज्वल नसून बराच मंद होता. दिवे बहुतेक मेणबत्त्यांचे होते. मुंबईसारख्या ठिकाणीं साधारण समारंभांतही धुराचे व विजेचे दिवे पहा-

ण्याची संवय लागल्यामुळें हे दिवे फारच मंद भासले. जिन्याच्या शेवटल्या पायरीवर सर वुइलियम व्हाईट साहेब उभे होते. त्यांनीं आमचें स्वागत करून प्रयोगमंडप दाखविण्याकरितां आमच्याबरोबर एक मनुष्य दिला. तेथें जाऊन आह्मी निर्दिष्ट स्थानीं बसलों. आह्मी दिवाणखान्यांत प्रवेश केल्याबरोबर सर्व जमलेल्या प्रेक्षकांचे कटाक्ष, जणुं काय इंद्रजालाच्या प्रभावानेंच कीं काय, आमच्याकडे वेधले. अगोदरच हिंदुस्थानचे राजे आल्याची गांवांत वार्ता पसरली होती, व आपल्या आगमनानें ह्या समारंभाचा ते आदर करणार असेंही कळलें होतें. तेव्हां बहुतेक मंडळीचे डोळे आमच्याकडे लागलेच होते. विशेषत: पुरुषांपेक्षां स्त्रीजनाची उत्कंठा फारच होती, असें त्यांच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसे; व आम्ही आंत गेल्यावर ज्यांच्याकडे आमची पाठ झाली त्यांची धांदल तर विचारूंच नका. नाटक संपून परत जातांना केव्हां आम्ही नयनगोचर होऊं अशी त्यांची स्थिति झाली होती. विचाऱ्यांना तें नाटक तरी गोड लागलें असेल कीं नाहीं कोण जाणें! आमची स्थिति म्हणाल तर दुसऱ्याच प्रकारची झाली होती. दिवाणखाना जरी बराच मोठा होता, तरी निमंत्रित मंडळी फार असल्या कारणानें जेवढ्या मावतील तेवढ्या खुरच्या एकीशीं एक खेंचून मांडण्याचा यत्न केला होता. यामुळें

पश्यामि तामित इतः पुरतश्च पश्चात्
अन्तर्बहिः परित एव विवर्तमानाम् !

अशी स्थिति होऊन गेली. पहावें तिकडे " उब्दुद्धमुग्धकनकाब्जनिभ " अशीं वस्त्रें धारण करणाऱ्या अप्सरा दृष्टीस पडूं लागल्या. त्यांतून त्यांचा तो तत्कालीन पोषाक ( Even-

ing dress ) मग काय विचारतां ? हा पोपाक कसा म्हणाल तर शिरोभाग अगदीं अनावृत असून केशकलापांत क्वचित् हिऱ्याचें किंवा सोन्याचें फूल चमकत असावयाचें. कंठप्रदेश अगदीं खुला असून त्याच्या खालच्या प्रांतीं मोत्याचें दहा-पांच सरांचें पेंडें असावयाचें. त्याचप्रमाणें कानाच्या खालच्या पाळींत व हातांत तुरळक दागिने. मानेखालीं सभोंवार अर्धपाऊणपीत शरीराचा भाग अगदीं नग्न असावयाचा. स्तनमंडलें बहुतेक दृग्गोचर रहावयाचीं. केवळ चूचुक मात्र आच्छादित असावयाचे. त्याचप्रमाणें कोपरापुढील हात व अर्धे दंड उघडे रहावयाचे. अर्ध्या पाठीच्या खालीं व अर्ध्या छातीच्या खालीं झगा असावयाचा; पण त्याची अशी मौज कीं तो केवळ पायघोळ नव्हे तर पायांच्या टांचेपर्यंत पुरून हात दोन हात जमिनीवर लोळावयाचा. कदाचित् वर जी कापडांत कसर काढिली ती भरून काढण्यासाठीं तर नसेल असा प्रकार घडला ? अथवा कदाचित् कापड कमी पुरावें अशा दृष्टीनें शरीराचा उपरितनभाग अनाच्छादित ठेवण्याचा आचार पाडला असा कोणी आक्षेप घेतला तर त्याचें निवारण करण्यास वस्त्रवैपुल्यरूपानें हा जबाबच तर नसेलना ? कांहीं असो, हा सर्व प्रकार पाहून माझ्या मनांत तर विसंवादक कल्पनांचें मोठें युद्ध उभें राहिलें. अहो, आह्मी आपले हातपाय उघडे टाकितों तर आह्मांला रानटी ह्मणतात, तर असा प्रकार रानटीपणाच्या कितव्या प्रतींत जावा ? आमचा देश तरी उष्ण आहे, त्यामुळें सूक्ष्म वस्त्रांचा व कित्येक प्रसंगीं शरीराच्या कांहीं भागासंबंधानें वस्त्राभावाचा प्रचार आमच्यांत पडला आहे. परंतु शीतप्रदेशांत अशा प्रकारच्या संप्रदायाचें बंधन इतकें बळकट कसें झालें

याचा विचार पडला. मी कोठें आहें व काय पहातों आहें या-
चा फिरून विचार केला, व जेव्हां मनाची अशी खात्री झाली
कीं, युरोपखंडांत कान्स्टांटिनोपल नगराच्या उपांतप्रदेशीं आं-
ग्लसमाजविभूषित अशा स्थलीं मी आहें तेव्हां या विसंवादक
कल्पनांचा उलगडा करण्याच्या कामीं मीं लागलों; व भवति
न भवति करितां करितां असें निर्णीत केलें कीं, हा सर्व संप्र-
दायदेवताचा प्रभाव! ह्याच्या पुढें मी मी ह्मणविणारीं व वै-
भवाच्या व सुधारणेच्या उच्चतम शिखरास जाऊन पोहोंच-
लेलींही राष्ट्रें मान वांकवितात!

प्रयोग बराच वठला. परंतु एक चित्रपट झाल्यापासून दुस-
रा दाखवीत तोंपर्यंत बराच अवकाश लागे त्यामुळें प्रेक्षकां-
च्या चित्तैकाग्रतेचा भंग होऊन जितकी मजा वाटावी तित-
की वाटली नाहीं. हा जो मध्यंतरीं अवकाश लागे त्या अव-
काशांत पियानो वगैरे वाजवून जनमनोरंजनाचा यत्न सुरू
असे, परंतु त्याकडे मंडळींचें फारसें लक्ष नव्हतें व माझ्या अ-
संस्कृत कर्णेंद्रियास ते वाद्याचे स्वर फारसे मधुरही लागले
नाहींत. ह्या प्रयोगासंबंधी प्रथम आमचा असा समज झाला
होता कीं, कांहीं पटांवर विशिष्ट इतिहासप्रसिद्ध पात्रें आलि-
खित करून तीं प्रेक्षकांस दाखवावयाचीं. परंतु जेव्हां प्रयोग
सुरू झाला तेव्हां आमची समजूत खोटी ठरली व आह्मांस
वाटलें कीं शुभ्रमृत्तिकेचे पुतळे बनवून आम्हांपुढें ठेविले आ-
हेत. कारण कीं रंगभूमीवर आलेलीं सर्व पात्रें निश्चल असून
अचेतन अशीं भासत. परंतु एका समयीं एका स्त्रीच्या ओष्टाव-
र किंचित् स्मित नजरेस पडलें त्याबरोबर टाळ्यांचा एकच
गजर झाला; तेव्हां तिला जास्तच हसूं आलें. त्यावरून अशी

कल्पना कायम ठरली कीं हीं सर्व पात्रें जिवंत मनुष्यें असून अचेतनत्वाचा भाव करून दाखवीत आहेत. पात्रांचें बोलणें वगैरे कांहीं नसावयाचें ! विद्युत्प्रकाशाच्या योगानें पात्रांच्या तोंडांवर अशा प्रकारचें तेज पडे कीं त्यामुळें शोभा अधिक येऊन प्रेक्षकजनांवर विशेष ठसा उमटे. अशा प्रकारच्या प्रयोगास तालीम चांगलीच पाहिजे. त्या वेळेपुरतें पात्राचें चेतनत्वाचें भान अगदीं नाहींसें झालें पाहिजे. नाहीं तर वर निर्दिष्ट केलेल्या स्त्रीप्रमाणें त्रेधा उडावयाची. या प्रयोगांत एकदोन प्रवेश माझ्या परिचयाचे होते. एक ' मर्चंट आफ व्हेनिस ' मधील न्यायसभेचा व दुसरा अथेल्लो व डेस्डिमोना यांचा हे दोन्हीही फारच सुंदर झाले.

प्रयोग समाप्त झाल्यावर मंडळी उठली. त्याही वेळेस आमच्याकडे सव मंडळीचे डोळे लागले. कित्येक व्यक्तींचें कुतूहल पराकाष्ठेप्रत पोहचून त्या भांबावल्यासारख्या दिसूं लागल्या. आह्मास असें वाटलें कीं जर आह्मांस एका दिवाणखान्यांत ठेवून पाहण्यासाठीं प्रेक्षकजनांवर कांहीं कर बसविला असता तर बरीच मिळकत होऊन येण्याजाण्याचा खर्च बाहेर पडला असता ! असो.

दिवाणखान्यांतून बाहेर पडतांना डाव्या हाताला एका मोठ्या दालनांत नानाप्रकारच्या खाद्य व पेय वस्तूंची सामुग्री ठेविलेली होती तिकडे सर्व अभ्यागत जनांचा ओघ लोटला. हें दालन जरी मोठें होतें तरी ज्या कठड्याशीं ह्या जिनसा प्राप्त व्हावयाच्या तो एका बाजूला असल्या कारणानें एकसमयावच्छेदेंकरून सर्व जनांस व्यवस्थितपणें अपेक्षित वस्तु प्राप्त होणें अशक्य होतें हें जरी खरें, तथापि व्यवस्था करण्याचें

मनांत आणिलें असतें तर झालें नसतें असें नाहीं. परंतु त्यांची चालच तशी, मग पुढें काय ह्मणावयाचें ! ज्याचा लाग साधेल त्यानें वाटेल त्यावर हात मारावा व प्रेयसीसमवेत असल्यास धक्काबुक्की करून पुढें जाऊन तिची अपेक्षा पूर्ण करावी. आह्मांला कोणत्याही गोष्टीची अपेक्षा नव्हती; तथापि समक्ष यजमान आह्मांला त्या स्थलीं बोलावून घेऊन गेले व जर्मनी, फ्रान्स, रशिया वगैरे राष्ट्रांच्या प्रतिनिधींशीं आमची ओळख करून देऊन नंतर त्यांनीं कांहीं तरी सेवन करण्याविषयीं विनंति केली. आह्मीं कांहीं नको ह्मटलें तरी निदान चहा तरी घ्यावा अशी इच्छा प्रदर्शित करून एका गृहस्थास आमची तजवीज लावण्यास सांगून आपण कार्यांतरव्यग्र झाले. त्या गृहस्थानें मोठ्या प्रयासानें एक दोन पेले चहा आणून एका बाजूस ठेविला व आह्मांस सांगण्याकरितां तो येत होता, इतक्यांत दुसऱ्या एकानें तिकडे चहाचें काम केलें. तेव्हां तो फार खजिल झाला. नंतर फिरून तसदी न घेण्याबद्दल आह्मीं त्यास आग्रह केला. हें सर्व सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, त्या लोकांच्या चालीरीतींचें स्वरूप थोडें तरी दाखवावें. पाश्चात्य रीती सर्वच चांगल्या असें ह्मणणारे कांहीं लाल आहेत. ते अशा प्रकारांचेंही त्यांच्या मतें समर्पक असें पुष्टीकरण करतील तर करोत. परंतु माझ्या दृष्टीला ह्या प्रकारांत पूर्ण असभ्यता व अव्यवस्था भासली. मी इतकें प्रांजळपणानें कबूल करितों कीं अशा प्रकारचे स्नेही, आप्त व बंधुजन यांस एकत्र जमविण्याचे प्रसंग आणण्याची रीति फार प्रशस्य आहे; व अशा प्रसंगीं यजमान व यजमानीण आपल्याकडून कोणतेंही कमी न पडूं देण्याविषयीं यत्नही करतात. परंतु निमंत्रित जनांची यापेक्षां विशेष सभ्य-

पणाची व कनी गैरसोईची व्यवस्था त्यांस कां सुचत नाहीं ? सर्व गोष्टींत जर पाश्चात्य समाज पुढें सरसावत आहे तर अशा महत्वाच्या गोष्टींसंबंधीं त्यांचें कसें दुर्लक्ष होतें ? असो. कांहीं वेळ वर निर्दिष्ट केलेला चमत्कार पहात व मनांत आश्चर्य करीत उभा राहिलों व सुमारें दीड वाजण्याचे सुमारास यजमानीण बाईची रजा घेऊन घरीं गेलों.

## टर्कींचे सुलतान.

दुसऱ्या दिवशीं ह्मणजे तारीख २२ रोजीं शुक्रवार असल्याकारणानें सुलतानाची स्वारी पहाण्यास जावयाचें होतें. तुर्की राज्यांत हल्लीं दोन राजकीय पक्ष आहेत. हल्लीं जे सुलतान गादीवर आहेत त्यांनीं पूर्वीच्या सुलतानास पदच्युत करून गादी मिळविली आहे, तेव्हां पूर्वीच्या सुलतानाच्या पक्षाचे जे लोक आहेत त्यांना अर्थात्‌च हल्लींचे सुलतान प्रिय नाहींत. विरुद्धपक्षाचे लोक नेहमी तंटेबखेडे माजविण्यांत व्यग्र असतात, व कितीएक प्रसंगीं सुलतानाचा जीव घेण्याचाही यत्न त्यांनीं केला होता; परंतु तो सफल झाला नाहीं, व ह्मणूनच हल्लींचे सुलतान कधींच आपल्या महालाबाहेर पडत नाहींत. बास्पोरस सामुद्रधुनीच्या तीरप्रांतीं एका क्षुद्र पर्वताच्या शिखरावर रम्य अशा उद्यानभूमिकांनीं परिवेष्टित व भव्य व नानाभोगानुकूल अशा मन्दिरांत निवास करून अंतःपुरपरिवारसमवेत हे राजश्री कालक्रमण करीत असतात. मुसलमानी धर्माप्रमाणें शुक्रवारचा दिवस फार पवित्र मानला जातो. तेव्हां त्या दिवशीं मात्र ह्यांची स्वारी कोणत्या तरी उपासनामन्दिरांत जात असते. परंतु कोणत्या मन्दिरांत स्वारी जावयाची हें स्वारी निघण्याच्या

पुर्वी एक कलाक, फार तर दोन कलाक मात्र कळावयाचें. कधीं कधीं राजमहालाशेजारींच एक लहानशी मशिद आहे तेथेंच स्वारी जाते. असें झालें ह्मणजे प्रतिपच्चन्द्राप्रमाणें आपल्या नृपतीची मुखश्री पहाण्यास उत्सुक असलेल्या प्रजाजनांची निराशा फार होते. अशा प्रकारची निराशा आमची होऊं नये ह्मणून ब्रिटिश प्रतिनिधीच्या मार्फत राजवाड्याजवळच जी सर्व प्रतिनिधि मंडळीचीं कार्यगृहें आहेत त्यांत जागा मिळविण्याची तजवीज केली होती. सुमारें साडे दहा वाजतां आह्मी घरून निघालों. शहराच्या बाहेर पडल्यावर रस्ता बराच साफ लागला व जसजसे राजवाड्याजवळ आलों तसतशी रस्ते साफ करण्याची व त्यांवर पाणी शिंपण्याची बरीच धामधूम दृष्टीस पडली. लोकांचे थव्याच्या थवे राजवाड्याकडे चालले होते. अधिकारीजन व्यवस्था ठेवण्यांत मग्न असून महत्वसूचक मुद्रेनें गरीबगुरिब लोकांची पिछेहाट करण्यांत प्रतिष्ठा मानीत होते. जागजागीं घोडेस्वार उभे राहिले होते, व त्यांचे मस्त घोडे आपल्या फुरफुरण्यानें व खिंकाळण्यानें जणूं काय आपली धन्याला पाहण्याची इच्छा पराकाष्ठेप्रत पोहोंचली आहे असें दाखवीत होते. घोडे फार धिप्पाड नव्हते, तरी मजबूत बांध्याचे असून सुंदर होते. जातां जातां उजव्या हाताला जनानखान्याची हद्द लागली. त्याच्या दरवाज्यावर व प्राकारभित्तीच्या बाजूनें कृष्णवर्ण अशा वर्षवराचा पहारा होता. या खात्यांत मर्द लोकांचा प्रवेश व्हावयाचा नाहीं. नंतर थोड्याच अवकाशानें आह्मी उद्दिष्टस्थानीं पोहोंचलों. तेथें गेल्यावर आह्मांस मोठ्या आदरानें एका खोलींत नेलें व खिडकीशीं खुरच्या मांडून त्यांवर आह्मांस बसावयास सांगितलें. या खिडकींतून आह्मांस राज-

वाडा व त्याजवळची मशीद चांगली दिसत होती. सुमार अकरा वाजल्यावर पायदळ व घोडेस्वार यांच्या निरनिराळ्या वर्गांच्या तुकड्या जमा होऊं लागल्या व राजवाड्यांतून येणाऱ्या रस्त्याच्या दुतर्फा रांगेनें उभ्या राहूं लागल्या. कांहीं मशिदीच्या खालच्या बाजूसही गेल्या. सुमारें बारा वाजतां राजवाड्याजवळील मशिदीचीं द्वारें उघडलीं त्यावरून असें सर्वांस समजलें कीं महाराजांचा अनुग्रह या स्थलावर आहे. असें समजण्याबरोबर अंतरावर जें पायदळ व घोडेस्वार होते ते जवळ आले व पूर्वीं असलेल्या लोकांत मिसळले. दूरच्या लोकांचा या समयीं किती हिरमोड झाला असेल बरें! प्रजाजनाला आपल्या नृपतीस पहाण्याची उत्कंठा किती असते याचें वर्णन कवींनीं अनेक प्रसंगीं केलेंच आहे, व हल्लीं जरी आपल्या हिंदुस्थानांत खऱ्या अर्थाचें स्वराज्य नाहीं तरी जीं कांहीं चार मांडलिक संस्थानें आहेत त्यांतील प्रजाजनाची यासंबंधानें वृत्ति कशी असते हें ज्यास माहित आहे त्यास युरोपासारख्या परकीय खंडांत एकच स्वतंत्र असें राहिलेलें जें आशियाटिक लोकांचें राज्य त्यांतील लोकांचा आपल्या अधिपतीबद्दल किती अभिमान असावा व त्याच्या दर्शनाची किती उत्कट इच्छा असावी याची कल्पना करितां येईल. असो; याप्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यावर राजवाड्याकडून दोन ब्रुम गाड्या दोन दोन घोड्यांच्या आल्या व मशिदीकडे गेल्या. गाड्याचीं सर्व द्वारें बंद होतीं. त्यावरून यांत जनानखान्यांतील मंडळी असावी अशी कल्पना झाली. नंतर कांहीं वेळानें सुलतानाची गाडी आली. गाडीच्या पुढें घोडेस्वार धांवत होते. यांच्या गाडीलाही दोन घोडे असून हे स्वत: गाडी हां-

कीत होते. यांचा पोषाक साधा युरोपियन तऱ्हेचा काळा अ-
सून डोक्याला मात्र तुर्की लाल टोपी होती. यांचें वय चाळि-
शीच्यावर दिसत होतें. मुद्रा शांत असून चेहरा काळ्या व लांब
दाढीमुळें भव्य दिसत होता. परंतु मुखश्रीवर चिन्तेचा अम्मल
दिसत होता. सर्व लोकांचे मुजरे घेत घेत स्वारी मशिदींत
गेली. तेथें उपासनाकृत्य समाप्त झाल्यावर एका खिडकींत
महाराज विराजमान झाले; तेव्हां चालीप्रमाणें जमलेल्या सै-
न्याच्या निरीक्षणास आरंभ झाला. सैन्य सुमारें सहा हजार
होतें. सुलतानांच्या खास तैनातीचे तेवढेच लोक दर शुक्रवा-
रीं जमतात. बाकी सैन्य साहेबांच्या पहाण्यांत केव्हां येत
असेल कोण जाणें ! सैन्याचा एकेक भाग खिडकीच्या खालून
जाऊन बाजूला होई. सैन्यांत तीन प्रकारचे लोक होते-तुर्क,
आरब व आर्मिनियन. बंदुकी, तरवारी, भाले वगैरे आयुधां-
शिवाय कुऱ्हाडीवजा एक प्रकारचीं आयुधें हातांत घेणारा अ-
सा एक सैनिक वर्ग होता. लोक सदृढ बांध्याचे असून फार
राकट दिसत होते. हा सर्व विधि आटपल्यावर सुलतान आ-
ल्या वाटेनें परत महालांत गेले व सर्व मंडळी आपआपल्या
गृहीं जाण्याच्या व्यवस्थेंत गुंतली.

हा दिवस मोठा सणाचा असतो. ज्याप्रमाणें ख्रिस्ती लोकां-
चा आदित्यवार त्याप्रमाणें या लोकांचा शुक्रवार. या दिवशीं
लोकांचें सर्व कामकाज बंद रहावयाचें व बाजारही बंद अ-
सावयाचा. ज्या नदीला मुसाशीं ' कनकशृंग ' ही संज्ञा प्रा-
प्त झाली आहे त्याच नदीच्या उगमाजवळ जाऊन तेथें ति-
च्या मधुर जलाचें सेवन करून आहारविहारांत हा दिवस
घालविण्याची श्रीमंत लोकांची चाल आहे. तेव्हां आमचे महाराज

या दिवशीं दोन प्रहरीं कांहीं मंडळीबरोबर तिकडे गेले. माझ्या मनांत 'हम्माम' (टर्किश बाथ) पहावयाचा होता ह्मणून मी मागें राहिलों.

## हम्माम अगर स्नानगृहें.

कान्स्टान्टिनोपल शहरांत एकंदर १३० स्नानगृहें आहेत. यांपैकीं कांहीं संगमरवरी दगडांचीं बांधलेलीं आहेत. परंतु एकंदरीनें या गृहांची बाह्य शोभा फारशी असते असें नाहीं. या सर्व गृहांत ज्याला वाटेल त्याला जाण्याची मोकळीक असते. परंतु आठवड्यांतून कांहीं दिवस स्त्रियांकरितां नेमिलेले असतात. त्या दिवशीं मात्र पुरुषांस येण्याची बंदी असते.

सुमार तीन प्रहर दिवस उलटल्यावर मी स्नानगृहास जाण्यास निघालों. बरोबर मार्गदर्शक होताच. मोठ्या रस्त्यानें जाऊन एका बोळांत वळलों व एका घरांत शिरलों. आंत प्रवेश केल्यानंतर जवळच एकदोन कारभारी होते त्यांच्याशीं आमच्या मार्ग दर्शकाचें कांहीं बोलणें होऊन त्यांनीं माडीवरची एक खोली दाखविण्याकरितां आमच्याबरोबर एक मुलगा दिला. हे सर्व लोक तुर्की होते. वर्ण गोरा, केंस पिंगट, शरीर सदृढ व मुद्रा कांहींची बावळी व कांहींची शाठ्यसूचक. हे लोक माझ्याकडे पाहून हंसत व आपल्या आपल्यामध्यें एकमेकाला खुणा करीत. असें पाहून मला थोडी धास्ती वाटली. न जाणों कदाचित् माझा वाटाड्या यांस सामील झाला व मी हिंदुस्थानच्या राजाबरोबर असल्यामुळें सधन असलोंच पाहिजे अशी कल्पना करून या सर्वांनीं मिळून मला धोपटण्याचा यत्न केला तर काय घ्या! त्यांतून यांची भाषा मला समजेना व माझी भाषा त्यांना समजेना. अशा

प्रकारची माझ्या मनाची स्थिति झाली तथापि ज्या कामाक-
रितां आलों तें काम झाल्याशिवाय परत जावयाचें नाहीं असा
निश्चय केला. माडीवर गेल्यावर एक स्वतंत्र खोली आह्मांस
दाखविली होती तेथें जाऊन कपडे वगैरे काढले. खोलींत
दोन तीन पलंग असून त्यांवर बिछाने आंथरले होते. भिंतीला
ठिकठिकाणीं तसबिरी टांगिल्या होत्या. परंतु एकंदर ठेवण
नीटनेटकी नसून अव्यवस्थासूचक होती. हजाम बोलावून
श्मश्रू वगैरे करवून मी स्नानास सिद्ध झालों. परंतु एकटा खालीं
जाण्याची माझी छाती होईना ह्मणून बरोबरच्या माणसास-
ही स्नान करण्याचा मीं आग्रह केला. सर्व कपडे काढून ठेवून
आह्मी एक पांच हात लांबीचा पंचा नेसलों व खालीं गेलों.
हें घर चौसोपी होतें. दोन बाजूंच्या सोप्यांवर माड्या होत्या.
एक बाजूचा सोपा रिकामाच होता व चवथ्या सोप्याच्या
बाजूस सर्व स्नानाची व्यवस्था होती. ह्या सोप्याच्या दाराशीं
आह्मांस पायांत खडावा घालावयास सांगितलें; व मला आंत
नेण्याकरितां दोन नोकरांनीं माझे दोन हात धरिले. या खडा-
वा फार उंच व आबडधोबड होत्या त्यामुळें चालण्यास बरीच
पंचाईत पडे. या सोप्याचें दार नेहमीं बंद असावयाचें. दार
उघडून आह्मी आंत गेलों व मागें दार लावून घेतलें. आमच्या
उजव्या व डाव्या बाजूला दोन विस्तीर्ण ओटे होते. त्यांवर
ठिकठिकाणीं स्नात जन श्रमपरिहारार्थ निद्रासुख अनुभवीत
होते. ज्या दालनांत आह्मी होतों तें सुमार २५ फूट लांब व
१५ फूट रुंद होतें. हवा कुंद असून उष्ण होती. प्रकाश आंत
येण्याकरितां लहान लहान झरोके होते. त्यांत कांचा बसवि-
ल्या होत्या. हा सर्व प्रकार सह्य असता, परंतु हवा दुर्गन्धदूषित

असल्यामुळें माझें डोकें दुखूं लागलें. अंगाला तर घाम आलाच होता. या सर्व स्थितीवरून सुखाची तर आशा नष्ट झालीच, परंतु त्रास तरी किती होतो हें पहाणें राहिलें होतें. या दालनाच्या आंत दुसरें मोठें दालन होतें त्यांत आह्मी प्रवेश केला. हें वर्तुलाकार असून याची जमीन व अर्ध्या भिंती संगमरवरी दगडाच्या होत्या. वरच्या बाजूस काचमय छत होतें त्यांतून विपुल प्रकाश येत असे. स्वच्छ हवा येण्याची मात्र बिलकूल सोय नव्हती. सर्व वातावरण बाष्पमय दिसत होतें. भिंतीला ठिकठिकाणीं जलोद्गारयंत्रें असून त्यांतून येणाऱ्या जलाचा संचय करण्याकरितां दगडी कुंड्या ठेविल्या होत्या. कांहीं कांहीं स्थलीं आडोशासाठीं लहान लहान खोल्या काढलेल्या होत्या; परंतु त्यांस तात्कालिक विविक्तता प्राप्त होण्याचीं द्वारादि साधनें मुळींच नव्हतीं. मिळून कोणेंही स्नान केलें तरी दुसऱ्या लोकांसमक्ष करणें भाग होतें. जमिनीच्या खालीं उष्णजलाचा सांठा असावा असें वाटलें. कारण कीं आंत गेल्यावर जेव्हां मोठ्या दालनाच्या एका प्रान्तीं मला जमिनीवर निजविलें तेव्हां जमीन गार न लागतां कोंचट लागली. निजविल्यानंतर एक नोकर माझ्या उशाशीं व एक पायगतीं बसला; व दोघांनीं सर्व गात्रांचें संवाहन करण्यास आरंभ केला. इतक्यांत एक नोकर उठून गेला. राहिलेला नोकर आपलें काम करीतच होता. अगोदर उताणा निजवून मग मला उपडा केला व पाठ रगडून नंतर मानेपासून मांड्यांपर्यंत माझ्या पाठीवरून तो दोन वेळ चालला. नंतर मला फिरून उताणा केला व हातांत एक खरखरीत कापडाची पिशवी घालून तिच्या योगानें माझें सर्व अंग चोळूं लागला. घा-

मानें अंग ओलें झालेंच होतें त्यामुळें सर्व अंगाचा मळ निघाला. हा विधि आटपल्यावर मला उठावयास सांगून वर निर्दिष्ट केलेल्या एका आडोशाच्या खोलींत मला घेऊन गेला. तेथें एका कुंडीत नळाचें पाणी काढून एका वाटीनें त्यानें माझ्या अंगावर घातलें. नंतर एका वाडग्यांत कांहीं पदार्थ चोळून त्यानें रगड फेंस तयार केला व नखशिखांत माझ्या अंगास फांसला. माझा जीव गुदमरूं लागला तरी मी निमूटपणें सर्व सोसलें. नंतर हातांत वर सांगितलेली पिशवी घालून त्यानें माझें अंग चोळलें; व आणखी पाणी माझ्या अंगावर घालून माझें अंग पुसावयास दोन रुमाल घेऊन आला. एक रुमाल डोकें पुसण्याकरितां व एक बाकी अंग पुसण्याकारितां. हा सर्व विधि आटपेपर्यंत माझी बरीच त्रेधा उडाली. माझा जीव अगदीं गळून गेला व उभें रहाण्याचीही शक्ति वाटेना. परंतु माझें समाधान झालें नाहीं. मी पूर्वीं एकदां दिल्लीस गेलों होतों. तेथें एका भिकारी हम्मामांत गेलों होतों. तो पहिलाच प्रसंग असल्या कारणानें मला तेथील प्रकार बराच सुखावह वाटला. परंतु त्यावेळीं अशी कल्पनाही आली नाहीं कीं ज्या राज्यांतून मोंगलशाहींत हम्मामाची हिंदुस्थानांत प्रवृत्ति झाली त्या राज्याचें पायतख्त जें कुस्तंतुनिया शहर त्या ठिकाणीं जाऊन ज्याची मी नक्कल पाहिली त्याचें अस्सल स्वरूप माझ्या दृष्टीस पडेल; व जेव्हां पडेल अशी आशा उत्पन्न झाली तेव्हां जितकें समाधान नकलेपासून झालें होतें त्यापेक्षां खचित जास्त समाधान अस्सल वस्तूपासून होईल अशी उमेद होती, परंतु ती सर्व व्यर्थ झाली. नोकर लोकांत कर्मकुशलता व सेवादक्षता दिसून आली नाहीं व गृहव्यवस्थेंत पूर्णता व नैपुण्य दृग्गोचर झालें नाहीं.

हम्मामांत जाऊन गंगाळांतून पाणी घेतल्यासारखी अंघोळ करण्यांत काय तात्पर्य? अशा स्थळीं सर्व प्रकारें स्वच्छता, उष्ण जलोत्क्षेपक धारायंत्राची योजना, व दुसऱ्या ज्या ज्या गोष्टींनीं आगन्तुक जनांचें मन प्रसन्न होऊन स्नानविधि शिरोवेदनाजनक न होतां आल्हादजनक होईल अशा सर्व गोष्टी पाहिजेत. बरें, खर्च थोडा झाला ह्मणावा तर आह्मां दोघां मिळून सुमारें आठ रुपये लागले ! असो. स्नान आटपल्यावर आल्या रस्त्यानें आम्ही परत गेलों. माडीवर जाऊन बिछान्यावर कांहीं वेळ स्वस्थ पडलों. एक नोकर माझी शेंडी पुशीत बसला. नंतर कांहीं वेळ तोंडावरून पांघरूण घेऊन पडलों तेव्हां बराच घाम आला. नोकर माझे पाय चेपीत बसला होता. अंगांतून घाम निघाल्यावर थोडी हुषारी वाटली. तेव्हां कपडे वगैरे घालून कांहीं वेळ बसलों व नंतर घराची वाट धरली. त्या दिवशीं रात्रीं झोंप फार स्वस्थ लागली.

दुसऱ्या दिवशीं ह्मणजे तारीख २३ एप्रिल रोजीं आह्मांला कान्स्टान्टिनोपल सोडून पुढें जावयाचें होतें. आगबोटींत बसून काळ्या समुद्रांतून व्हार्ना शहरीं जाऊन तेथें आगगाडींत बसून व्हियेनास जाण्याचा आमचा बेत होता. आगबोट तीन वाजतां निघावयाची होती. त्यामुळें सकाळपासून सर्व काल आटपाआटप व बांधाबांध करण्यांतच गेला. सर विइलियम व्हाइट साहेबांनीं आह्मां सर्वांस आपली एक एक तसबीर दिली; व लेडी साहेबांनीं महाराजांस आपली एक तसबीर दिली. खुद्द मला व्हाईट साहेबांनीं असा निरोप पाठविला कीं पुष्कळ प्राच्य विषयांवर त्यांच्या मनांत माझ्याशीं बोलावयाचें होतें, परंतु कार्यव्यग्रतेमुळें असें करण्यास त्यांस सवड झाली

नाहीं याबद्दल त्यांस फार वाईट वाटलें. एकंदरीनें तेथील आंग्लसमाजाबद्दल आम्हां सर्वांचा ग्रह फार चांगला झाला. महाराजांचा सन्मान चांगला ठेविला होता व त्यांस अगत्यही फार दाखविलें होतें यामुळें अल्पकालीननिवासांत महाराजांचे बरेच स्नेही झाले होते व त्यांस सोडण्याचें महाराजांस दुःख वाटलें.

कान्स्टांन्टिनोपल सोडून पुढें जाण्यापूर्वी एकंदर देशासंबंधी व लोकांसंबंधी दोन शब्द लिहावेसे वाटतात, व ते वाचकांस अप्रस्तुत वाटणार नाहींत अशी आशा आहे.

## साधारण माहिती.

तुर्की राज्यांतील एकंदर लोकसंख्या तीन कोट साठ लक्ष आहे. यापैकीं एक कोट पंचावन लक्ष युरोपखंडांत, एक कोट साठ लक्ष आशियाखंडांत व सुमारें ४० लक्ष आफ्रिकाखंडांत आहे. यापैकीं संस्थानांतील संख्या वजा जातां सुमारें दोन कोट सत्तर लक्ष खालसा मुलखांतील लोकसंख्या आहे. शेतकीसंबंधानें सांगण्यासारखी गोष्ट एवढीच कीं धान्य पिकवण्यावर लोकांचा भर नाहीं व तत्संबंधी सर्व हत्यारें केवळ निर्वाहापुरतीं असून दाण्यांच्या शेतांस कुंपण वगैरे घालण्याची चाल नाहीं. याचें कारण असें सांगतात कीं पिकविलेला माल बाहेर पाठविण्याच्या सोई चांगल्या नाहींत. शेतकरी लोकांचा बहुधा भर कापूस, अफू, तंबाखू, ताग, अंजीर वगैरे जिनसांवर असतो; व त्यामुळें त्यांस किफायतही चांगली होते.

तुर्कस्थान देशांत सोनें, रुपें व तांबें या तिन्ही धातूंचीं नाणीं प्रचारांत आहेत. सर्वांत लहान नाणें म्हणजे "पारा."

याची किंमत सुमारें अर्धा पै आहे. पांच, दहा व वीस 'पारा' किंमतीचीं तांब्याचीं नाणीं आहेत. ४० 'पारां'चें एक 'पियास्त्र' होतें. हें नाणें रुप्याचें असून यास तुर्क लोक "घ्रुश" म्हणतात. याशिवाय २, ५, १० व २० 'पियास्त्र' किंमतीचीं नाणीं रुप्याचीं आहेत. १०० "पियास्त्र" मिळून एक 'लायरा' नांवाचें सोन्याचें नाणें असतें. त्याचप्रमाणें अर्धा 'लायरा' व पाव 'लायरा' हीं सोन्याचीं नाणीं आहेत.

शिक्षणाच्या कामांत मुसलमान लोक बरेच मागें आहेत. त्यांच्या आयुष्याचा बराच काल कुराण शिकण्यांत जातो, व धर्मसंबंधी त्यांचा दुराग्रह असल्या कारणानें इतर सर्व शिक्षण त्यांस पापमूलक आहे असें वाटतें. दिवसानुदिवस हा समज बराच कमी होत चालला आहे. तथापि अजूनपर्यंत शिक्षणाचा प्रसार व्हावा तसा झालेला दिसत नाहीं. जे जे कोणी नामांकित विद्वान् आहेत त्यांनीं युरोपियन शहरांत विशेषतः पारिस शहरांतच राहून विद्यार्जन केलें आहे. जे लोक महम्मदीय धर्माचे नाहींत त्या लोकांत मात्र विद्येचा प्रसार जारीनें सुरू आहे. सुमारें ४५ वर्षांपूर्वीं सर्व तुर्की राज्यांत फक्त दोनच वर्तमानपत्रें चालू होतीं. त्यांपैकीं एक कान्स्टान्टिनोपल व एक स्मर्ना येथें निघत असे. हीं दोन्हीही फ्रेंच भाषेंत निघत असत. १८६६ सालीं वर्तमानपत्रांची संख्या ५३ होती. यांपैकीं ६ वर्तमानपत्रें गैरशिस्त लेखनाबद्दल बंद केलीं. हल्लीं राजधानीच्या शहरीं तीस वर्तमानपत्रें आहेत. हीं फ्रेंच, इंग्लिश, ग्रीक, बल्गेरियन, आर्मिनियन, टर्किश इत्यादि शुद्ध व मिश्र भाषांत चाललीं आहेत. बाकी राज्यांत १९ वर्तमानपत्रें आहेत.

टर्किश ही मिश्र भाषा आहे. यांत आरबी व फारसी श-ब्दांचें प्राचुर्य असतें. शब्दरचना मात्र त्या भाषांहून कांहीं भिन्न प्रकारची असते. या लिपीचें आरबी व फारसी लिपीशीं बरेंच साम्य आहे. ही भाषा बोलण्यास सोपी परंतु लिहिण्यास कठीण असें सांगतात. छापण्याची कला कान्स्टान्टिनोपल शहरांत १६ व्या शतकांत प्रचारांत आली. तथापि कुराणाच्या हस्तलिखित प्रति करण्याची अजून चाल आहे.

## राजघराण्यांतील विचित्र चाली.

टर्किश रिवाजाप्रमाणें राजघराण्यांतील सर्वांत वडील जो पुरुष असेल त्यास राज्यपद प्राप्त व्हावयाचें. या कारणामुळें गादीवर जो सुलतान असेल त्याच्या पुत्रांखेरीज जितकी ह्मणून पुरुषमंडळी राजघराण्यांत असेल तेवढी मारून टाकण्याची पूर्वी चाल असे, परंतु अलीकडे ही चाल रद्द झाली आहे. तथापि अजूनही राजकुलांतील सर्व पुरुष मंडळीस फार अटकेंत ठेवण्याची चाल आहे, व राज्य करण्यास आवश्यक असे गुण ज्या विद्येमुळें त्यांच्या अंगांत यावयाचे अशी विद्याही त्यांस देण्यांत येत नाहीं. राजकीय नियमांत एक असा विलक्षण नियम आहे कीं सुलतानानें दासीजनांशिवाय इतर स्त्रियांशीं संबंध करूं नये. ज्या दासीशीं सुलतान संबंध करील ती पत्नीसमान होते, व तिला मुलगा झाला ह्मणजे राज्ञीपदाचीं सर्व चिन्हें तिला प्राप्त होतात. परंतु सर्व स्त्रियांत मोठी प्रतिष्ठा म्हणजे सुलतानाच्या मातुःश्रीची. हिचा अम्मल केवळ घरगुती कामांतच असतो असें नाहीं, तर राजकीय कामांतही तिचें बरेंच चालतें. तुर्की बाय-का जरी गोषांत असतात तथापि राजकन्या ज्या कोणास आ-

पल्या जवळ बोलावितील त्यांशीं बोलण्यास त्यांस मोकळीक असते. दुसरी अशी रीत आहे कीं, सुलतानासमोर स्त्रियांनीं तोंडावरील बुरखा काढलाच पाहिजे; व सुलतानास कोणत्याही गृहस्थाच्या जनानखान्यांत जाण्याची मनाई नाहीं. राजकुलांत लग्नसमारंभ झाला ह्मणजे स्त्रियांचा समाज भरविण्याची चाल आहे. अशा प्रसंगीं सर्व स्त्रिया बुरख्याशिवाय सुलतानाच्या भेटीस येतात. नवा सुलतान गादीवर बसण्यापूर्वीं एक विशेष संस्कार व्हावयाचा असतो. अयुबाच्या मशिदींत त्यास नेतात व त्या ठिकाणीं मेवलवी नांवाचा एक दरवेशांचा वर्ग आहे त्यापैकीं एकाच्या हातानें सुलतानाच्या कमरेस राज्याचा स्थापक जो ओस्मान त्याची तरवार बांधावी लागते. ह्मणजे मग तो खरा सुलतान बनतो.

## इतर लोकांच्या कांहीं चाली.

तुर्की लोकांत अभ्यागताचें स्वागत करण्याचे जे प्रकार आहेत त्यांत काफी व हुक्का हे मुख्य आहेत. गरीबगुरीबांत सुद्धां ह्यांचा प्रचार आहे. दारू पिण्याची मनाई आहे. परंतु नानातऱ्हेचीं सरबतें उपयोगांत फार येतात. जनानखान्यांतही स्वागताचा प्रकार असाच असतो. कांहीं जनानखान्यांत युरोपियन स्त्रियांस भेटीकरितां येण्याची परवानगी असते. परंतु कांहीं जुन्या चालीच्या घराण्यांत हा रिवाज पडलेला नाहीं.

नोकर ठेवण्याच्या ऐवजीं गुलाम विकत घेण्याची चाल अजून चालू आहे. या दासदासीजनांत कांहीं कृष्णवर्ण व कांहीं गौरवर्ण असतात. यांपैकीं जे काळ्या वर्णाचे असतात ते बहुधा आळशी, मठ्ठ, व तक्रारखोर असतात, ह्मणून केवळ

श्रीमंत लोकांच्या येथेंच त्यांचा निभाव लागतो. गौरवर्ण मंडळी बहुतेक जिआर्जिआ व सर्केशिआ या देशांतून येतात. यांस केवळ गरीबीमुळें अशा प्रसंगांत पडावें लागतें. या वर्गांतील स्त्रियांची कांति चांगली असून रूप सुंदर असतें; व त्यांतून त्यांस सुखोपभोग मिळाला ह्मणजे त्या फारच खुलतात. तुर्क लोक बहुशा पैसे खर्च करून लग्न करीत नाहींत. अशा स्त्रियांस विकत घेऊन चाकरांप्रमाणें घरांत बाळगतात; व यांच्याशीं सर्व प्रकारचा व्यवहार करण्यास त्यांस कायद्याप्रमाणें मोकळीक आहे. त्यांस मूल झालें कीं त्या गृहिणी बनतात. तुर्कस्थानांत बालहत्येचा प्रचार आहे, व या गुन्ह्यास कायद्यांत कांहीं शिक्षा नाहीं.

इस्तंबोल शहरांत कुत्र्यांचा मोठा प्रळय आहे. रस्तोरस्तीं व गल्लोगल्लीं हीं जनावरें पडलेलीं असतात. यांवर मालकी कोणाची नसते व हीं परान्नपुष्ट असतात. दर शुक्रवारीं यांस भाकर व मांस वांटण्याची तजवीज केलेली असते.

## बास्फोरससामुद्रधुनी.

सुमारें साडेतीन वाजतां आम्ही बंदर सोडलें. तेव्हांपासून सुमारें अर्धा कलाकपर्यंत ग्यालेटा, पेरा, व तोफेन इत्यादि कान्स्टान्टिनोपल शहराचीं उपनगरें वर निर्दिष्ट केलीं आहेत त्यांच्या बाजूनेंच आगबोट चालली होती. नंतर वस्ती हळू हळू पातळ दिसत चालली व निघाल्यापासून सुमार एक कलकानें ऐन बास्पोरसच्या सामुद्रधुनींत आह्मीं दाखल झालों. या स्थलाच्या सौन्दर्याविषयीं मी पूर्वीं ऐकिलें होतें व वाचलेंही होतें. परंतु जेव्हां तें सर्व सौन्दर्य दृग्गोचर झालें तेव्हां मनाचें

असा ग्रह झाला कीं कितीही निरूपणपटुता मनुष्यांत असली तरी या दृग्विषयाचें वर्णन करणें अशक्य आहे. तेव्हां त्याची खरी प्रतीति येण्यास प्रत्यक्षअवलोकनाशिवाय दुसरा मार्ग नाहीं. सामुद्रधुनीचें पात्र फार रुंद नसल्या कारणानें दोन्ही तीरांवरील प्रदेश चांगला अवलोकनांत येतो. पात्र सरळ नसून एखाद्या नदीप्रमाणें वांकडे तिकडें गेलेलें आहे, व कांहीं ठिकाणीं लहान लहान अखात बनले आहेत. जलप्रवाह शांत असून मधून मधून मृदुपवनाच्या योगानें तरंगित झाल्याकारणानें एक प्रकारची विचित्र शोभा पावत होता, व त्यावर सायंकालीन सूर्यकिरणांची छटा पडल्याकारणानें त्यास उज्ज्वलत्व व चांचल्य प्राप्त झालें होतें; त्यामुळें देखावा रमणीयतर दिसत होता. तीरप्रान्तीं स्थलीं स्थलीं दिव्य भवनें दृग्गोचर होत होतीं. हीं सर्व तुर्की पादशाह व अमीरउमराव, व अन्यदेशीय प्रतिनिधिगण यांचीं निवासस्थानें होतीं. यांची शोभा बाजूच्या उद्यानांतील वृक्षवाटिकांच्या वनश्रीमुळें अधिकतर भासत होती. पात्राशीं समांतर असा एक विस्तीर्ण मार्ग दिसत होता. ठिकठिकाणीं लहान लहान नौका असून कांहीं किनाऱ्याला लागलेल्या होत्या व कांहीं आपल्या यजमानासहवर्तमान मोठ्या थाटानें इकडून तिकडे सहल करीत होत्या. रस्त्यावरून कांहीं अश्वरथ चालले होते. कांहीं पादचारिजन शोभा अवलोकन करीत व स्वच्छ हवा सेवन करीत चालले होते. ह्या सर्व गोष्टींच्या योगानें असा भास झाला कीं हा एक विस्तीर्ण बगीचा असून सामुद्रधुनीचें पात्र हें केवळ एक कृत्रिम सरोवर आहे. स्थलीं स्थलीं क्षुद्र पर्वत होते, परंतु ते रूक्ष होते काय ? नाहीं. अथवा असतील तरी कसे ? अशा सौन्दर्याच्या निधींत

रूक्षतेला कोठून स्थल मिळणार ? विसंवादक गोष्टी निर्माण करण्याबद्दल विधात्याची कवींनीं बरीच निर्भर्त्सना केली आहे; परंतु या प्रसंगीं तरी त्यास दोष लावण्यास मला कांहीं कारण दिसलें नाहीं. असो. पर्वतांचीं पृष्ठें हरितशस्यावृत असून त्यामुळें नेत्रांस फारच समाधान वाटत होतें. डोंगराच्या पाय-थ्याशीं एखादी मशीद किंवा एखादें ख्रिस्ती देऊळ दिसण्यांत येई. हे क्षुद्र पर्वत वर सांगितलेल्या दृग्विषयाच्या एकतान-तेचा भंग करण्यास सहायभूत होत होते. कोठें कोठें लहान लहान खेडीं व कोठें मध्यम प्रतीचीं शहरेंही दुरून दिसण्यांत येत होतीं. वाटेनें एकदोन किल्ले लागले ते बरेच मजबूत दिसत होते. जिकडे तिकडे नीटनेटकेपणा, स्वच्छता, रमणीयता यांशि-वाय कांहींच आढळलें नाहीं. फार काय लिहूं ! ह्या वनस्थलीचें अद्वितीय व अनिर्वाच्य सौन्दर्य पाहून मला कविवर्यांच्या उक्तीचें स्मरण झालें:—

सा रामणीयकनिधेरधिदेवता वा
सौन्दर्यसारसमुदायनिकेतनम् वा ।

व जो लेख दिल्लींत दिवान-ए-खासमध्यें लिहून ठेविला आहे कीं—

अगर फरदौस् ब-रुए झमीन् अस्त ।
हमीन् अस्त हमीन् अस्त हमीन् अस्त ॥

( अर्थ—जर पृथ्वीतलावर कोठें स्वर्ग असेल तर तो येथें आहे, येथें आहे, येथें आहे. )

तो लेख या स्थलीं पूर्णपणें लागू होईल असें मनाला वाटू-न मी स्तब्ध झालों.

# काळा समुद्र व व्हार्ना.

संध्याकाळ उलटल्यावर आह्मी काळ्या समुद्रांत शिरलों. येथें तोंडाशींच एक लहानसा किल्ला आहे व कांहीं तोफाही ठेविलेल्या आहेत. तुर्की राज्याला हें स्थळ मोठें महत्वाचें आहे. कारण कीं रशियन लढाऊ गलबतांना काळ्या समुद्रांतून बाहेर पडण्यास दुसरा मार्ग नाहीं; व लढाईच्या प्रसंगीं एवढें तोंड दाबून धरलें तर रशियाची बरीच धांदल उडण्याचा प्रसंग आहे. काळ्या समुद्राचें पाणी इतर समुद्रांप्रमाणेंच आहे. त्यांत काळसरपणा आढळण्यांत आला नाहीं. मात्र संध्याकाळीं धुकें बरेंच पडलें होतें त्यामुळें आजूबाजूला कांहींच स्वच्छ दिसत नसे. वाराही बराच जोराचा सुटला होता व तो झोंबण्यासारखा गार होता; त्यामुळें बरीच मंडळी वरच्या मजल्यावरून खालच्या मजल्यावर गेली व कांहीं आपआपल्या खोल्यांत जाऊन निजली. आगबोट फार मोठी नव्हती त्यामुळें हव्या तशा सर्व प्रकारच्या सोई नव्हत्या. परंतु एक रात्रीचाच मुक्काम असल्या कारणानें गैरसोईकडे कोणी विशेष लक्ष दिलें नाहीं. रात्रीचे दहा वाजतां सर्व मंडळी निजून पहाटेचे चार वाजतां उठली. सूर्योदयाच्या पूर्वींच व्हार्ना मुक्कामीं आगबोट उभी राहिली. बंदरांतून आगबोट बरीच दूर उभी होती. वारा जोराचा होता त्यामुळें ज्या होडींत आह्मीं उतरलों होतों ती होडी बरीच हालत होती; परंतु आह्मांस फार त्रास झाला नाहीं. धक्क्यावर उतरतांना मात्र बरीच तारांबळ उडाली. धक्क्याला लागूनच आगगाडीचे डबे उभे होते, त्यांत सर्व मंडळी बसली. परंतु सर्व मंडळीला पुरण्याइतके डबे नव्हते

त्यामुळें बरीच बोलाचाली झाली. पुढल्या स्टेशनावर कांहीं नवे डबे लाविले, तेव्हां सर्वांचें समाधान झालें. सुमारें ९ वाजतां एका स्टेशनावर आगगाडीनें बराच मुक्काम केला. त्याठिकाणीं सर्व लोकांनीं अल्पाहार करून दिवसाची बेगमी करून घेतली. येथें एक प्रकारचा हलवा मिळाला, तो हुबे-हूब आपल्या इकडे बदामी हलवा मिळतो त्यासारखा होता. ज्या प्रदेशांतून आह्मी जात होतों तो उजाड होता. कोठें कोठें पांढऱ्या वाळूचे ढीगच्या ढीग दिसत. कोठें डोंगरावर झाडी किंवा गवत असे, परंतु कांहीं डोंगर वृक्षहीन होते.

मध्यान्हाच्या सुमारास आह्मी रश्चक मुक्कामीं पोहोंचलों. येथें पहिल्या गाडींतून उतरून एका लहान आगबोटींत बसलों व डॉन्यूब नदी वलांडून पलीकडे गेलों. उतारू, डांक, व सामान यांची उतरचढ होण्यास सुमारें दोन कलाक लागले. या ठिकाणीं पूल बांधल्यास व त्यावरून आगगाडी नेल्यास ही सर्व दगदग व यातायात वांचेल. परंतु अशा प्रकारची व्यवस्था अजून कां होत नाहीं हें समजत नाहीं. बहुतकरून कांहीं दुस्तर अशा अडचणी असल्या पाहिजेत. नाहीं तर युरोपासारख्या देशांत अशी स्थिति असणें विरळ.

## स्त्रीत्वाची लाज.

ज्या लहान आगबोटीवर आम्ही चढलों तिजवर एक मोठी मौज माझ्या पहाण्यांत आली. एक युरोपियन युवती आमच्या बरोबरच आगगाडींतून उतरून आगबोटीवर चढली. युरोपखंड सुधारलेल्या देशांत अग्रगण्य आहे व सुधारणेचीं सर्वसंमत अशीं जीं अंगें आहेत त्यांमध्यें स्त्रियांचें वर्चस्व

सर्वांस कबूल आहे. असें असतां निदान या खंडांत तरी स्त्रीत्वाची लाज त्या वर्गांतील कोणत्याही व्यक्तीला वाटेल असें माझ्या स्वप्नींही आलें नव्हतें. परंतु प्रस्तुत प्रसंगीं माझा तर्क खोटा ठरला. या बाईनें, जणुं काय आपल्या जातीचा कंटाळा येऊनच कीं काय, आपला केशकलाप कापून टाकला होता. प्राच्य व पाश्चात्य कवींनीं स्त्रीकेशकलापाच्या सौन्दर्यपोषकत्वाविषयीं बरेंच वर्णन केलें आहे. परंतु त्यांच्या उक्तींना हरताळ लावणाऱ्या अशा आधुनिक उद्दामप्रमदांविषयीं त्यांना कल्पना तरी झाली असेल काय ? हिंदुलोकांत प्रयागास गेलें ह्मणजे स्त्रियांनीं वेणीदान करण्याची चाल आहे. हें दान कांहीं जातींचे लोक अंशतः करतात व कांहीं लोक समग्र करितात. त्याप्रमाणेंच ‘ संप्रदाय ’ ( फ्याशन ) रूप जें प्रयागतीर्थ हल्लीं युरोपांत गाजत आहे, त्या तीर्थावरच अशा स्त्रिया वेणीदान करितात, दुसरें काय ह्मणायचें ? असो. प्रस्तुत स्त्रीचें सुंदर केशकलाप कापूनच समाधान झालें नाहीं. तर तिनें पोषाकही पुरुषासारखा केला होता व तोंडांत एक कागदाची विडी धरून तिचे झुरके ओढीत मोठ्या झोकानें ती बरोबरच्या मंडळीशीं संभाषण करीत बसली होती. हें सर्व पाहून मला तर फारच मौज वाटली.

## शयनरथ.

डॅान्यूब नदीचें पात्र फार मोठें नव्हतें. पाणी फार गढूळ असून वेगही फार तीव्र होता. तीरावर झाडझाडोरा फार नसून देखावा रमणीय दिसत नव्हता. ज्या धक्क्यापाशीं आह्मी आगबोटींतून उतरलों त्याला लागूनच आगगाडीचे डबे उभे होते.

कांहीं गाड्यांत निजण्याची वगैरे सोय होती त्यांस " स्लीपिंग कार " (शयनरथ) अशी संज्ञा होती. पहिल्या वर्गाचें जें भाडें असतें त्यावर कांहीं जास्त भाडें दिलें ह्मणजे या गाडीचा उपयोग करितां येतो. आमच्या टिकिटांवर आमच्या जागांचे नंबर होते. त्यांप्रमाणें जागा पाहून आह्मी सामानसुमान लावलें. प्रत्येक डब्यांत चार खोल्या असतात, व प्रत्येक खोलींत चार उतारूंची सोय असते. डब्याच्या एका बाजूनें लांबीवरोबर एक जाण्यायेण्याचा रस्ता असतो. या रस्त्याच्या एका बाजूनें प्रकाश व हवा येण्यासाठीं खिडक्या असतात, व प्रत्येक खिडकीला एक एक लहान फळीचा तुकडा लावलेला असतो, तो खालीं करून त्यावर बसतां येतें. परंतु उठलें ह्मणजे तो आपोआप मिटतो. या रस्त्याच्या दोन्ही टोंकांस दोन दारें असतात. तीं नेहमीं बंद असतात. एका डब्यांतून दुसऱ्या डब्यांत जाण्याकरितां फळ्या टाकून सोय केलेली असते. खोलींत शिरलें ह्मणजे समोर एक खिडकी असते व तिला लागूनच एक फळी पुढें आलेली असते. या फळीचा टेबलाऐवजीं उपयोग करितां येतो. उजव्या व डाव्या बाजूंस दोन गाद्यांचे कोच असतात. बसण्यास व टेंकण्यास चांगल्या मऊ गाद्या असतात. या दोन कोचांचे रात्रीं निजण्याकरितां चार बिछाने करितात. दिवसास कोचाचा जो पृष्टभाग दिसतो तो वर उचलून त्यास साखळीनें टांगतात. त्यामुळें एकावर एक असे दोन बिछाने होतात. प्रत्येक डब्याला एक गार्ड असतो तो संध्याकाळ झाली ह्मणजे बिछाने तयार करितो. पलंगपोस, उशा, व पांघरण्यास सखलाद यांप्रमाणें सर्व व्यवस्था तो करितो. आमच्या बरोबरचें आंथरूण पांघरूण काढण्याची

जरूर लागली नाहीं. वरच्या बिछान्यावर जाण्यासाठीं एक पायऱ्यांची घडवंची असते. खोलींत खुंट्या व लहान-साहान सामान ठेवण्यासाठीं कठडे वगैरेची सोय असते. परंतु बोजा फार असला ह्मणजे गैरसोय होते. यासाठीं उतारूनें नेहमीं केवळ आवश्यक तेवढ्या जिनसा गाडींत घेण्याची खबरदारी ठेविली पाहिजे. बाकीचें सामान ब्रेकांत घालावें. प्रत्येक डब्याच्या प्रत्येक टोंकास दोन दोन लहान खोल्या होत्या. एका टोंकाच्या खोल्या स्त्रियांकरितां व दुसऱ्या टोंकाच्या पुरुषांकरितां. दोन खोल्यांपैकीं एक शौच वगैरे विधीसाठीं, व दुसरी तोंड धुण्यासाठीं. तोंडधुण्याच्या खोलींत एक मोठा आरसा होता. ऊन व थंड पाण्याच्या तोट्या, साबण व रुमाल अशी व्यवस्था होती. एक स्वतंत्र डबा होता त्यांत स्वयंपाक करण्याची जागा, जेवण्याची जागा, धूम्रपानाची जागा व पुस्तकालय अशीं होतीं. त्यामुळें उतारूंची पैसे दिले ह्मणजे सर्व प्रकारची सोय लागत असे. मात्र स्नानाची सोय आढळली नाहीं. लागणारी सर्व प्रकारची सामुग्री ठरलेल्या स्टेशनांवरून मिळत असे. या सर्व गोष्टींमुळें प्रवास फारसा दुःखप्रद भासला नाहीं. एका देशाच्या हद्दींतून दुसऱ्या देशाच्या हद्दींत गाडी गेली ह्मणजे उतारूंच्या सर्व सामानाची तपासणी होते व कधीं कधीं अपरात्रीं असा प्रसंग येतो. परंतु गार्डीची चांगली समजूत केली व पासपोर्ट ( अनुज्ञापत्रक ) त्यांजवळ देऊन ठेविलें ह्मणजे बिलकूल त्रास सोसावा लागत नाहीं.

## वाटचाल.

रश्यकपासून व्हियेनापर्यंत आह्मांला सुमारें २२ कलाक

गाडींत बसावें लागलें. वाटेनें जो प्रदेश लागला तो कांहीं सपाट व कांहीं डोंगराळ असा होता. तथापि सर्व प्रदेश सुपीक होता. डोंगराळ प्रदेश रुक्ष नसून बहुतेक डोंगरांवर पायथ्यापासून माथ्यापर्यंत लागवड झालेली दिसत होती. कांहीं कांहीं स्थळीं द्राक्षांचे वेल लावण्याची तयारी चालली होती. लहान लहान तीन काठ्या एकाशीं एक बांधलेल्या अशा ओळींनें दिसत होत्या. कांहीं प्रदेश व त्यांतील खेड्यापाड्यांची ठेवण आपल्या इकडील मासल्याची होती; परंतु स्वच्छपणा व व्यवस्था विशेष वाटली. शेतकामास घोडीं लाविलेलीं होतीं व क्वचित् बैलही आढळले. आपल्या इकडल्याप्रमाणेंच शेतकरी लोकांच्या बायका व त्यांचीं मुलें शेतांत काम करतांना आढळलीं. त्यांचे कपडेलत्तेही त्यांच्या व्यवसायानुरूप ह्मणजे जाडेभरडे व मळकट दिसत होते. परंतु शेतांची व्यवस्था उत्तम दिसत होती. कुपणें, बांध, वगैरे नीटनेटके असून त्यांवरून शेतकऱ्यांची काम करण्याची हौस व व्यवस्थितपणाचा शोक व्यक्त होत होता. कांहीं कांहीं स्थलीं नुसत्या बायकाच काम करीत होत्या. आगगाडींत एका श्रीमंत व्हियेनानिवासी गृहस्थाची ओळख झाली. ह्या गृहस्थाचें वय सुमारें २७।२८ वर्षांचें असून केवळ देश पहाण्याच्या उद्देशानें हा फिरत होता. बहुतेक युरोपखंड यानें पाहिलें होतें व आफ्रिकेचा उत्तरभाग व आशियामायनरही याच्या पहाण्यांत आला होता. मी त्यास हिंदुस्थानास जाण्याविषयीं शिफारस केली तेव्हां तो असें म्हणाला कीं आपल्या देशाची माहिती झाल्याशिवाय दुसरे देश पहाणें मला पसंत नाहीं. मला हें बोलणें फार प्रशस्त वाटलें. याचा आमच्या इकडील मंडळींनीं विचार करण्यासारखा आहे.

या गृहस्थाशीं संभाषण करीत असतां अनेकभाषाज्ञानाचा प्रश्न निघाला. त्याला फ्रेंच,जर्मन व इंग्लिश या चालू भाषा येत होत्या. शिवाय लॅटिन व ग्रीकही येत होत्या. त्याच्या ह्मणण्यांत असें आलें कीं सर्वांपेक्षां त्यास इंग्लिश भाषा फार कठीण वा- टली. त्या भाषेंत उच्चाराचे नियम नाहींत, व्यवस्था नाहीं. अशा प्रकारची त्यानें बरीच निर्भर्त्सना केली, व जर्मन व फ्रेंच भाषांची स्तुति केली. त्याचें ह्मणणें असें पडलें कीं ज्याला इंग्रजीसारखी अवघड भाषा आली त्याला जर्मन व फ्रेंच ये- ण्यास फार परिश्रम लागणार नाहींत.

## व्हियेना.

तारीख २५ एप्रिल रोजीं सुमारें तीन वाजतां आह्मी व्हिये- ना शहराजवळ आलों. आकाश निरभ्र असून सूर्यप्रकाश चां- गला पडला होता. त्यामुळें डयान्यूब नदीवरून जेव्हां आग- गाडी चालली तेव्हां दुरून शहर फारच मनोहर दिसूं लागलें.

स्टेशनावर उतरल्याबरोबर आमचें सर्व सामान कस्टम आफि- सांत नेलें व आमच्या सर्व पेट्या उघडल्यावर त्यांची तेथील का- मदारानें तपासणी केली तेव्हां आमची सुटका झाली. ज्या पथि- काश्रमांत आह्मांस जावयाचें होतें तेथील व्यवस्थापकास आह्मी पूर्वींच सूचना पाठविली होती, त्याप्रमाणें त्यानें एक मनुष्य व एक गाडी सामानाकरितां व दोन बसण्याकरितां स्टेशनावर पा- ठविल्या होत्या, त्यामुळें आम्हांस बिलकुल तसदी पडली नाहीं. स्टेशनापासून आमचा आश्रम सुमारें एक मैल दूर होता. वाटे- नें जो शहराचा भाग आमच्या पहाण्यांत आला त्यावरून त्या शहराची व्यवस्था आह्मी जीं म्हणून शहरें पूर्वीं पाहिलीं होतीं

त्यांच्यापेक्षां अगदीं निराळ्या तऱ्हेची वाटली. मुंबई सोडल्यापासून जीं जीं शहरें आह्मीं पाहिलीं त्यांत आथेन्स खेरीज करून बाकी शहरांत पूर्वदेशीय रीतीचा थोडाबहुत मासला आढळत असे. केरो, आलेक्झांड्रिया, स्मर्ना, व कान्स्टांटिनोपल या शहरांत मुसलमान लोकांची वस्ती फार असल्या कारणानें आपल्या हिंदुस्थानांत त्या प्रकारचीं जीं शहरें आहेत त्यांत व ह्यांत कांहीं विलक्षण विषमता वाटली नाहीं. आथेन्स शहरांत आमचा मुक्काम फार नसल्या कारणानें व त्या स्थळीं प्राचीन इमारती पहाण्याकडेच आमचें लक्ष असल्या कारणानें तेथील युरोपियन तऱ्हेकडे आमचें फारसें लक्ष गेलें नाहीं. दुसरें असें कीं ग्रीस देशाचाही टर्की व आशियामायनर या प्रदेशांशीं बऱ्याच कालाचा संबंध असल्या कारणानें तेथेंही कांहीं कांहीं गोष्टींत पूर्वदेशीय वळणें आढळतें. सारांश काय कीं व्हियेना हें शुद्ध युरोपियन तऱ्हेचें आमच्या पहाण्यांत पहिलेंच शहर व त्याविषयीं प्रथमदर्शनीं तर आमचा फार अनुकूल ग्रह झाला. रस्ते रुंद असून त्यांवर सुरेख सारखी फरसबंदी केली होती. पार्श्वपथही प्रशस्त असून बाजूच्या इमारती भव्य असून शिल्पिजनांच्या कौशलाची साक्ष देत होत्या. जागजागीं पुतळे व जलोद्धार यंत्रें दिसत होतीं. आमच्या आश्रमाची इमारत जंगी तीन मजल्यांची होती. या आश्रमाचें नांव "बादशाही आश्रम" असें होतें, व नांवाप्रमाणें सर्व थाट व व्यवस्थाही बादशाहीच होती. आमच्या सर्व खोल्या रस्त्याकडच्या बाजूलाच होत्या. ज्या भागांत हा आश्रम होता तो भाग सर्व शहरांत उत्तम असा वाखाणलेला होता. आश्रमासमोरच एक मोठा पार्श्वपथ होता. त्यापुढें एक घोड्यांच्या वगैरे गा-

ड्या जाण्याचा रस्ता त्यापुढें एक पार्श्वपथ. त्यावर जागजागीं झाडें लाविलेलीं होतीं. त्यापुढें एक विस्तीर्ण रस्ता, यावरून ट्रामवेच्या गाड्या चालत होत्या. त्या पलीकडे फिरून एक पार्श्वपथ व त्या पलीकडे श्रीमंत व्यापाऱ्यांचीं दुकानें—याप्रमाणें व्यवस्था होती. दिवाणखान्यांत व आमच्या खोल्यांत उंची उंची सामान होतें. प्रत्येकाला एक एक खोली व सर्वांच्या उपयोगाकरितां एक दिवाणखाना व शिवाय एक खोली इतकी जागा आमच्याकडे होती. प्रत्येक दालनांत एका भिंतीला विजेच्या योगानें घंटा वाजविण्याचें यंत्र असून त्याच्याच खालीं कोणाला हाक मारतांना किती वेळा घंटा वाजवावयाची याबद्दल नियम लिहिलेले होते; या घंटेचा उपयोग आगबोटींतच ठाऊक झाला होता. परंतु तेथें तैनातीला एकच नोकर असल्या कारणानें एक वेळच घंटा वाजविण्याची ठाऊक होती. वर जे नियम सांगितले ते फ्रेंच भाषेंत असल्या कारणानें पहिल्यानदां आम्हांस त्यांचा उमज पडला नाहीं. मी आपल्या खोलींत गेल्याबरोबर घंटा एकदां वाजविली तेव्हां एक बाई आली. परंतु तिला इंग्रजी येत नव्हतें व मला फ्रेंच व जर्मन दोन्हीही भाषा येत नव्हत्या. तेव्हां मी गोंधळांत पडलों. युरोपांत नोकर लोकांत बायकांची संख्या अधिक हें मीं पूर्वीं ऐकिलें होतें. तथापि तोंपर्यंत कधीं प्रसंग नसल्यानें मी पहिल्यानदां थोडा गुटमळलों. परंतु तिच्या एकंदर तऱ्हेवरून ही नोकरच असावी असा माझा ग्रह झाला तेव्हां स्वस्थ झालों. मला पाणी हवें होतें तें मीं मागितलें. परंतु तिचा समज झाला नाहीं तेव्हां शेवटीं दुभाषाची मदत घ्यावी लागली. स्त्रीजनास बोलवावयाचें असल्यास एक घंटा; बूट वगैरे साफ करणाऱ्या नोकरास दोन

घंटा; त्याहून वरच्या प्रतीच्या नोकरास तीन घंटा, असा नि-
यम होता.

## पथिकाश्रमांतील स्नानगृह.

या आश्रमांत स्नानाचांही व्यवस्था फार उत्तम होती. एका खोलीच्या कोपऱ्यांत पांढऱ्या संगमरवरी दगडानें मढविलेला असा एक हौद होता. त्याच्या एका बाजूस दोन लहान तोट्या होत्या. एकीमधून थंड पाणी व एकीमधून ऊन पाणी येण्याची सोय होती. या तोट्यांचें पाणी हौदाच्या बाजूनें आंत पडत असे. परंतु याशिवाय वरून धारायन्त्राची योजना होती. हौदाच्या भिंतीकडल्या बाजूस सुमार दीड पुरुष उंचीची जागा पांढऱ्या संगमरवरी दगडानें आच्छादित होती. तिच्या निम्मे अंतरावर लहान लहान छिद्रें दिसत होतीं. या छिद्रांतून थंड व ऊन पाण्याच्या धारा येण्याची योजना होती. त्याचप्रमाणें वरच्या बाजूसही पाणी पडण्याची सोय होती. शिवाय खोलींत विस्तवाजवळ शेकण्याची, लघुशंका व शौचविधि करण्याचीही सोय होती. स्नानानंतर पाय मळूं नयेत ह्मणून हौदाच्या पायऱ्यांपासून तीन चार हातपर्यंत रुमाल घातले होते. त्यांवर एक खुर्ची ठेविली असून खुर्चीच्या दोन हातांवर दोन लहान रुमाल व खुर्चीच्या पाठीवर एक अघळपघळ आंगरखा होता. हा आंगरखा टर्किश टावेल ह्मणून जे एक प्रकारचे रुमाल असतात त्यांचा केलेला होता. आंगरख्यालाच जोडलेलें एक टोपडें होतें. स्नान केल्यावर हा आंगरखा अंगांत घातला ह्मणजे डोक्यापासून पायापर्यंत सर्व अंगाला पुरण्यासारखा असतो. अंगांत घालून कांहीं वेळ स्वस्थ बसलें ह्मणजे सर्व अंग कोरडें होतें. जो भाग ओलसर राहील त्यासाठीं वर

सांगितलेले दुसरे दोन रुमाल असतात. या ठिकाणीं अंगाला लावण्यास साबण व अंग चोळण्यास स्पंज यांची तयारी होती. हें सर्व झालें; परंतु हें सर्व अनुभवानें ज्ञान प्राप्त झालें आहे. या सर्व योजना अनभिज्ञ माणसांच्या लक्षांत येत नाहींत. निदान माझी तरी बरीच तारांबळ उडाली. स्नानाच्या हौदावर कुठें कोणचें पाणी असतें याबद्दल पुसट पुसट लेख लिहिलेले आढळले; परंतु माझ्या भाषाज्ञानाच्या मजलेपलीकडे ते असल्यानें मला त्यांपासून कांहींच बोध झाला नाहीं. मग प्रत्येक योजनेचा अनुभव घेऊन पहाणेंच राहिलें. तो अनुभव घेतां घेतां बरेच हाल झाले. हवेंत बराच गारठा होता; तेव्हां शीतोदकस्नानाची हौस तर दूरच, परंतु उष्णोदकाचीही अपेक्षा वाटत नसे. परंतु आगगाडिच्या प्रवासानें शरीरास बरेंच मालिन्य आलें होतें, त्याचा निरास करण्याच्या भानगडींत अशा प्रकारचा अनुभव घ्यावा लागला. हौदांत उभें राहिल्यावर पुढच्या बाजूच्या दोन तोट्या मात्र एकदम नजरेस पडल्या. एक तोटी उघडल्या बरोबर असा जोराचा शीतजलाचा प्रवाह सुरू झाला कीं त्यामुळें मला हुडहुडी भरली. ती तोटी बंद केल्यावर दुसरी तोटी उघडल्याबरोबर उष्णजलप्रवाह वाहूं लागला, परंतु उष्णता सहन करण्यासारखी नसून अंग भाजण्यासारखी होती, ह्मणून हौदाच्या बाहेर यावें लागलें. कांठावर बसून तोट्या मोकळ्या सोडल्या व बेताचें पाणी झाल्यावर बंद केल्या. तरी अजून दुसऱ्या धारायंत्राच्या योजना पहाण्याचें राहिलेंच होतें. या यंत्रांतून जें ऊन पाणी येई तें मात्र सहन करण्यासारखें होतें परंतु एकदां कळ फिरवून जें थंड पाणी पडायला लागे तें एक मिनिटपर्यंत थांबत

नसे त्यामुळें बरीच धांदल उडे. असो. एकंदरीनें सांगावयाचें एवढेंच कीं 'अनभ्यासे विषं शास्त्रम्.' अनभिज्ञ माणसाला अशा प्रकारच्या अडचणी यावयाच्याच. याप्रमाणें हें स्नानकांड आटपलें.

## नाटकगृह.

संध्याकाळ झाल्यावर आम्हीं भोजनविधि लौकरच उरकून घेतला. कारण कीं नाटकगृहांत जाण्याचा आमचा बेत होता. नाटकाची सुरवात साडेसात वाजतां व्हावयाची होती. त्यामुळें आम्ही जरी पुष्कळ घाई केली तरी आम्ही पोहोंचण्यापूर्वींच प्रयोगास सुरवात झाली होती. परंतु त्याबद्दल मला फारसें वाईट वाटलें नाहीं. कारण कीं प्रयोग जर्मन भाषेंत चालला होता व त्या भाषेची आमची ओळखही नाहीं. मग लौकर गेलों काय आणि उशिरां गेलों काय एकच. मला जें पहावयाचें होतें तें निराळेंच. मला नाटकगृह व त्यांतील व्यवस्था पहावयाची होती. नाटकगृह विस्तीर्ण असून चार मजली होतें. सुमार दोन हजार लोक बसण्याची सोय असावी असा अजमास वाटला. वरच्या सर्व मजल्यांवर उंच प्रतीच्या जागा ज्यांना "बाक्सेस" ह्मणतात त्या होत्या. तळमजल्यावर पुढच्या जागा उंच प्रतीच्या असून एका खालोखाल एक अशा मागील जागा होत्या. आमची जागा रंगभूमीच्या समोर असून तिच्यांत सहा खुर्च्या ठेवण्यास जागा होती. पुढल्या बाजूला तीनच खुर्च्या रहात होत्या. त्यांवरून मात्र प्रयोग चांगला अवलोकनांत येत असे. परंतु मागल्या खुर्च्यांवरून येत नसे. प्रेक्षकांच्या

तैनातीला नोकरलोक होते. नाटकगृहाच्या दाराशींच एक मनुष्य गाडीचें दार उघडण्याकरितां उभा होता. आंत गेल्यावर एका मनुष्यानें आमचीं टिकिटें पाहिलीं व अमक्या मजल्यावर जा ह्मणून सांगितलें. त्या मजल्यावर गेल्याबरोबर आणखी एका माणसानें तिकिटें पाहिलीं व आह्मांस जागा दाखविण्यासाठीं बरोबर एक मनुष्य दिला. आमच्या खोलींत शिरल्याबरोबर उजव्या हाताला एक टेबल होतें व बाजूला खुंट्या होत्या. या सर्व प्रदेशांत घरांतून बाहेर जातांना शीतनिवारणार्थ एक मोठा जाड आंगरखा सर्व कपड्यांवरून घालण्याची चाल आहे. मोठ्या समारंभाला गेलें तरी हा आंगरखा घालून जातात. मात्र उद्दिष्ट स्थलीं पोहोंचल्याबरोबर हे आंगरखे काढून ठेवावे लागतात. यांस "ओव्हरकोट" म्हणतात. मोठ्या लोकांच्या घरीं त्यांचे नोकर पाहुणा आल्यावर त्याचा आंगरखा काढण्यास व परत जातांना फिरून घालण्यास मदत करितात. आमच्या खोलींत टेबल होतें ह्मणून वर सांगितलें, त्याचा उपयोग हे ओव्हरकोट व हातांतील काठ्या ठेवण्याकरितां. पुष्कळ लोक दूरदर्शक यंत्रें आपल्या बरोबर आणितात. परंतु ज्यांच्या बरोबर नसतील त्यांस या ठिकाणीं मिळतात. फुकट नव्हेहो ! त्याचें तर नांवच घेऊं नका ! प्रयोगाच्या शेवटीं एक नियमित रकम द्यावी लागते. हेंच काय पण वारा घेण्याकरितां एक दोन तास पंख्याची अवश्यकता वाटल्यास तेही भाड्यानें मिळतात. असो. नाटकगृह विस्तीर्ण, भव्य व उज्ज्वल, रंगभूमि प्रशस्त, प्रकाश विपुल, रंगसज्जा मनोहर, नटनर्तकगण कुशल, नर्तकीगण सुंदर, सतेज व आपल्या अभिनयाच्या योगानें व

अवयवांच्या सलीलविभ्रमाच्या योगानें प्रेक्षक जनांस मोहून टाकणारा-ह्या सर्व गोष्टींतून एक एक गोष्ट हृदयास आल्हाद देण्यासारखी आहे, तर मग एकसमयीं या सर्वांचा अनुभव प्राप्त झाल्यास चित्ताची वृत्ति कशी होईल याचा तर्क वाचकांनींच करावा. नट व नटीजन मिळून एकंदर पाउणशें शंभर मंडळी होती, व एकेक समयीं तीस तीस चाळीस चाळीस समवयस्क, कोमलतनु व उज्ज्वलवेष अशा प्रमदा रंगभूमीवर नृत्य करूं लागल्या ह्मणजे सर्व रंगभूमी फारच खुलून जाई, व तशांत रंगसज्जा नियमित कालानें भिन्न भिन्न प्रकारची होत असे त्यामुळें अधिक चमत्कार वाटे व देहवृत्तीचें तात्कालिक विस्मरण होई. येवढी मात्र दुःखाची गोष्ट होती कीं, भाषाज्ञानाच्या अभावामुळें जेव्हां एखादा नट खुबीदार कोटी करी व त्यामुळें सर्व लोक हंसत, त्यावेळेस आह्माला लोकांच्या तोंडाकडे पहावें लागत असे. त्याचप्रमाणें मधून मधून त्यांचें गायन व तंत्रीवादन चालत असे तेंही आह्माला विशेष आवडलें नाहीं. परंतु एकंदरीनें पाहतां अननुभूतपूर्व असा आम्हाला आल्हाद झाला. एक गोष्ट सांगण्याची राहिली ती ही कीं प्रयोगाच्या निरनिराळ्या भागामध्यें जो अवकाश असे त्या अवकाशांत आमची खोलीच एक प्रकारची रंगभूमी बनून जाई, कारण एकदां एकजण आमच्याकडे पहावयास लागल्या बरोबर सर्व लोक दूरदर्शक यंत्रें डोळ्याला लावून आम्हांकडे पाहूं लागले व मोठें कौतुक मानूं लागले. ही गोष्ट सांगण्यांत आतां विशेष अर्थ नाहीं कारण कीं जेव्हां तेव्हां व जिकडें तिकडे असेंच होत होतें. प्रयोग संपण्याच्या अगोदर सुमार दहा मिनिटें आम्ही उठलों. सुमार अकरांचा होता.

# फौजेची परेड.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं आह्मीं सर्व फौजेची परेड पहावयास गेलों. तेथील सेनाधिपति हे बादशाहाचे जवळचे नातलग असून त्यांनीं फार दिवसपर्यंत इमानें इतबारें आपलें काम बजाविलें होतें, तेव्हां त्यांच्या सन्मानार्थ हा त्यांचा जन्मदिवस असल्याकारणानें ह्या दिवशीं सर्व सैन्यनिरीक्षणाचा उत्सव करण्याचा बादशानें हुकूम दिला होता. तेव्हां पहाटेपासूनच दिदृक्षुजनांची गर्दी शहराबाहेर एक विस्तीर्ण मैदान आहे त्याकडे लोटत होती. कोणी पायानें जात होते. कोणी भाड्याच्या गाड्या करून, कोणी आम्निबसमध्यें, कोणी ट्रामवेंत, कोणी खाजगी गाड्यांत—अशा नानाप्रकारानीं जनसमुदाय त्या मैदानांत एकत्र होत होता. पूर्वरात्रीं पर्जन्यवृष्टि झाल्याकारणानें फरसबंदी रस्त्यावर घोड्यांचे पाय सटासट निसटत होते, साध्या रस्त्यावर चिखल होऊन गाड्या व घोडे यांपासून पादचारिजनांस त्रास होत होता. मैदानही वृष्टीच्या योगानें कर्दममय झालें होतें.ज्या रस्त्यानें आम्ही गेलों तो मोठा रहदारीचा असून दोन्ही बाजूंनीं भव्य व सुंदर इमारती दिसत होत्या. तळमजल्यावर दुकानें व वर सभ्य लोकांच्या कुटुंबास रहाण्याची व्यवस्था होती. ज्या स्त्रीजनांस पहाटेस उठून वेंणीफणी करून स्नान वगैरे आटपून बाहेर निघण्याची सवड नव्हती,किंवा ज्यांचे कुतूहल त्यांच्या स्वेच्छवृत्तीहून बलवत्तर नव्हतें, त्या वातायनस्थ होऊन रथ्यागामि जनांची मौज पहात बसल्या होत्या. हें त्यांचें वर्तन आमच्या सारख्या वैदेशिक जनास सुखप्रद झालें. कारण कीं त्यांचीं तीं मुग्ध मुखकमलें पाहून आह्मांस फार आनंद झाला. कांहीं सामानाच्या

गाड्यांना मोठे धिप्पाड घोडे लाविलेले होते. हीं जनावरें मोठीं द्मांडगीं अ रून ओझें वाहण्याच्या कामांत फारच उपयोगीं असतात. हीं जनावरें फारशीं सुरूप नसून यांच्या पायांवर लांब लांब केश असतात. यांच्या खोगिरावर मोठ्या पितळेच्या पट्टया असून मधून मधून पितळेच्या बोजड चुका मारलेल्या असतात. मग त्या मजबुतीसाठीं असोत किंवा जशा आमच्या इकडील घांटी लोक खटाऱ्याच्या जोकडावर केवळ हौसेनें मारनात तशा असोत. ह्या ओझ्याच्या गाड्याही फार बोजडच होत्या. एक दोन ठिकाणीं आह्मांला गाड्यांना कुत्रे जोडलेले आढळले. जशा आपल्या इकडे बोकडाच्या किंवा येडक्याच्या गाड्या असतान तशा त्या लहान गाड्या होत्या. गाडीवाला गाडी पुढें कुत्र्याचा लगाम हातांत घेऊन चालत होता. परंतु या केवळ शोकाकरितां नव्हत या देशांत कुत्र्याकडूनही काम घेतल्याशिवाय सोडीत नाहींत. तेव्हां अर्थशास्त्राचा अम्मल कुत्र्यापर्यंतही जाऊन पोहोंचला असें होत नाहीं काय ? ठीकच आहे, ह्मण आहे कीं: —

क्षणशःकणशश्चैव विद्यामर्थंच साधयेत् ।
क्षणे नष्टे कुतो विद्या कणे नष्टे कुतो धनम् ॥

अर्थशास्त्राच्या दृष्टीनें पाहिलें असतां अर्थोत्पत्तीच्या कामीं सर्व बुद्धिमान् प्राण्यांनीं मदत करावयाची व निर्बुद्ध प्राण्यास मदत करावयास लावावयाची याचेंच नांव सुधारणा. आमच्यांत आणि त्यांच्यांत फरक येवढाच कीं, तें कधींही समाधान न पावतां अर्थोत्पादनाचे मार्ग शोधून काढीत आहेत आणि आह्मी केवळ निर्वाहपक्षाचा

स्वीकार करून कर्तव्याची ओळख न बाळगतां अर्थोत्पादनाचे नवे मार्ग शोधून काढीत नाहीं येवढेंच नव्हे, तर जे उपलब्ध आहेत त्यांसही फाटा मिळत चालला आहे. ह्मणूनच ते श्रीमान् आह्मी दरिद्री; ते वीर्यवान्, आह्मी हतवीर्य; ते कर्मदक्ष, आह्मी विकलचित्त; ते आज्ञानुशासक, आह्मी आज्ञापालक. याचा दोष कोणावर ? आमचा आमच्यावरच. असो.

याप्रमाणें जातां जातां आह्मी मैदानाजवळ गेलों तों आमची गाडी थांबली. गाड्यांची एकसारखी रांग लागल्या कारणानें पुढें जाण्यास मार्ग मिळेना. आमच्याजवळ मैदानांतील अगदीं आंतल्या वर्तुळांत जाण्याचें अनुज्ञापत्रक होतें, त्यामुळें आह्मास फारशी अडचण पडली नाहीं. नेमलेल्या स्थलीं जाऊन पोहोंचल्यावर आह्मी आपल्या गाडींत उभे राहून सभोंवार पाहूं लागलों. शहराच्या बाजूला नजर पोहोंचेपर्यंत एकसारखी माणसांची गर्दी होती. जवळच्या एका रस्त्यानें अग्निप्रेरित अशी एक ट्रामवेची गाडी चालली होती. मैदानांत सर्व पायदळ व घोडेस्वार यांची गर्दी जमत होती. परंतु सैन्याचा मुख्य भाग फार दूर असल्या कारणानें आह्मास निकडे चाललेला सर्व प्रकार दृष्टीस पडत नव्हता. आकाश अभ्राच्छादित असून वृष्टि होईल असा अजमास दिसत होता. तेव्हां मधून मधून सर्व लोकांचे डोळे आकाशाकडे लागत. दहावीस हजार वृष्टिकणही मध्येंच पडले, तेव्हां लोकांस अशी भीति पडली कीं वृष्टि जोरानें होऊन सर्व उत्सवाचा विघाड होईल. परंतु तसें कांहीं झालें नाहीं. इतक्यांत एकसमयावच्छेदेंकरून सैन्याच्या सर्व भागांत पटहादिरणवाद्यांचा ध्वनि कर्णपथावर येऊन धडकला. त्यावरून असें अनुमान झालें कीं

बादशहाची स्वारी येऊन पोहोंचली. कांहीं वेळ झाल्यानंतर सर्व सैन्यांत चळवळ दृष्टीस पडली. बादशहा एका बाजूला उभे राहिले, व त्यांच्या समोरून सर्व सैन्य गेलें. सैन्याची संख्या सुमार पंधरा हजार असावी. यांत आस्ट्रियन् व हंगेरियन् असे दोन्ही प्रकारचे लोक होते. यांच्या पोषाकाच्या रंगांत भेद होता; सैनिकगण जरी एकंदरीनें चांगला दिसत होता तथापि त्यांचा पोषाक मलिन दिसत होता, त्यामुळें पहाणाराच्या मनावर अनुकूल ग्रह होत नसे. घोडे मजबूत व सुंदर होते.

## शहरांतील प्रेक्षणीय वस्तु.

दोनप्रहरीं आह्मीं बादशहाची अश्वशाला पहाण्यास गेलों. घोडे फारच सुव्यवस्थित रीतीनें ठेविलेले आढळले, व स्वच्छपणा फारच दिसला. स्प्यानिश् घोडे सर्वांत बांधेसूद व सुरूप दिसले. अश्वशाला पाहून आह्मी रथशाला पाहण्यास गेलों. या शाळेंत फार पुरातनकालचे रथ, म्याने व बर्फावरून जाणाऱ्या गाड्या ठेविल्या आहेत. बहुतेकांवर सोनेरी मुलामा विचित्र केला आहे. कांहीं रथ फारच प्रशस्त असून त्यांत नानाप्रकारच्या योजना केलेल्या होत्या.

नंतर आह्मी शहराबाहेर कांहीं अंतरावर एक पुरातन इमारत आहे ती पहाण्यास गेलों. ही इमारत बांधण्यास माथिअस बादशाहानें सुरुवात केली, व मेरिया थेरिसा इनें ती शेवटास नेली. मृगयेच्या समयीं विश्रांति घेण्यासाठीं ही बांधण्यांत आली होती. १८०४ व १८०९ सालीं नेपोलियन बादशहानें याच ठिकाणीं राहून सर्व कारभार चालविला होता, व त्याचा एक मुलगाही १८३२ सालीं याच इमारतींत ज्या खोलींत नेपो-

लियन बादशहा निजत असे त्याच खोलींत मरण पावला. ही इमारत एका विस्तीर्ण चौथऱ्यावर बांधली असल्या कारणानें व आसमंताद्भागीं वृक्षराजींनीं वेष्टित असल्या कारणानें फारच रमणीय दिसते. चोहों बाजूंनीं विस्तीर्ण उद्यानभूमिका काढल्या आहेत; व त्यांतील तरुलतांची ठेवण फ्रेंच तऱ्हेची आहे. पश्चाद्भागीं सुमार अर्धा मैलपर्यंत एक प्रकारचीं सुरूचीं झाडें आहेत. त्या वृक्षांचे पार्श्वभाग व शिरोभाग अशा तऱ्हेनें कापिलेले आहेत कीं वरून चंद्रप्रकाश किंवा सूर्यप्रकाश सरळ रेषेंत पडावा. उद्यानभूमिकांमधून जागजागीं संगमरवरी दगडाचे पुतळे व कारंजीं आहेत. इमारतीच्या पाठीमागें उंचवट्यावर एक स्तंभसमूह आहे. या स्थलापासून सर्व व्हियेना शहर दृग्गोचर होतें. याशिवाय एका कोपऱ्यांत एक पशुपक्षिसंग्रहालय आहे. मुख्य इमारत खेरीज करून हीं सर्व स्थलें सर्व कालीं सर्व लोकांस खुलीं असतात; त्यामुळें आजूबाजूचे लोक आपल्या मुलाबाळांसुद्धां सायंकालसमयीं गरीबांच्या गृहीं असुलभ अशा मौजेचा, स्वच्छ हवेचा, व मनोहर अशा दृग्विषयाचा अनुभव घेतात. इमारतीच्या आंत आह्मास जाण्यास परवानगी होती, परंतु त्यावेळेस कांहीं ठिकाणीं दुरुस्ती चालली असल्या कारणानें सर्व सामानसुमान जेथल्या तेथें नव्हतें; त्यामुळें तेथील वैभव विशेष डोळ्यांत भरलें नाहीं. सर्व ठिकाणीं तसबिरी मात्र विपुल होत्या. त्यांत कांहीं मेरिया थेरिसा व तिच्या कुटुंबांतील सर्व माणसांच्या, कांहीं लग्नसमारंभाच्या, कांहीं सुंदर वनश्रीच्या, कांहीं पौराणिक कथानकाच्या, कांहीं चिनी कारागिरीच्या व कांहीं हिंदुस्थानी तऱ्हेच्या अशा होत्या. कांहीं पुरातन झाल्या कारणानें त्यां-

चें तेज व त्यांचा रंग उतरतच चालला होता. राजेलोकांना अशा संग्रहाचा शोक असला ह्मणजे अर्थात् अशा प्रकारच्या कारागिरीला उत्तेजन येतें; लोकांत व्यवसाय व उद्योग वाढतात; व द्रव्यार्जनाचे मार्ग खुले होतात. राजेलोकांनीं असा प्रचार पाडला ह्मणजे दुसरे लोक त्यांचें अनुकरण करणारच; कारण कीं:—

> यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
> स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥

असो; याप्रमाणें ही इमारत व बाजूचीं सर्व स्थलें पाहून आह्मी बाहेर पडलों. या स्थलाचें नांव शॉनब्रन ( शब्दार्थ, सुंदर कारंजें ). हें नांव, येथें फारच मनोरम असें कारंजें आहे त्यावरून पडलें आहे. या कारंज्यावर एका कुशल शिल्पकारानें एक अप्सरेचा पुतळा केला आहे तो पहाण्यासारखा आहे.

बाहेरच्या बाजूलाच एक खेडें आहे तेथें जागजांगीं विश्रांतिस्थानें आहेत. यांपैकीं एका जागीं आम्ही जाऊन विश्रांति घेतली. एक लहान बंगला असून त्यासमोर एक मोठें अंगण होतें. अंगणाच्या मध्यभागीं एक लहानशी झोंपडी असून त्यांत सुमारें २५ माणसांना बसण्यासाठीं बांकें होतीं. ह्या झोंपडीच्या सभोंवार सुमार दोनशें खुर्च्या होत्या. दहावीस खुर्च्या व मध्यें एक टेबल अशी जागजागीं व्यवस्था होती. संध्याकाळची वेळ झाली ह्मणजे मंडळी जमावयास लागते; व नंतर खाणें, पिणें, खेळणें इत्यादि सर्व व्यवहार सुरू होतात. सर्व दिवसभर काम केल्यावर अशा प्रकारच्या विश्रांतिस्थानाचा लाभ घेणें कोणास आवडणार नाहीं? अशा प्रकारच्या संस्था आपल्याइकडे होणें शक्य आहे काय?

असो ; घरीं येऊन या दिवशींही आह्मी नाटक पहावयास गेलों. खेळ बरा वठला असें वाटलें. परंतु पुष्कळ स्त्रिया मिळून एक प्रकारचा नाच झाला तो मला फार आवडला.

तिसऱ्या दिवशीं सकाळीं आह्मी बादशाहाच्या स्प्यानिश् घोड्यास ज्या जागीं नाचावयास शिकवितात त्या जागीं गेलों. शिकविण्याची तऱ्हा फारच मौजेची असून घोडेही चांगले तरबेज झालेले दृष्टीस पडले. नंतर आह्मी शस्त्रालय पहाण्यास गेलों. तेथें लहानशा सुरीपासून तों मोठ्या तोफेपर्यंत सर्व प्रकारच्या शस्त्रास्त्रांचा संग्रह दृष्टीस पडला. कांहीं शस्त्रें फार प्राचीनकाळचीं दिसत होतीं. नानाप्रकारचीं चिलखतें तेथें मांडलेलीं होतीं. सर्व देशांतील बंदुकांचे नमुने तेथें होते. तुर्की, इराणी व दुसरीं कांहीं पूर्वदेशीय शस्त्रें तेथें पहाण्यांत आलीं.

दोन प्रहरीं तेथील ब्रिटिश एम्बसीचे चापलेन आमच्याकडे आले. हे गृहस्थ हिंदुस्थानांत पूर्वीं कांहीं दिवस होते, तेव्हां त्यांनीं आह्मांस बरेंच अगत्य दाखविलें. अतिशयच ह्मटलें तरी चालेल. कारण कीं त्यांच्या अगत्याचा आह्मांस कंटाळा आला. नानाप्रकारच्या प्रश्नांवर त्यांनीं बोलणें लाविलें त्यावरून त्यांचा कांहीं विशेष हेतु असावा असें दिसलें. त्यांचा कार्यसाधूपणा त्यांस मोठ्या शिताफीनें झांकतां आला नाहीं. सांगावयाचें तात्पर्य ऐवढेंच कीं, तशा प्रकारचें वर्तन आमच्या इकडे कोणी नव्या आलेल्या साहेबाशीं केलें असतें तर सर्व वर्गावर मोठी खरमरीत टीका झाली असती. माझें ह्मणणें एवढेंच आहे कीं एकावरून सर्व वर्गाला दोष देणें गैरवाजवी आहे. वर निर्दिष्ट केलेले साहेब अतिप्रसंगी होते ह्मणून सर्व लोक तसेच असतात असें मी ह्मटलें तर जसें

शोभणार नाहीं, त्याप्रमाणेंच आमच्या लोकांविषयीं अनुभवा-
शिवाय जे लोक आक्षेप घेतात त्यांविषयीं ह्मणतां येईल.

## डा० बुल्हर.

असो; ह्या गृहस्थाशीं बोलण्यापासून माझा दुसरा जरी कांहीं फायदा झाला नाहीं तरी एवढा लाभ झाला कीं डाक्टर बुल्हर साहेब तेथें असल्याबद्दलची मला बातमी लागली. डाक्टर साहेबांचा व माझा पूर्वींचा परिचय नव्हता. परंतु ते संस्कृत भाषाप्रवीण असून हिंदुस्थानांतील प्राचीन ग्रंथांविषयीं त्यांचे श्रम अव्याहत आहेत हें मला ठाऊक होतें, ह्मणून त्यांस भेटावयास जाण्याचा मी निश्चय केला. दिवसा जाण्यास सवड झाली नाहीं व ते घरीं भेटतील किंवा नाहीं याचीही शंका असल्याकारणानें मी रात्रीं भोजनोत्तर त्यांच्या घरीं गेलों. ते शहराबाहेर एका उपनगरांत रहात होते. तेथें मी शोध काढीत गेलों. घराचीं सर्व दारें बंद होतीं; परंतु एकदोन खिडक्यांतून दिव्याचा प्रकाश दिसत होता. त्यावरून घरांत कोणी तरी जागें असावें असें अनुमान करून मी आंत जाण्याचा निश्चय केला. घराच्या बाहेरच्या बाजूस दिवा नसल्याकारणानें कोणत्या दारानें आंत जावयाचें हें समजेना म्हणून गाडीवाला गाडीचा दिवा आपल्या हातांत घेऊन पुढें झाला व मी त्याच्या मागून गेलों. मी घंटा वाजविल्यावर हातांत दिवा घेऊन एक परिचारिका दाराशीं आली, व तिनें दार उघडलें. दार उघडून मी जेव्हां तिच्या नजरेस पडलों तेव्हां ती भ्याली, व चार पावलें मागें सरली. मग का माझ्या कृष्णवर्णाचें तिला भय वाटलें,—का माझ्या विचित्र

ब्राह्मणी वेषानें ती भांबावून गेली, कोण जाणें ! मी कोणाक-
डे आलों वगैरेची ती चवकशी करीत होती, इतक्यांत आंतून
एक माझ्या कमरेइतका उंच व लठ्ठ असा कुत्रा दाराशीं आला,
त्याबरोबर तिला धीर आला. पण मग मी घाबरलों. मला पा-
हून ही बाई घाबरली तर चार पावलें मागें झाली. पण हे
श्वराज जर माझ्या विचित्र तऱ्हेस पाहून बुजले तर न जा-
णों, अंगावर यावयाचे ! ह्मणजे धर्म करितां कर्म उभें राहिलें
असें झालें असतें ! परंतु आमची दोघांची ही भीति अल्पका-
लीनच होती. कारण येवढ्या अवकाशांत माझी कार्ड आंत
जाऊन मला आंत जाण्याची परवानगी मिळाली. तेव्हां अर्था-
तच त्या बाईचा व कुत्र्याचा माझ्याविषयींचा विपरीत भाव
जाऊन ती मोठ्या कौतुकानें माझ्याकडे पाहूं लागली. डाक्तर
साहेबांस मला पाहून फारच आनंद झाला. कारण कीं जरी
माझा परिचय नव्हता, तरी माझ्या आगमनानें त्यांच्या पूर्व-
परिचित मित्रमंडलाची त्यांस आठवण झालीच असेल, व
माझ्यासारख्याची स्वप्नांतसुद्धां भेट होण्याचा संभव नसल्या-
कारणानें कार्यान्तर एकीकडे ठेवून एक घटका माझ्याशीं
बोलण्याची त्यांनीं सवड केली. परंतु माझ्यासारख्याचा पाहू-
णचार कोणत्या रीतीनें करावा ह्याविषयीं ते मोठ्या गूढांत
पडले. अमुक घ्या ह्मणावें तर माझ्यासारखे ब्राह्मण त्यांच्या-
सारख्यांच्या घरीं कांहींच सेवन करावयाचे नाहींत ही त्यांची
खात्री होती. बरें, कांहींच बोलूं नये तर परदेशांतून केवळ
त्यांस भेटण्यासाठीं जो गृहस्थ आला त्यास कांहींच अगत्य
दाखविलें नाहीं असें होईल. शेवटीं त्यांनीं मला प्रश्न केलाच;
परंतु ' मला कांहीं नको ' ह्मणून मी उत्तर दिल्यावर त्यांनीं

कुशल विचारून व आपल्या मित्रमंडळीबद्दल चौकशी करून मला त्यांनीं निरोप दिला.

तारीख २८ रोजीं सायंकालीं आह्मांस व्हियेना सोडून जावयाचें होतें. त्याच दिवशीं दोन प्रहरीं घोडयांच्या शर्यती असल्या कारणानें महाराज व दुसरी कांहीं मंडळी तिकडे गेली. मी घरींच राहिलों, व स्वतंत्रपणें कालक्रमण करावें असा निश्चय केला ; परंतु बेत साधला नाहीं. कारण कीं वर निर्दिष्ट केलेले पाद्री साहेब माझ्याकडे आले व माझी पाठ सोडीनात, तेव्हां त्यांस घेऊन शहर पाहण्यास गेलों.

## व्हियेना शहराची रचना.

व्हियेना शहरांत सात रेलवे स्टेशनें आहेत, व तीं एकमेकांशीं लोहमार्गांनीं जोडलेलीं आहेत. हें शहर पर्वतवेष्ठित अशा भूप्रदेशावर वसलें असून त्याच्या एका बाजूस डान्यूब नदीचा एक मोठा कालवा आहे व पूर्वेच्या बाजूस विथेन नांवाची नदी या कालव्यास मिळाली आहे. १८६३ सालापूर्वीं एक मध्यनगर व ३४ उपनगरें असे या शहराचे विभाग होते. परंतु सांप्रतकालीं मुख्य शहराचे एकंदर १० विभाग आहेत; व त्यांशिवाय ३५ उपनगरें आहेत. १८८० सालीं खानेसुमारी झाली होती त्या वेळीं उपनगरांसुद्धां लोकसंख्या अकरा लाखांवर होती. १८०९ सालापर्यंत व्हियेना शहराभोंवती दुहेरी तट होता. परंतु त्याचा अवशेष हल्लीं कोठेंही दिसण्यांत येत नाहीं. ज्या भागावर हे तट होते त्याच भागावर सांप्रत एक विस्तीर्ण असा मार्ग केलेला आहे. तेव्हां अर्थातच हा मार्ग एकसारखा सर्व शहराभोंवती आहे. ह्या मा-

गांच्या आंत जेवढी वस्ती आहे तेवढी दाट आहे व त्यांतील रस्ते लहान असून दोन्ही बाजूंनीं उंच उंच इमारती असल्या- कारणानें कोंदट दिसतात. परंतु सर्वांवर फरसबंदी चांगल्या प्रकारची आहे. आंतील शहराच्या मध्यभागीं प्रसिद्ध व पुरातन सेंट स्टीफनचें देवालय आहे, व ह्या मध्यबिंदूपासून त्रिज्यारूप सर्व रस्ते फांकतात. या देवळाचा घुमट ४४९ फूट उंच आहे. भिन्न भिन्न भागांचा नामनिर्देश करण्यासाठीं जीं फलकें मार- रेलीं आहेत त्यांचे निरनिराळे रंग आहेत. या रंगवैचित्र्याचा हेतु इतकाच दिसतो कीं जरी दुरून रस्त्याचें नांव वाचतां आलें नाहीं तरी केवळ पाटीच्या रंगावरूनच नगराचा भाग ओळखतां यावा. शिवाय एका भागांतून दुसऱ्या भागांत जा- ण्याकरितां कांहीं कांहीं वाडयांतून पादचारि जनांच्या सोईचे रस्ते आहेत. त्यामुळें लांब फेरा न घेतां एकदम एका रस्त्यांतू- न दुसऱ्या रस्त्यांत जातां येतें; परंतु जसजशी जुनी वस्ती मोडत जाऊन नव्या इमारती होत आहेत तसतसे अशा प्रकारचे आडरस्ते नाहींसे होत चालले आहेत. गेल्या पंचवीसतीस वर्षांत या शहरांत इमारतींच्या बांधणींत फारच फरक झाला आहे; व हा फरक होण्याचें यश सर्वां- शीं कार्लराल व फ्युरिच या प्रसिद्ध कारागिरांचें आहे. इमारतींच्या रचनेंत व त्या रंगविण्यांत व त्यांवर चित्रें का- ढण्याच्या कामांत या गृहस्थांनीं नवीच पद्धति सुरू केली व त्यांच्या मागून दुसरे सुधारणा करीत गेले; यामुळेंच हल्लीं सर्व नगरांत भव्य व सुंदर अशा इमारती जिकडे तिकडे नज- रेस पडतात; व त्यामुळें प्रेक्षक जनांस नागरिकांचें वैभव व संपत्ति यांची प्रतीति येते. शहराच्या बहुतेक सर्व भागांत

अशा सुंदर इमारतींचा फैलाव झाला आहे. रस्तोरस्तीं पांच पांच सहा सहा मजल्यांचीं घरें दृष्टीस पडतात. हीं सर्वच घरें मालकांनीं स्वतः रहाण्यासाठीं बांधलीं असतात असें नाहीं. तर सभ्य गृहस्थांच्या सोईकरितां अशीं घरें बांधून त्यांपासून भाडें उत्पन्न करण्याचा उद्योग हल्लीं फार जारीनें सुरू आहे. या सर्व इमारतींतील आभ्यंतर भाग विचित्र तऱ्हेनें रंगविलेले असतात, व त्यांवर नक्षीही चमत्कारिक काढलेली असते.

ग्राबेन नांवाचा जो शहराचा भाग आहे त्यांत व्यापाराची घडामोड फार चालली असते. यां ठिकाणीं सर्व श्रीमंत व्यापाऱ्यांचीं नानातऱ्हेचीं नीटनेटकीं व सुंदर अशीं दुकानें आहेत. कांहीं दुकानांतील व्यवस्था व ठेवण इतकी वर्णनीय आहे कीं, तेथें केवळ पहाण्या-साठीं उभें रहावेंसें वाटतें. सर्व प्रकारच्या वाहनांची व व्यव-हारव्यापृत जनांची तर गर्दी विचारूंच नका. मधून मधून आरामस्थानें होतीं तेथें श्रान्तजन विश्रांति घेण्यासाठीं आस-नासीन होऊन सुखानें अन्नपानादि व्यवहार करीत आहेत असें आढळले. मुख्य मुख्य चतुष्पथांच्या ठिकाणीं कारंजीं, पुतळे वगैरे कांहीं ना कांहीं तरी होतेंच. वर जो वर्तुलाकार रस्ता सांगितला त्याची सरासरी रुंदी ५५ यार्ड आहे व लांबी दोन मैलांवर आहे. त्याच्या उपान्तभागीं कांहीं कांहीं स्थलीं रम्य अशा उद्यानभूमिका काढिलेल्या आहेत. त्यांमुळें आसमन्ताद्भा-गाच्या सर्व प्रदेशाला कांहीं विलक्षण शोभा आली होती. ज-लसेकानें टवटवीत झालेल्या पुष्पलता आपल्या आल्हादसूचक मुद्रेनें प्रेक्षक जनांस तोषवीत होत्या. कांहीं नगरवासिजन ठिकठिकाणीं आसनांवर बसलेले होते. परंतु त्यांच्या मुखचर्ये-

वरून सभोंवतालच्या मनोरम सौन्दर्याचा ठसा त्यांच्यावर कांहींच उमटला नाहीं असें दिसत होतें. कदाचित् अतिपरिचयाच्या योगानें तर असें झालें नसेलना? कारण कीं,

मलये भिल्लपुरंध्री चन्दनतरुकाष्ठमिंधनंकुरुते।

या न्यायानें तर ते जन अशा शोभेला पराङ्मुख झाले नसतील? कसेंही असो. माझ्यासारख्यास तर त्या दृग्विषयापासून फारच समाधान प्राप्त झालें.

## युनिव्हरसिटीचें मंदिर.

सर्व मुख्य मुख्य इमारती पहाण्यास आह्मांस अवकाश नव्हता. युनिव्हर्सिटीचें मंदिर मात्र आम्हीं पाहिलें. हें मंदिर फार मोठें व भव्य असून याच्या मध्यभागीं एक विस्तीर्ण चौक आहे. पुढील दरवाजाशीं मोठमोठ्या पायऱ्या आहेत, व दरवाजावर नानातऱ्हेची नक्षी आहे. आंत गेल्यावर आह्मीं डाक्तर बुल्हर साहेबांचा शोध केला व त्यांची गांठ घेतली. तेथील मंडळींनीं आम्हांस फार अगत्य दाखविलें व बुल्हर साहेबांनीं स्वतः सर्व इमारतींचे मुख्य मुख्य भाग आम्हांस दाखविले. पुस्तकालय फार मोठें असून त्यांत जवळ जवळ साडेतीन लक्ष पुस्तकांचा संग्रह आहे. एक प्रशस्त वाचनगृह आहे त्यांत तीनशें वाचणारांची सोय आहे. एकंदर छात्रगणाची संख्या सहा हजार आहे व अध्यापकांची संख्या साडेतीनशें आहे. या विद्यालयाची स्थापना १३६५ सालीं झाली व हल्लीं ही संस्था चांगली भरभराटींत आहे. डाक्तर बुल्हर साहेबांच्या सांगण्यांत असें आलें कीं हिंदुस्थानाप्रमाणेंच या ठिकाणींही पुष्कळ विद्यार्थिजनांस अन्नाची पंचाईत असते व विद्यालया-

त मिळणाऱ्या निर्वाहाच्या साधनावर व इतर धार्मिक जनांच्या आश्रयावरच यांचा निर्वाह होतो. हें ऐकून मला फार आश्चर्य वाटलें; कारण कीं माझा असा ग्रह होता कीं आपल्या इकडल्यासारखे भिकारी केवळ पोटासाठीं विद्यार्जन करणा दुसरीकडे सांपडणार नाहींत. परंतु आमच्या जोडीला संपन्न राष्ट्रांतही कांहीं मंडळी आहेत. ह्या आश्वासनामुळें समाधान मानावें किंवा नाहीं हें समजत नाहीं. असो. अध्ययनशाला फार विस्तीर्ण नसून त्यांत एकदम लक्षांत येण्यासारखें विशेष कांहीं नव्हतें. ज्या जागीं ओरिएन्टल कान्ग्रेस भरली होती ती जागाही डाक्तर साहेबांनीं मला दाखविली. सर्व इमारतीभर स्वच्छ हवा खेळण्यासाठीं कांहीं विशेष योजना केली होती; व ठिकठिकाणीं विजेच्या योगानें वाजणाऱ्या घंटाही होत्या. दुसरी एक गोष्ट बुल्हर साहेबांनीं सांगितली ती ही कीं तेथील युनिव्हर्सिटीचे जेवढे म्हणून फेलोन आहेत तेवढे सेनेटचे सभासद नसतात. फेलो वर्गांतून निवडलेली मंडळी सेनेटमध्यें असतात.

याप्रमाणें शहराच्या मुख्य भागांचें विहगदृष्ट्या अवलोकन करून आश्रमांत परत आलों व सर्व तयारी करून पारिस मुक्कामीं जाण्याकरितां स्टेशनावर गेलों.

## पारिस शहरीं आगमन.

तारीख २८ रोजीं तीन प्रहरानंतर आम्ही व्हियेनाहून निघाला ते दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं पारिस मुक्कामीं पोहोंचलों. पारिस शहराजवळ येण्यापूर्वीं आगामि नयनोत्सवाच्या अपेक्षेनें आमच्या चित्तवृत्ति फारच उल्लसित झाल्या होत्या. का-

रण कीं या शहराच्या सौन्दर्याची ख्याति व तेथील व्यवस्थेचें वर्णन फार पूर्वी ऐकिल्या कारणानें त्याची प्रत्यक्ष प्रतीति घेण्याचा प्रसंग निकट आला असें वाटून कुतूहलवश झालों व उत्कंठेची पराकाष्ठा झाली. परंतु दैवयोग कसा उलटा पहा ! जें पारिस शहर आपल्या उज्ज्वल भवनराजींनीं, प्रशस्त वीथिकांनीं व रमणीय उद्यानभूमिकांनीं प्रवासिजनांच्या श्रमाचा अपनोद करून नेत्रांचें सार्थक करण्यास कारणीभूत होईल अशी आमची पक्की समजूत होती, त्याच शहराचे उपान्तभाग जेव्हां दृग्गोचर झाले तेव्हां आमच्या चित्तवृत्ति उदासीन झाल्या व नैराश्यानें आह्मी तटस्थ झालों. सर्व आकाश मेघाच्छादित होतें व मधून मधून अल्प वृष्टिही होत होती, त्यामुळें सर्व वातावरणांत दुःखसंवेदक असें शैत्य आलें होतें. ज्या इमारती, ज्या रथ्या, ज्या उद्यानभूमिका सायंकालीन मन्द सूर्यकिरणांच्या योगानें सस्मित दिसावयाच्या त्या अल्प वृष्टिसेकाच्या योगानें आमच्यासारख्या लांबून आलेल्या प्रवासिजनांसमोर आपली सौन्दर्यकीर्ति मलिन झाली या दुःखानेंच जणु अश्रुपात करीत होत्या. मेघदर्शन व अल्प वृष्टि सर्व काळीं व सर्व स्थलीं सौंदर्यविघातक होतात असें नाहीं. कांहीं वनस्थलींमध्यें या अत्यंत सौन्दर्यपोषक होतात. परंतु बहुतकरून शहरांमध्यें त्यांचा परिणाम विपरीत होतो, ह्मणूनच प्रस्तुत प्रसंगीं तेथें आमच्या नेत्रांस समाधानकारक असें कांहीं वाटेना, म्हणून फार खेद झाला. असो. पारिस मुक्कामीं " रु-द-कास्तिलियो " नामक रस्त्यावर आमचा आश्रम होता. हा आश्रम उत्तमांतला नव्हता तरी साधारण सर्व प्रकारच्या सोई येथें होत्या. पारिस शहरांत

उंच प्रतीच्या पथिकाश्रमांत एका खोलीचें रोजचें भाडें १५ पासून वीस रुपये पर्यंत पडतें. नोकरचाकर, स्नान, जेवणखाण वगैरे सर्व प्रकारचा खर्च निराळाच असतो. आह्माला दोनच दिवस मुक्काम करावयाचा होता, ह्मणून फार मोठ्या प्रकरणांत आह्मी शिरलों नाहीं. सर्व व्यवस्था जिकडल्या तिकडे लागल्यावर पहिला विचार अर्थात् स्मश्रु करविण्याचा. मंडळी प्रवासानें थकून गेली होती, ह्मणून हस्तप्रयोगाचा बेत रहित करून हजामाला घरीं बोलावून आणिला व तिघांजणांनीं स्मश्रु करविली. कारागीर मोठा कुशल होता व बोलका होता. त्याच्या कुशलतेचा आह्मास अनुभव आला, परंतु त्याच्या वाक्चातुर्याची आह्मांस परीक्षा झाली नाहीं. तें कां हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. सुवासिक साबण व सुवासिक पाणी वगैरेची त्यानें रेलचेल उडविली व जातांना असाच प्रसंग वरचेवर आह्मी आणावा अशाबद्दल मोठ्या अदबीनें विनंति करून स्वारी चालती झाली. हा सर्व प्रकार आह्मांस सुखावहच झाला, परंतु कारागिराच्या मजुरीची चौकशी आह्मी तेव्हां कुठें केली ? आश्रमाच्या मालकाकडून तो पैसे घेऊन चालता झाला व तिसऱ्या दिवशीं जेव्हां एकंदर हिशेब सादर झाला तेव्हां असें आढळलें कीं स्मश्रूबद्दल माणशीं दहा दहा रुपये आकार झाला. ह्मणजे तिघांना मिळून तीस रुपये एक वेळच्या हजामतीस लागले ! असो.

## सरकस.

त्या दिवशीं रात्रीं पाऊस पडतच होता; परंतु पारिस शहरांत येऊन रात्र घरीं बसूनच घालवावी हें प्रशस्त न वाटल्यामुळें आह्मी सरकस पहाण्यास गेलों. नाटकगृह सुशोभित व

विस्तीर्ण असून पूर्वी वर्णन केलेल्या मासल्याचें होतें. प्रयोगांतही विशेष करामत नव्हती. आपल्या इकडे घोड्याच्या कसरतीचे खेळ होतात त्यांहून अधिक कांहीं नव्हतें. मात्र मधून मधून निरर्थक असे कांहीं प्रकार होत होते. एक लहानसा बाजार भरला होता त्यांत सर्व व्यवहार अव्यवस्थितपणें चालला होता. कांहीं कोंबडीं, गाढवें व एक बैलही त्यामध्यें होता. या सर्व प्रकारांचा हेतु काय तो आह्मांस समजला नाहीं. मग एक प्रकारचा नाच झाला. त्यांत बायका आपल्याइकडील नर्तकीगणाप्रमाणें हात व पाय हालवीत होत्या व त्यामुळें प्रेक्षकजनांत मोठा हशा पिके. मला तर त्यांत कांहींच कुशलता दिसून आली नाहीं. कदाचित् हिंदुस्थानी नाचाचा उपहास करण्यासाठीं तर अशा प्रकारची ती नक्कल नसेल ? कसेंही असो. मला या कोणत्याही गोष्टीपासून मौज वाटली नाहीं. परंतु पुरुषाची चैन-बाजी व स्त्रियांचा नट्टाफट्टा पाहून मात्र आश्चर्य वाटलें. सर्व पु-रुष जसे कांहीं सुखास्वाद घेण्याचा निश्चयच करून हरएक प्रकारें आपल्यास रंजवीत आहेत. कोणी आपल्या पोषाकाच्या झों-कांत आहेत ; कोणी युवतिजनांस चाटूक्तींनीं तोषवी-त आहेत ; कोणी आपल्या वयस्यगणाबरोबर पानगृहांत जाऊन अपेक्षित पेय वस्तूचें सेवन करून नन्तर सुगन्धयुक्त अशा तमाखूच्या धूम्राचे झुरके ओढीत आहेत. स्त्रीजन आ-पले केश नीटनेटके आहेत कीं नाहींत हें पहाण्यांत व आपण घातलेल्या नवीन तऱ्हेच्या पोषाकाकडे लोकांचें लक्ष गेलेंच पाहिजे अशा समजुतीनें तो वरचेवर सांवरीत आहेत, व दुसरे लोक आपल्याकडे पहात आहेत अशी मनाची समजुत अ-

सलीं ह्मणजे जशी एकप्रकारची गर्वयुक्त मुद्रा होते तशी मुद्रा धारण करून मध्येंच कोणी बोलूं लागल्यास मोठ्या आढ्यतेनें व ताठ्यानें त्यास प्रत्युत्तर देत आहेत, अशा एक कां-दोन-हजार प्रकारच्या गोष्टींनीं मला मौज वाटली व आनंद झाला.

## लूव्हर प्रासादांतील चित्रशाळा.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं लूव्हरनामक प्रासादांतील चित्रशाळा पहावयास आह्मी गेलों. ही शाळा फारच विस्तीर्ण आहे व यांतील चित्रसमुदायाच्या तोडीचा समुदाय सर्व युरोपांत नाहीं असें सांगतात. सर्व चित्रांचें वर्गीकरण करून तीं निरनिराळ्या खोल्यांत मोठ्या व्यवस्थेनें लाविलीं आहेत. या सर्व खोल्यांतून पहावयास न थांबतां नुसतें घाईनें चालत गेलें तरी निदान दोन कलाक लागतात. साधारण तऱ्हेचें अवलोकन करण्यास रोज तीन तीन चार चार तास याप्रमाणें एक आठवडा लागेल; व सूक्ष्म निरीक्षणास कांहीं महिने लागतील. इमारत तीन मजली असून फार भव्य आहे. जवळच 'ट्युएलरिज' नांवाच्या प्रसिद्ध उद्यानभूमिका आहेत. समोरील रस्ता रुंद असून फार स्वच्छ होता. एका बाजूनें कांहीं श्रीमंत लोकांचीं घरें व कांहीं सधन व्यापाऱ्यांचीं दुकानें होतीं. या घरांच्या व दुकानांच्या पुढें एकसारखा कमानींनीं आच्छादित असा एक रस्ता होता. या सर्व कमानी एका सरळ रेषेंत असल्यामुळें रस्त्याला फारच शोभा आली होती.

या चित्रशाळेंत खर्च करण्यास आह्मांस सुमारें दीडएक तासाची सवड होती. तेवढ्याच काळांत कोणत्याही प्रकारचा कार्यभाग उरकण्याचा संभव नव्हता हें वर सांगितलेंच आहे;

ह्मणून तळमजल्यावरील प्राचीनकाळचा मूर्तिसमूह न पाहतां आम्हीं दुसऱ्या मजल्यावर एकदम गेलों, व कांहीं प्रसिद्ध पुरुषांचीं व कांहीं लढायांचीं हृदयद्रावक अशीं चित्रें पहाण्यांत आह्मी वेळ घालविला.

तळमजल्यावरील मूर्तिसमूह जो वर सांगितला त्यामध्यें मर्मरोपलनिर्मित असे प्राचीन रोमन व ग्रीक पुतळे आहेत. त्याचप्रमाणें इजिप्शियन, आसिरियन, सिरियन, फिनिशियन इत्यादि नानाप्रकारच्या ऐतिहासिक व पौराणिक कालांच्या निदर्शक अशा वस्तु आहेत. शिवाय मध्ययुगीय व अर्वाचीन तऱ्हेचेही मासले आहेत.

दुसऱ्या मजल्यावर प्रसिद्ध प्राचीन चित्रकारांच्या कौशल्याचे नमुने, लहानसान जुनीं भांडीं वगैरे आहेत. एका बाजूला थोरला नेपोलियन व दुसऱ्या कांहीं बादशहांच्या खासगी वस्तूंचा संग्रह आहे.

तिसऱ्या मजल्यावर नौकाविषयक वस्तु आहेत, व एका बाजूला चिनी वस्तूंचे, हिंदु देवतांचे व देवाळयांचे, व अमेरिकन इंडियन लोकांच्या पोषाकांचे नमुने आहेत.

जागजागीं कांहीं पुरुष व स्त्रिया पुतळ्यांचें व चित्रांचें अवलोकन करून त्या बरहुकूम चित्रें काढण्याचा यत्न करीत होत्या. ह्यांपैकीं कांहीं लोक धंदा शिकण्यासाठीं व कांहीं केवळ शोकासाठीं येणारे असतात. रंगांची पेटी व कलम मात्र बरोबर घेऊन येतात. चित्रफलक तेथेंच ठेविलेलें असतें. त्यांच्या येण्याच्या वेळा नेमिलेल्या असतात. त्या वेळांत फुरसत सांपडेल तेव्हां येण्यास हरकत नसते. प्रेक्षकजनांस अशा लोकांस त्यांच्या

कामासंबंधानें कोणत्याही प्रकारची हरकत करण्यास मनाई असते.

याप्रमाणें थोडा वेळ येथें खर्च करून आह्मीं परत गेलों ते सगळा दिवसपर्यंत घराच्या बाहेर पडलों नाहीं, त्यामुळें फार कंटाळा आला. रात्रीं ऑपरा पहाण्यास गेलों.

## नाटकगृहें.

पॅरिसशहरांत एकंदर ४० वर नाटकगृहें आहेत. आदितवारीं गर्दी फार असते. गरीब लोक देखील आपल्या मुलांमाणसांसुद्धां एखाद्या आदितवारीं नाटक पाहण्यास जातात. पारिस शहरासंबंधीं ही एक विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं रविवार हा दिवस सर्व व्यवहारासंबंधानें ज्याप्रमाणें इंग्लंडांत पवित्र मानला जातो त्याप्रमाणें पारिस शहरांत मानला जात नाहीं. रविवारच्या दिवशीं खुद्द लंडन शहरांतसुद्धां सर्व दुकानें बंद राहतात व सर्व प्रकारचे व्यवहार, खेळ, तमाशे वगैरे करमणुकीचे मार्ग बंद रहातात. मेवामिठाईचीं व तंबाखूचीं दुकानें मात्र उघडीं असतात.त्यामुळें जिकडे तिकडे सामसुम दिसतें व परकी मनुष्यास फार कंटाळा येतो. परंतु पारिस शहराची स्थिति याहून अगदीं उलट आहे. आठवड्यांतील इतर दिवसांपेक्षां रविवारीं पारिस शहरांत रात्रीं व दिवसा मौज जास्ती असते, सर्व प्रकारच्या उत्सवांचा भर जास्ती असतो व वैदेशिक जनांस फारच आल्हाद होऊन त्यांचें मनोरंजन होतें.

प्रयोगास सुरुवात सात साडेसात वाजतां करण्याची वहिवाट आहे. वरच्या प्रतीच्या जागांसाठीं प्रवेशपत्रिका पूर्वी-

पासून घेऊन ठेवाव्या लागतात. याचें एक कारण असें कीं समयविशेषीं गर्दी झाल्यास सर्व जागा भरून जातात व प्रवेश होण्याची पंचाईत पडते. दुसरें कारण असें कीं पूर्वीपासून व्यवस्था केली ह्मणजे आपल्या जागेवर आपला हक्क खेळ संपे तोंपर्यंत राहतो. अशा प्रकारचा हक्क प्रयोगाचे दिवशीं दारावर तिकिट घेऊन प्राप्त होत नाहीं, व खेळामधून आपण उठून गेलों असतां मागें दुसरा कोणी आपल्या जागेवर बसला असतां त्यास उठवितां येत नाहीं. पिटमध्यें बसणारे लोक आपल्या जागेच्या पाठीमागें आपला हातरुमाल बांधून ठेवितात.

कांहीं कांहीं नाटकगृहांत बावीस प्रकारच्या निरनिराळ्या जागा आहेत व सोळा प्रतींचे तिकिटांचे दर आहेत. दर कमींत कमीं माणशीं आठ आणे व उच्च प्रतींत दहा रुपये आहे. चार चार सहा सहा माणसांच्या सोईच्या खोल्या घेतल्यास त्यांचे दर निराळे आहेत. तिकिटें अगोदर घेऊन ठेविल्यास त्यांबद्दल किमतीप्रमाणें कमिशन द्यावें लागतें. याचा दर सुमारें रुपयामागें दोन आणे असतो. ओव्हरकोट काढून ठेवण्याचें भाडें दोन पासून चार आण्यांपर्यंत आहे; व स्त्रियांकरितां पादपीठें ( फुटस्टूल्स ) ही देतात, त्यांचें भाडें चार आण्यांपासून आठ आणे असतें. दुसरी अशी एक गोष्ट सांगण्यासारखी आहे कीं, नाटकवाल्या मंडळीच्या पगारांत कांहीं हलकट व दांडग्या लोकांच्या टोळ्या ठेविलेल्या असतात. यांपैकीं दहा दहा वीस वीस लोक व एक एक मुकादम असे नाटकगृहाच्या निरनिराळ्या भागीं बसतात. त्यांचें काम एवढेंच कीं, त्यांनीं प्रयोगाच्या दिवशीं हजर असावें व खूण केल्याबरोबर टाळ्यां-

चा गजर करावा. असें झालें म्हणजे अर्थातच दुसरी मंडळी टाळ्या वाजवूं लागतात.

## ऑपरा नाटकगृह.

सर्व नाटकगृहांत सर्व प्रकारें श्रेष्ठ असें जें नाटकगृह त्याचें नांव ऑपरा. ही इमारत फारच सुंदर आहे. हिला शोभा आ-णण्याकरितां व लोकांच्या सुखाकरितां सर्व प्रकारची नक्षी व सर्व प्रकारच्या तजाविजी केलेल्या आहेत. या इमारतीला दोन कोट रुपयांवर खर्च झाला आहे असें म्हणतात. इची लांबी ४९० फूट व रुंदी ३२८ फूट आहे. बाहेरच्या बाजूनें संगमरवरी दगड लाविलेला आहे व नामांकित गवय्ये व बज-वय्ये यांचे पुतळे आहेत, व गायनकलेच्या देवतांच्याही प्रति-मा आहेत. उंच प्रतीच्या जागेच्या लोकांसाठीं एक सुरेख सोपानपरंपरा आहे व तिच्या बाजूनें पुतळे उभे असून पुत-ळयांच्या डोक्यांवर दिव्यांचीं झुंबरें दिलेलीं आहेत. रंगभूमी-च्या खालीं चाळीस फूट जागा खोल खणलेली आहे त्यामुळें पडद्दे व दुसऱ्या प्रकारचे देखावे समग्र राहून एकदम वर घेतां येतात. या इमारतींत लांकडाच्या ऐवजीं लोखंड वापरलेलें आहे, त्यामुळें आगीची भीति नाहीं. प्रकाश व स्वच्छ हवा यांसंबंधीं सर्व व्यवस्था शास्त्रीय रीतीच्या आहेत. गृहांतील सर्व भागांत तारायंत्राची योजना आहे. यांत सुमारें अडीच हजार प्रेक्षकजनांची सोय होते.

प्रयोगाबद्दल माहिती जी पूर्वीं दिली आहे ती येथेंही लावू-न घ्यावी. मात्र नाटकगृहाचें वैभव, 'रंगसज्जेची खुबी, नर्त-कीगणाचा समाज व त्यांचें सौन्दर्य, व विद्युत्प्रकाशाची

उज्वलता एवढ्या गोष्टी अननुभूतपूर्व होत्या इतकेंच सांगून पुरें करितों.

## पारिस शहरांतील अतिरमणीय भाग.

तारीख १ मे रोजीं दोनप्रहरीं घोड्यांच्या शर्यती होत्या. शर्यतीच्या मैदानाकडे जाण्याचा रस्ता पारिस शहरांतील अतिरमणीय व अतिसुंदर अशा भागांतून होता. आश्रमांतून निघाल्यानंतर थोड्याच वेळांत आह्माला एक विस्तीर्ण वीथिका लागली. इचें नांव 'शाम्स एलायसीस.' इच्या दोन्ही बाजूंनीं लहानमोठ्या झाडांची गर्दी असून त्यांमधून पार्श्वपथ काढलेले होते. या पथांच्या बाजूला तऱ्हेतऱ्हेचीं आसनें ठेविलेलीं होतीं व त्यांवर कांहीं लोक बसून करमणूक करीत होते. या पथांच्या आंतल्या बाजूस घोड्यावर बसून जाणाऱ्या लोकांकरितां बारीक सफेद वाळू व शिंपांचा चूर टाकिलेले रस्ते होते. मधून मधून वर्तुलाकार जागा काढून त्यांमध्यें जलोद्गार यंत्रें होतीं, व त्यांमधून उडणारा तुषारसमूह बारीक पिंजलेल्या कापसाप्रमाणें दिसत होता. याप्रमाणें व्यवस्था सुमारें दीड मैलापर्यंत होती. या वीथिकेच्या पश्चिमेच्या टोंकास एक भव्य कमान आहे. सन १८०६ सालीं फ्रेंच फौजेस जो विजय मिळाला त्याचें स्मारक ह्मणून हें तोरण उभारण्याचा नेपोलियन बादशाहानें निश्चय केला. परंतु त्याच्या कारकीर्दींत तें काम शेवटास गेलें नाहीं. १८३५ सालीं याचें काम संपलें. आजपर्यंत यावर एकंदर चाळीस लक्ष रुपये खर्च झाला आहे. तोरणाच्या अग्रभागीं पुतळे वगैरे बसविण्याचें काम अजून व्हावयाचेंच आहे. मध्य कमानीची उंची ९७

फूट असून रुंदी ४८ फूट आहे. कमानीच्या दोन बाजूंच्या भिंतींत एक एक लहान कमान काढलेली आहे. सर्व बाजूंच्या पृष्ठभागावर तऱ्हेतऱ्हेचीं चित्रें खोदलेलीं आहेत. त्यांपैकीं बहुतेक युद्धविषयक आहेत. कमानीच्या शिरोभागीं एक विस्तीर्ण चौथरा आहे व त्याच्या बाजूंनीं ढालीसारख्या वर्तुलाकार आकृति खोदलेल्या आहेत. त्यांवर ज्या ज्या लढायांत फ्रेंचांचा जय झाला त्यांचीं नांवें लिहिलीं आहेत. परंतु ज्या लढायांत इंग्रजी फौज होती अशा लढायांचें नांव मुळींच नाहीं. या इमारतीची एकंदर उंची १६१ फूट व रुंदी १८७ फूट आहे. इच्या तोडीची कमान सर्व पृथ्वीवर नाहीं असें ह्मणतात, व इच्या योगानें पारिस शहरास फारच शोभा आली आहे.

## ब्वा-द-बलोन उद्यानभूमिका.

ही कमान सोडून पुढें गेल्यावर कांहीं वेळानें आह्मांस अतिविस्तीर्ण व सुशोभित अशा उद्यानभूमिका लागल्या. यांचें नांव "ब्वा-द-बलोन". यांचें क्षेत्रफळ सुमारें २१६० एकर असून यांपैकीं ७० एकर जलमय आहेत. यांत उपभोग व ऐषआराम यांसाठीं ज्या ज्या तजविजी आवश्यक आहेत त्या आढळतात. गाडींत बसून जाणाऱ्या लोकांसाठीं प्रशस्त रस्ते आहेत. त्यांच्याच बाजूनें पादचारिजनांसाठीं पार्श्वपथ आहेत. तसेंच घोड्यावरून जाणाऱ्या लोकांचीही अलाहिदा सोय आहे. ठिकठिकाणीं आसनें, लतागृहें, लतामंडप विपुल आहेत. स्थलीं स्थलीं पुष्पवाटिका आहेत. त्यांपैकीं कांहीं लता कुसुमामोदाच्या योगानें अभ्यागतजनांचें स्वागत करीत आहेत. कांहीं पवनान्दोलित होऊन आपल्या पुष्पस्तबकांतून गळणा-

ऱ्या फुलांच्या योगानें जणूं लाह्याच उडवीत आहेत. कांहीं गाऱ्या फुलांच्या योगानें जणूं लाह्याच उडवीत आहेत. कांहीं गालिच्यासारख्या सुंदर दिसणाऱ्या आपल्या रंगीबेरंगी फुलांनीं नयनांस तोषवीत आहेत. बाकी राहिलेली सर्व जमीन हिरव्या गार अशा गवतानें झांकलेली आहे. एके ठिकाणीं एक विस्तीर्ण तलाव खोदून काढिलेला आहे. हा पाऊण मैल लांब असून, दोन फुटांपासून दहा फूट खोल आहे. या सरोवरांत दोन लहान द्वीपें आहेत. एकदोन लहान घांट आहेत व शोकी लोकांकरितां लहानमोठ्या होडया ठेविल्या आहेत. यांचें भाडें दर तासास एक रुपयापासून तीन रुपयेपर्यंत आहे. या सरोवराच्या तीरावरून लहानमोठे रस्ते नेलेले आहेत. ते फारच रमणीय आहेत. याशिवाय दुसरींही लहान सरोवरें आहेत. तलाव खोदून जी माती निघाली तिचा एक प्रचंड ढीग केला आहे. त्यास डोंगराची शोभा आली आहे. कांहीं स्थलीं मोठमोठे दगड जमवून त्यांतून पाण्याचे धबधबे सोडलेले आहेत. परंतु सर्वांत एक फारच मोठा आहे. हा धबधबा सुमारें चाळीस फूट उंचीवरून पडतो. ज्या खडकावरून हा पडतो त्याच्या खालीं प्रशस्त गुहा काढिल्या आहेत. त्यांमध्यें गेलें ह्मणजे धबधब्याचे तुषार अंगावर येतात. धबधब्याच्या वरच्या बाजूनें आजूबाजूचा देखावा फारच मनोरम दिसतो. जवळच एक पानगृह आहे तेथें खाद्य व पेय वस्तूंची सामुग्री नेहमीं तयार असते. अशा प्रकारचीं पानगृहें अनेक आहेत. एकंदरीनें हें स्थान सर्व प्रकारच्या नागरिकांचें प्रियपात्र आहे. दुःखिजनांचें दुःखापनयन अशा स्थलीं न व्हावें तर व्हावें कुठें ? सुखिजनांच्या उपभोगास पोषक अशी सामुग्री दुसरी काय पाहिजे ? दरिद्र्यास अशा स्थलीं गेल्यावर व ऐटींत पायावर

पाय टाकून कोणाचीही ऊठ ह्मणण्याची आज्ञा नाहीं, अशा बेफिकिर अवस्थेंत तात्कालिक तरी आनन्द नाहीं कां वाटणार ? व श्रीमंतांचाही केवळ कृत्रिम उपायांनीं अशा तऱ्हेचा वनश्रीचा थाट अशा विस्तीर्ण प्रमाणांनीं केलेला पाहून आपल्या गृहोद्यानाविषयींचा गर्व कमी नाहीं कां होणार ? असो.

या भूमिका वलांडून आह्मी पलीकडे गेल्यावर शर्यतीचें मैदान लागलें. तिकडे मंडळीचा लोट फारच मोठा चालला होता, व गाड्यांची गर्दी अतोनात झाली होती. परंतु मला इकडे फार करमणूक न वाटल्यामुळें मी आमच्या मंडळीस सोडून परत फिरलों व पारिस शहरांतील मुख्य भागांतून हिंडण्याचा बेत केला.

## पारिस शहर.

पारिस शहराची रचना एकंदरींनें पाहतां फारच सुरेख आहे. शहरामधून सेननदीचा प्रवाह गेला असून तिच्या योगानें शहराचे लहानमोठे दोन विभाग झालेले आहेत. या नदीचा शहरामधून गेलेला भाग सुमारें सहा मैल लांब असून पात्राची रुंदी सरासरी पांचशें फूट आहे. पाणी सुमारें बारा फूट खोल असून निरनिराळ्या भागीं लहानमोठ्या अगबोटी येत जात असतात. नदीच्या पात्रांत एकदोन ठिकाणीं लहान बेटें झालीं आहेत, त्यांमुळें त्या स्थलांस विशेष शोभा आली आहे. शहरासभोंवती एक तट आहे, त्याची लांबी २१ मैल आहे व त्यास ६७ वेशी आहेत. शहराचें क्षेत्रफळ सुमारें ३० चोरस मैल आहे व लोकसंख्या २८ लक्षांवर आहे. म्युनिसिपालिटीचें उत्पन्न सुमारें दहा कोट रुपये आहे.

सेन नदीच्या उत्तरेस जो शहराचा भाग आहे, त्यांत उच्च

प्रतीचे पथिकाश्रम, संपन्न व्यापाऱ्यांचीं दुकानें, शिष्टजनांचे प्रासाद, शोकी व गुलछोशी जनांचीं सुखोपभोगस्थानें, रम्य उद्यानभूमिका, सुंदर नाटकगृहें व विस्तीर्ण रथ्या आहेत. या भागांत सायंकालच्या समयानंतर सहल करण्याची फारच मौज आहे. अशा प्रकारची मौज दुसऱ्या कोणत्याही शहरांत अनुभविण्यास सांपडावयाची नाहीं. सर्व रथ्या अगदीं रेखीव असून त्यांचे पार्श्वपथ त्यांस शोभण्यासारखे आहेत. ठिकठिकाणीं वर्तुलाकार व चतुष्कोण जागा असून त्यांच्या मध्यभागीं कोठें कारंजीं, कोठें विजयस्तंभ, कोठें पुतळे, असे आहेत. अशा ठिकाणीं चार चार पांच पांच रस्ते मिळालेले असतात व कोणताही रस्ता पाहिला तरी एकसारखा सरळ दिसतो. गृहांची रचना बाहेरून बहुतेक एकसारखीच दिसते. त्यांची आकृति भव्य असून मजले उंच उंच असतात. चारचार पांचपांच मजल्यांचीं घरें फार आहेत. फ्रेंच कादंबऱ्या वाचणारास "बुलेवार्द" हा शब्द पुष्कळदां लागला असेल. या शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे. हल्लीं पारिस शहराचा जो विस्तार आहे तो पूर्वीं नव्हता. पूर्वीं शहर लहान असून त्याचे भोंवतीं तट होता. परंतु जेव्हां विस्ताराची आवश्यकता वाटली तेव्हां हे तट पाडून त्यांच्या जागीं मोठे विस्तीर्ण रस्ते बनविले. या रस्त्यांचें नांव "बुलेवार्द."—अर्थातच जेव्हां वस्ती वाढली तेव्हां श्रीमंत लोक गलिच्छ व कोंजट जागेंत न रहातां या नव्या विस्तीर्ण वीथिकांच्या प्रदेशांत राहूं लागले, त्यामुळें या भागास मोठेंच ऐश्वर्य प्राप्त झालें. सांप्रत काळीं हे बुलेवार्द सर्व प्रकारच्या लोकांचीं विश्रामस्थानें बनून राहिले आहेत. सायंकालानंतर दीपप्रकाशाची रेलचेल

असल्यामुळें आधींच सुंदर असलेलीं भवनें विशेष शोभा पावतात. ठिकठिकाणीं पानगृहें असून त्यांच्या पुढें उघड्या जागेंत तऱ्हेतऱ्हेचीं आसनें टाकून स्वस्थ चित्तानें कांहीं मंडळी आराम अनुभवीत असतात. कांहीं लोक पार्श्वपथावरून चैनीनें फिरत असतात, व सलील मंदगतीनें चालणाऱ्या युवतीजनाची टवाळकी करण्यांतच आनंद मानतात. श्रीमंत लोक आपल्या परिवारासमवेत ऐटबाज अशा लवाजम्यासह आपआपल्या गाड्यांत बसून आसमन्तात् चालू असणाऱ्या उत्सवाच्या दर्शनानेंच सुख पावतात. कांहीं लोक असंख्यदीपसमूहाच्या योगानें चित्तास आकर्षण करणाऱ्या नाटक गृहाकडे वळून आगामि उत्सवाची सोत्कंठमनानें प्रतीक्षा करीत बसतात. लोकांची चळवळ, गाड्यांची गर्दी, सर्वांची चैन करण्याविषयीं उत्सुकता—अशा सर्व प्रकारांनीं तो समय मोठा आल्हादजनक भासतो, व चित्ताची उद्विग्नता जाऊन वृत्ती उल्लसित होतात.

पॅरिस शहरांत सुमारें बारा हजार लहानमोठे पथिकाश्रम आहेत. यांशिवाय केवळ भोजनाचीच व्यवस्था ज्यांत आहे अशीं अनेक ठिकाणें आहेत. पानगृहें ( काफेज ) सुमारें दीड हजार आहेत. या गृहांमध्यें केवळ काफी पिण्याचीच सोय असते असें नाहीं. तर दुसऱ्या पेय वस्तु व कांहीं प्रकारच्या खाद्य वस्तुही मिळतात. वाचावयास वर्तमानपत्रें व खेळण्याची सर्व प्रकारची सामुग्रीही येथें असते. वर्षांतून कांहीं नेमलेल्या महिन्यांत पुष्कळ ठिकाणीं स्त्रीपुरुषांचे नाच ( बाल्स ) सुरू असतात. कांहीं नाच निरनिराळ्या नाटकगृहांतही होतात. एका प्रसिद्ध नाटकगृहांत नाटकप्रयोग

आटपल्यानंतर मग नाचाची तयारी होते व त्यास सुरुवात बारा वाजल्यानंतर होते. एकंदर शहरांत २०० वर स्नान-गृहें आहेत. आग्निचसांच्या ३३ शाखा व ट्रामवेच्या ४१ शाखा आहेत. आग्निवसांच्या संबंधानें येवढें सांगितलें पाहिजे कीं, वाटेल त्या रस्त्यावर उभें राहून त्यांत जागा मिळण्याचा संभव नाहीं. चालत्या गाडीस थांबविण्याकरितां खूण केली असतां गाडीवाला उभी करीलच असा नेम नाहीं. यासाठीं ठिकठि-काणीं गाडीचीं स्टेशनें आहेत तेथें गेलें असतां बसण्यास चां-गली सवड मिळते. आगगाडीचा रस्ता सर्व शहराच्या सभों-वतीं व शहरामध्यें कांहीं ठिकाणीं आहे. एकंदर सात कंपन्या असून त्यांचीं नऊ स्टेशनें आहेत. पारिस शहरांत सोन्याचें, रुप्याचें, व तांब्याचें नाणें चालू आहे. सोन्याचीं पांच प्रकार-चीं नाणीं आहेत. त्यांची किंमत २ पासून चाळीस रुपये-पर्यंत आहे. साधारण वापरण्यांत असणारे ' नेपोलियन ' व ' अर्धा नेपोलियन ' आहेत–त्यांची किंमत ८ रुपये व ४ रुपये असते. रुप्याच्या नाण्यांत ' फ्राक ' विशेष वापरण्यांत येतो. याची किंमत सुमारें सहापासून आठ आणे आहे. सर्वांत लहान तांब्याचें नाणें ' सेंटीम,'–याची किंमत सुमारें पैयेवढी असते, व पांच ' सेंटिमांचा ' एक ' सू ' असतो.

शहरांत फिरून घरीं आल्यावर रात्रीं ' हिपोड्रोम ' मध्यें घोड्यांची वगैरे कसरत पहाण्यास गेलों. ही इमारत फारच वि-स्तीर्ण असून इचा आकार लांबोडा आहे. मध्यभागीं एक व-र्तुल असून त्याच्या भोंवतीं सुमार दहा हात रुंदीची मोक-ळी जागा आहे. या मोकळ्या जागेच्या पलीकडे प्रेक्षकांस बसावयाची जागा आहे. आठ हजारांवर माणसें बसण्याची

सोय येथें आहे. घोड्यांच्या व माणसांच्या कसरतीचा प्रकार कांहीं विलक्षण नव्हता, परंतु या ठिकाणीं घोड्यांच्या व गाड्यांच्या शर्यती मात्र दृष्टीस पडल्या. प्राचीन ग्रीसच्या इतिहासांत जें वर्णन केलें आहे तशाच तऱ्हेच्या गाड्या व तशाच तऱ्हेचे लोकांचे पोषाख होते. गाड्या फारच हलक्या असून त्यांस दोन दोन चार चार घोडे जोडलेले होते, व प्रत्येक शर्यतींत चार चार गाड्या धावत असत; व ज्याचा जय होईल त्यास मागाहून एका सहा घोड्यांच्या गाडींत मिरवीत असत. जागा इतकी विस्तीर्ण होती कीं एका बाजूकडून दुसऱ्या बाजूचीं माणसें दिसत नसत. विजेच्या दिव्यांचा प्रकाश असल्यामुळें त्या दृग्विषयास अवर्णनीय शोभा आली होती. मात्र प्रकाशाच्या चांचल्यामुळें एकंदर मजेंत थोडा कमीपणा येत होता.

याप्रमाणें थोड्या अवकाशांत जेवढें दिसलें तेवढें पाहून तारीख २ मे रोजीं आह्मी पारिस सोडलें व लंडनचा रस्ता धरिला. पारिस शहरांतील ऐषआरामाचा चांगला अनुभव मिळण्यास महिना पंधरा दिवस तरी राहिलें पाहिजे. परंतु तसा योग घडून आला नाहीं. लंडनास गेल्यावर फिरून पारिस शहरास परत येऊं असा प्रथम बेत होता, परंतु तो बेत पुढें सिद्धीस गेला नाहीं याबद्दल फार निराशा झाली. इंग्लिश चानलमध्यें नेहेमी आगबोट फार हलते व बहुतेकांस आगबोट लागल्यावांचून रहात नाहीं असें आह्मांस पूर्वी समजलें होतें, व जरी दीड पावणेदोन तासच आगबोटींत बसावें लागतें तरी तेवढ्यांत फार त्रेधा होते असें ह्मणतात. परंतु आह्मी गेलों त्या दिवशीं समुद्र बराच शांत होता, ह्यामुळें आमचे हाल

झाले नाहींत. फ्रान्सांतून इंग्लंडांत जाण्याचे मुख्य दोन मार्ग– क्याले व डोव्हर आणि बलोन व फोकस्टन. आह्मी बलोनाहून फोकस्टनास गेलों. या वेळेस आमच्या बरोबरचा एक सोबती आजारी पडला, त्यामुळें मंडळीच्या चित्तास थोडी अस्वस्थता होती. आजारी पडण्याचें कारण येवढेंच कीं हयगयीमुळें त्यानें गरम विजार न घालतां एक दोन वेळ साधीच विजार घातली, त्यामुळें पायांस वारा लागून आंत विकार उत्पन्न झाला. मुंबई सोडून महिन्यावर दिवस झाले होते, त्यामुळें उद्दिष्ट स्थानीं जाऊन कांहीं दिवस स्वस्थ रहाण्याची उत्कंठा प्राप्त झाली होती; म्हणून जेव्हां इंग्लंडच्या किनाऱ्यावर पाय ठेविला तेव्हां मनाला कांहीं विलक्षण आनंद झाला, व एक ओझें डोक्यावरून उतरल्यासारखें होऊन पुढल्या कालक्रमणेच्या उपायांची योजना मनांत येऊं लागली.

---